सुलभ साहित्य ग्रंथमाला-पुष्प १ लें.

# रुखाना



कु० फिरोज आनंदकर, बी.

प्रकाशक—

न्यू भारत प्रिंटींग प्रेस



सन १९३४



किंमत १ रुपया.

# वाचण्यापूर्वी—

दोनच शब्द सांगावयाचे आहेत मला.

आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या माझ्या लघुकथांचा संग्रह एकत्रित छापून वाचकांपुढें सादर करण्याइतकें प्रोत्साहन मला केवळ वाचक-वर्गाकडूनच मिळालें आहे, याची मला पूर्ण जाणीव आहे, व त्याबद्दल इतर सर्वांचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करण्यापूर्वी मला महाराष्ट्रीय वाचक वर्गांचेच प्रथम आभार मानले पाहिजेत.

प्रस्तुत संग्रहापैकीं पहिल्या दहा कथा यापूर्वीच वेगवेगळ्या नियत कलिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. शेवटल्या दोन मात्र ह्या संग्रहाकरितांच मी लिहिल्या आहेत. प्रत्येक कथेंतील कथानकें लौकिक दृष्ट्या क्षुल्लक वार्टणाऱ्या अशा, व जगांत आपल्या सभोंवार नित्यशः घडून येणाऱ्या लहान मोठ्या घटनांवरूनच सुचलेलीं आहेत. महाराष्ट्र शारदेच्या कंठांतील अनेक रत्नमालांच्या बरोबर स्थान मिळण्याइतकें माझ्या कथांचें लेणें जरी अमोल नसलें तरी बारा सरांचा हा कमरपट्टा—ही रशना—मला तिला अर्पण करण्यांत आनंदच वाटेल.

ह्या रशनेला वाचकवृंदापुढें सादर करण्याच्या कामीं ज्या ज्या व्यक्तींची मदत झाली त्यांत माझे समव्यवसायी संपादक श्रीयुत काशिनाथ म. ताम्हनकर यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावा लागेल. वास्तविक रशनेच्या प्रसिद्धीकरणांत माझ्यापेक्षां त्यांनाच सर्व श्रेय द्यावें लागेल. आपुलकीच्या भावनेनें त्यांनीं केलेल्या निस्वार्थी मेहनतीचें मोजमाप शाब्दिक आभारानें करणें शक्य नाहीं.

पुस्तकाची बाह्य सजावट-माझ्या मनाजोगती चित्रकृति काढण्यांत मला प्रसिद्ध चित्रकार श्रीयुत पुरुषोत्तम श्रीपाद काळे यांची जी मदत झाली तिचाहि कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यावाचून माझ्यानें राहवत नाहीं. किंबहुना त्यांच्या सहकार्यावांचून माझ्या पुस्तकाला आतांचें सौंदर्य प्राप्त झालें नसतें असें मला वाटतें. केवळ एक दोन दिवसाच्या सुचनेनें हौसेनें व आपलीं इतर महत्त्वाचीं कामें बाजूस ठेवून त्यांनीं जी आपुलकी दाखविली त्याबद्दल मी त्यांची सदैव ऋणी आहे.

तसेंच ज्या छापखान्यांत प्रस्तुत पुस्तकाचा जन्म झाला त्याचे हौशी चालक, श्रीयुत रघुनाथ दिपाजी देसाई व त्यांचें सहकारी मंडळ यांनीं माझ्या पुस्तकाच्या अंतर्बाह्य सजावटीला जी मदत केली आहे त्याबद्दलची कृतज्ञता शब्दातीत आहे.

मुकुंद भुवन,
गांवदेवी, ३०-११-३४.

पिरोज आनंदकर.



# गोष्टींचा अनुक्रम




| | | |
|---|---|---|
| १ | प्रतिज्ञापूर्ति | १ |
| २ | जगाचा न्याय | ११ |
| ३ | याला जबाबदार कोण ? | २२ |
| ४ | समाजाचें अग्निकुंड | ३२ |
| ५ | त्यागाचा आनंद | ४१ |
| ६ | कोटिक्रम | ५४ |
| ७ | निपुत्रिका | ७१ |
| ८ | अलीकडचा फोटो | ८६ |
| ९ | फेरीवाला | ९८ |
| ० | बोलका चित्रपट | ११५ |
| १ | फुलमाळीण | १२६ |
| २ | सूर्यास्त | १४७ |



माझे वडील

कै. विनायकराव आनंदराव

आनन्दकर

यांच्या पुण्य स्मृतीस

समर्पण

# प्रतिज्ञापूर्ति



" हात कापून देईन, गंगाधरपंत; असं झालं नाहीं तर ! "

" अहो, कशाला शास्त्रीबुवा ह्या गोष्टी करतां ! कांहीं जरी घडून आलं तरी कोणी कुणाचे हात कापून घेत नाहीं व देत नाहीं; उगाच एक आपली म्हण आहे. शब्दावडंबर आहे झालं, उगाच शब्दांच्या ऋणांत कशाला राहावं माणसानं ? "

" जी गोष्ट कृतींत आणतां यायची नाहीं तिची शाब्दिक वाच्यता म्हणींतून योजण्याइतके आपले पूर्वज खास हीनबुद्धीचे नसावे. कृति हीच वाचेची पूर्व तयारी होय.—माझ्या साऱ्या हयातींत जी गोष्ट मला कृतींत आणतां यायची नाहीं तिची वाच्यता मी आजपर्यंत केव्हांच केली नाहीं, व शाब्दिक ऋणांत राहण्याचीहि माझी बिलकूल इच्छा नाहीं. गंगाधरपंत, अद्याप सुद्धां त्रिवार मी हेंच सांगतों, कीं असं जर झालं नाहीं तर हात कापून देईन—माझं ज्योतिष कध्धीं कध्धीं म्हणून खोटं व्हायचं नाहीं—माझ्या चाळीस वर्षांच्या अनुभवाची किंमत तुम्हांला कांहींच नाहीं !

शास्त्रीबुवा बेभान बोलत सुटले.

किंमत वाटते म्हणूनच आज इतक्या दुरून त्या विष्णुपंतांच्या करवीं तुमची वाटखर्ची देऊन तुम्हांला आणलं ना शास्त्रीबुवा !—चुन्याचें बोट सतरंजीला पुसून गंगाधरपंत म्हणाले.

" तुमच्या वेणुताईला विवाहानंतर म्हणजे बरोबर आजपासून चार वर्षांनीं वैधव्य योग आहे. हे माझे शब्द लिहून ठेवा. तुमचं हें टिपण जर बरोबर असेल तर माझे हे शब्द—हें माझं भविष्य—ज्योतिष केव्हांहि खोटं होणार

नाहीं. आणि जर खोटं झालं तर— मी आपला हात कापून देईन—याबद्दल हे विष्णुपंतच साक्ष राहतील—"

" शास्त्रीबुवा, पण तुम्ही सांगितलेल्या गोष्टीचं प्रत्यंतर आपल्या तिघांच्या हयातींत मिळालं तरच ना या साऱ्या हातबित कापायाच्या गोष्टी !—" विष्णुपंत हातावर मळून मळून पीठ केलेल्या तंबाखूचा तोबरा तोंडांत भरून बोबड्या शब्दांत म्हणाले.

" आतां कसं बरं बोललांत, विष्णुपंत. पण मी म्हणतों, मनुष्य आहे, होतेच आहे बोलण्यांत चूक;—पण आपलंच खरं-आपलंच ज्ञान श्रेष्ठ असा अभिमान शास्त्रीबुवासारख्यानं बाळगून इरेस पडावं, हात कापून देईन वगैरे सारख्या अशक्य कोटींतल्या गोष्टी बोलत सुटावं हें कांहीं ठीक नाहीं !-आतां माझ्या जागीं एखादा दुसरा माणूस असता व त्याच्यापुढें जर यांनीं त्याच्या खुद्द मुलीबद्दल असं अभद्र भविष्य वर्तविलं असतं तर केवढा अनर्थ होता ! हो, तुम्हीच सांगा विष्णुपंत—आतां माझा तसा कांहीं भरंवसा ज्योतिष-बितिषावर नाहीं म्हणून सोडून द्या गोष्ट—"

" म्हणजे तुमच्या मतानें मी—मला जें जें उघड, सरळ दिसतं तें न सांगतां तुमच्या मनाला बरं वाटेल, असं एखाद्या कुडबुड्या ज्योतिषाप्रमाणं सांगावं, असंच कीं नाहीं ?-पण मी म्हणतों तुमचा जर तसा ज्योतिषावर विश्वास नाहीं तर मला इतक्या दूरवर आणून, आपल्या मुलीचं टिपण दाखविण्याचं कारणच काय ? " शास्त्रीबुवांनीं पृच्छा केली.

" हें सारं नाटक आमचीच्या इच्छेकरितां करावं लागलं-बाकी हें टिपण पहाण्याचा व लग्नाचा अर्थाअर्थी तसा कांहींच संबंध नाहीं, लग्न केव्हांच जुळलं आहे. लग्न जुळविण्यांत मुलीच्या इच्छेचा जितका संबंध असतो तितकाच संबंध याचा आहे—"

आपण एक फार मोठा विनोद केला या समजुतीनें गंगाधरपंत पांच पायऱ्या हंसले व विष्णुपंतांनींहि त्याची साथ केली. परंतु शास्त्रीबुवांना या हंशानें, या विनोदानें मर्मातिरेक दुःख झालें. होतो आहे हा अपमान आपला नसून ज्योतिषशास्त्राचा आहे असें त्यांना वाटलें. शास्त्रीबुवा म्हणजे एक साधे सुधे,

जुन्या पिढींतले, अंतःकरणाच्या पावित्र्यावर, तेजस्वीपणावर व सत्यप्रीयतेवर विश्वास ठेवणारे गृहस्थ; निसर्गाच्या सन्निध असणाऱ्या व जगाच्या दांभिकतेपासून दूर असणाऱ्या ‘ नवपुष्कर ’ गांवाच्या वातावरणांत त्यांच्या आयुष्याचे दिवस गेलेले, ज्योतिषशास्त्र म्हणजे त्यांच्या घराण्यांत कुलदैवताप्रमाणें परंपरेनें आलेलें. साताऱ्याच्या आसपास त्यांचा हात धरणारा ज्योतिषी नव्हता. त्यांच्या अंगच्या पावित्र्याचें व सत्यतेचें सात्त्विक तेज त्यांच्या सांवळ्या मुद्रेवर प्रतिबिंबित झालेलें दिसत असे. त्यांच्या साधेपणानें कोणावरहि त्यांची छाप पडत असे. पण ऐहिक संपत्तीच्या धुंदीत असलेल्या मनुष्याला आत्मिय संपत्तीचें, तेजाचें व बलाचें महत्त्व कळत नाहींसें होतें, गंगाधरपंतांना सुद्धां याच मदानें पछाडलें होतें. आपल्या मनाचा मोठेपणा दाखवावा या उद्देशानें ते शास्त्रीबुवांना म्हणाले, “ हें पहा, शास्त्रीबुवा, आतां दिवसेंदिवस आपल्याला या कामांत स्मृतीवर विसंबून राहणें जड होईल—मी आपल्याला थोडी बहुत रक्कम देतों; काशी क्षेत्रीं जाऊन खुशाल सुखसमाधानानं गुजारा करा. आतां या वयांत पैशासाठीं तुमच्यासारख्यांना यातायात कशी सोसवेल—हो, तुम्हीं आमच्या गांवचे आहांत. म्हणून अंतःकरण ओढतं दुसरं काय ! ”

ज्या तेजस्वी व्यक्ती असतात, त्यांचें तेज राखेंत गुप्त असलेल्या निखाऱ्याप्रमाणें केव्हां केव्हां फुंकर लागतांच प्रज्वलित होतें. गंगाधरपंतांच्या भाषणानें त्यांचें अंतर्गत तेज स्फुरण पावलें. त्यांनीं लगेच आपली पगडी डोकीवर चढविली, उपरणें नीट खांद्यावर बसविलें व गंगाधरपंतांना उद्देशून म्हटलें,

“ हें पहा, पंत तुमच्या सहानुभूतीची मी अपेक्षा केव्हांच केली नाहीं; काशीयात्रेसंबंधीं म्हणाल तर कायिक, वाचिक पावित्र्यावर माझी श्रद्धा आहे. पापी विचारांनीं मलिन झालेल्या व्यक्तींनीं काशीच्या पवित्र गंगेंत पुनीत व्हावं. विष्णुपंत, चला आतां; इथं माझ्या विद्येचा अधिक अपमान मी होऊं द्यायचा नाहीं. पंत, पण एवढं लक्षांत ठेवा, तुम्हांला भीति वाटते तितकी माझी स्मृति मला अद्याप सोडून गेली नाहीं व माझ्या शास्त्राच्या अभिमानानंहि मला अद्याप सोडलं नाहीं ! अद्याप सुद्धां मी हेंच सांगतों कीं ज्योतिषशास्त्र जर खरं असेल व सत्यवाक् सृष्टीसाठीं जर परमेश्वराचें अधिष्ठान असेल तर आपल्या मुलीसंबंधीं मी वर्तविलेलं भविष्य खोटं होणार नाहीं, व तें खोटं झालं

तर मी दुनियेच्या पाठीवर कुठंहि असलों तरी माझा उजवा हात कापून आपल्यापुढं ठेवीन—!"

"प्रति चाणाक्य!" ते दोघे गेल्यावर एवढेच उद्गार गंगाधर पंतांनीं काढले.

* * *

वरील प्रसंग घडून आल्यास पांचसहा वर्षें लोटलीं होतीं. हल्लीं गंगाधरपंत हे सातारच्या प्रमुख कार्यकर्त्यांत मोडत होते. ऐहिक सुखांत त्यांना सुदैवानें कांहीं कमतरता नव्हती. सुशील पत्नीची सोबत, दोन कर्तेसवरते मुलगे, मुलीचा सुखाचा संसार व नातवंडाच्या बाललीला यांत गंगाधरपंतांचा जीवितप्रवाह रमणीय वनप्रदेशांतून वाहणाऱ्या मंद व शीतल निर्झराप्रमाणें वाहत होता—पण सुखाचा अविरतप्रवाह मनुष्याला कधींच लाभत नाहीं. या सौख्यराशींत त्यांना एक शल्य सदैव टोचत असे; तें म्हणजे त्यांच्या पुतणीवर —तुंगभद्रेवर दोन वर्षांपूर्वी कोसळलेली आपत्ती. चार वर्षांपूर्वी आपल्या मुलीबरोबरच त्यांनीं आपल्या पुतणीचेंही लग्न करून दिलें होतें, परंतु काळाच्या क्रूरतेमुळें वैधव्याची कुऱ्हाड तिच्यावर दोन वर्षांपूर्वी कोसळली होती. व ती कायमचीच गंगाधरपंतांच्या इथें येऊन राहिली. वाढत्या वयोमानावर व जगाचे कटु अनुभव सोशीत असतांना गंगाधरपंतांच्या स्वभावांत सुद्धां एक प्रकारचें मार्दव आलें होतें. आपण सारीं आनंदाच्या साम्राज्यांत वावरत असतां तुंगभद्रेनें कष्टमय आयुष्य कंठावें याचा त्यांना फार विशाद वाटे, व तिला आपल्या स्वतःच्या मुलीपेक्षांहि आनंदांत ठेवण्याचा ते प्रयत्न करीत. त्यांची ही प्रवृत्ति व्हायला सुद्धां तसेंच कारण घडून आलें होतें.

सत्याच्या प्रखरतेनें सामान्य मनुष्याची दृष्टि क्षणभर दीपित झाल्याखेरीज कशी राहील? शास्त्रीबुवांनीं जातेवेळीं काढलेल्या उद्गारांचा उपहास जरी गंगाधरपंतांनीं थोडा वेळ केला तरी मनाची स्थिरता प्राप्त झाल्यावर त्यांच्या मनावर शास्त्रीबुवांच्या एकंदर अविर्भावांचा व त्यांच्या मुद्रेंत प्रतिबिंबित झालेल्या त्या वेळच्या पावित्र्याचा प्रकाश पडल्या खेरीज राहिला नाहीं. इतकें अंतःकरण पिळवटून बोलणारा वृद्ध अगदींच खोटें कसें बोलेल?—बरें, खोटें

बोलण्यापासून त्याचा फायदा कोणता ? उलट आपण त्याला त्याचे शब्द मागें घ्यायला सांगतांना—पैशाची लालुच दाखविण्याचाहि प्रयत्न केला. परंतु तोहि त्यानें मोठ्या निकरानें झिडकारला ! मग-त्याचेंच बोलणें खरें ?–खरें समजायचें मग वेणूच्या नशिबीं काय ?–असल्या प्रकारचे विचार मनांत आल्यावर त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला. थोडा वेळ ते दिवाणखान्यांत याच विचारांत येरझारा घालूं लागले. आपल्या सुसंस्कृत मनावर जुन्या विचारांचा ज्योतिष वगैरे सारख्या पक्या ऑर्थडॉक्स विचारांचा पगडा बसूं द्यावयाचा नाहीं असें त्यांनीं ठरविलें-पण मन कोठें स्वस्थ बसूं देतें ? पुनः विचारांना गति मिळाली. एवढ्यांत—

“ हें काय, मंडळी गेली ? ” असे आश्चर्योद्गार काढणाऱ्या आणि हातांत चहा व फराळाचें ताट घेऊन दरवाजांत उभ्या असलेल्या आपल्या प्रिय पत्नीकडे त्यांचें लक्ष गेलें.

“—मंडळी गेली ? ” परत तोच प्रश्न आंतून आला.

“ हो, गेली आतांच ! ” उत्तर मिळालें.

“ हें काय बाई, अन् वेणूचं टिपण तसेंच पहायचं राहिलं !–मग ज्योतिषानां एवढ्या लांबून बोलवायचं होतं तरी कशाला ? ”

आपल्या पत्नीच्या या प्रश्नानें मात्र गंगाधरपंत विस्मयाविष्ट झाले व चेहेरा उद्गारचिन्हांकित करून क्षणभर ते निश्चल उभे राहिले.

“ तूं काय म्हणतेस—मी समजलों नाहीं ! ”

“ त्यांत काय समजायचं—वेणूचं टिपण पहायला एवढं लांबून शास्त्रीबुवांना आणायचं–आणि मुख्य काम करून न घेतां तसंच त्यांना परत लावायचं–ही कुठली मुलुखावेगळी रीत ? ”

“ मग तूं माझ्याजवळ दिलंस तें कोणाचं टिपण ? ”

“ तुंगभद्रेचं !—मागाहून वेणूचं पाठवून देतें म्हणून सदाशिवाला सांगायला पाठविलं–त्यानं नाहींच का आपल्याला सांगितलं ? काय खेळाडू पोर तरी बाई ! ”

“ अरेरे ! साराच घोंटाळा ! ! ” एवेंढच्च म्हणून गंगाधरपंत गप्प राहिले. संस्कार ही चीज अजब आहे. अमुक एखाद्या गोष्टीविषयीं विचार न करण्याचें

ठरविलें तरी हट्टी मन पुनः पुनः त्या विषयावरच विचार करावयास लावतें. शास्त्रीबुवांच्या तोंडून वेणूच्या भवितव्यतेविषयीं ऐकल्यावर गंगाधर पंतांचें मन फारच अस्वस्थ झालें होतें. फक्त त्यांनीं आपलें अंतरंग बुवांना व विष्णुपंतांना दिसूं न देण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यांच्या सुशिक्षित व सुधारक मनावर जुने भोळे भाबडे संस्कार आपला अधिकार गाजविल्याखेरीज राहिले नाहींत. वेणूचें लग्नच केलें नाहीं तर ? हवें तेवढें शिकेल व आपला मार्ग ती आपणच शोधून काढील. म्हणजे ही सारी आपत्ती टळेल. हे व असल्या प्रकारचे विचार त्यांच्या मनांत येत. पण टिपणाच्या घोंटाळ्यामुळें तें भवितव्य जेव्हां तुंगभद्रेचें आहे असें त्यांना कळलें त्या वेळीं त्यांच्या मनाचें आंदोलन होऊं लागलें. एक वेळ स्वतःच्या मुलीचं लग्न केलं नाहीं तर त्याची जबाबदारी आपल्यावरच रहाते, पण इथें सर्वस्वी आपल्या हवालीं केलेल्या आपल्या भावाच्या मुलीचा प्रश्न येतो. सद्धेतुपूर्वक तिचें जरी लग्न केलें नाहीं तरी जन आपल्यावर आरोप करायला सोडणार नाहीं. आईबापावांचून पोरकी मुलगी म्हणूनच तिच्या बाबतींत आपण तटस्थ आहोंत असेंच सारे जन आपल्याला म्हणेल; व इतके दिवस तिच्या कल्याणासाठीं केलेल्या प्रयत्नांवर पाणी पडणार—आपण कितीही अट्टाहास करून जगाला खरें कारण सांगितलें तरी जग आपल्या शब्दांवर विश्वास ठेवणार नाहीं. समाजाला दुःखी विधवांची संख्या वाढलेली चालते, पण सुखी कुमारिका पहावत नाहीं, अशा विचारांचा कल्लोळ त्यांच्या मनांत सतत चाले. शेवटीं रूढ कल्पनांना बळी पडून त्यांनीं तुंगभद्रेचें लग्न एका सुखवस्तु तरुणाशीं लावून दिलें. पण निष्ठुर दैवानें तिला बरोबर चार वर्षांनीं आपल्या चुलत्याच्या घरीं कायमचेंच आणून सोडलें. शास्त्रीबुवांचें भविष्य खरें झालें ! ही घटना त्यांना कळली असेल कां ? गेल्या दोन वर्षांत हे विचार गंगाधरपंतांना अगदीं संतापून सोडीत.

* * * *

“ बाळ, तूं कोणाचा मुलगा ?

स्टेशनकडे जाणारी ती सडक होती. रस्त्याच्या दुतर्फा घनदाट वृक्ष पसरले होते, व त्या पलीकडे दोन्हीं बाजूस विस्तीर्ण माळरानें पसरलीं होतीं. संध्याकाळची वेळ असल्यामुळें गुरांना घराकडे जाण्याची ओढ लागली होती,

त्यामुळें त्या सडकेंतून इतर वाटसरूंना धडपणें चालणें शक्य नव्हतें. शिवाय मुंबईहून गाडी येण्याची ती वेळ असल्यामुळें रहदारी थोडी अधिकच होती. या वेळीं दोन वृद्ध गृहस्थ आणि त्यांच्यापुढें एक लहानगा मुलगा व सोबत त्याचा नोकर एवढी मंडळी रस्त्याच्या कडेनें चालली होती. मुलाचें नोकराशीं संभाषण रंगांत आलें होतें, "ह्याची आई कुठं असते? तीं शेपटी वर करून कां नाचतात? आपल्याला शेंपूट असतं? तुझं शेंपूट कुठं आहे? ह्याला आई, बाबा, आजोबा, आजी आहे? त्यांचं घर कुठं?" वगैरे प्रश्नाची मालिका विचारून तो मुलगा त्या नोकराला सतावून सोडीत होता. एवढ्यांत बोलण्याच्या भरांत त्याला एका गाईचा धक्का लागला. मागें चालत असलेल्या त्या वृद्ध द्वयापैकीं एकानें त्याला अलगत बाजूला ओढून धरलें व प्रश्न केला.

"बाळ, तूं कोणाचा मुलगा?"

"आजोबाचा!"

"तुझे आजोबा कोण?"

"आतां आगगाडींतून येणार नाई का-ते!"

"तुझं नांव काय?"

"शशि!"

"तूं कुठं रहातोस?"

"तें बगा-तें लांब हिरवं हिरवं दिसतंय ना-तें आमचं घर!"

"कोणतं तें?-अरे तो तर गंगाधरपंतांचा बंगला!"

विष्णुपंत शास्त्रीबुवांना उद्देशून म्हणाले. कांहीं कामानिमित्त ते साताऱ्यास कालच आले होते, व आज सहज सहल करण्यास बाहेर पडले होते.

"काय रे, तो बंगला कोणाचा?" नोकरास उद्देशून विष्णुपंतांनीं प्रश्न केला.

"तो म्होरचा व्हय-गंगाधरपंतांचा नव्हं का?"

"मग हा कोण गंगाधरपंतांचा?" बालकाच्या हनुवटीला हात लावीत शास्त्रीबुवा उद्गारले.

" शेट, हे त्यांच नातू पगा !"

" हो, पण मुलगा कुणाचा ?"

" त्यांच्या लेकीचा ल्योक–वेणूताईचा पगा !"

" वेणूबाईचा ?"

" व्हय्–जी !" या उत्तरानें शास्त्रीबुवा चकित झाले

" किती वर्षांचा असेल रे हा आतां ?"

" सहा वर्से होतील पगा आतां कार्तिकांत !"

" याचे वडील कुठं असतात ?"

" ममईला पगा—आतां रावसाबाबरोबर ते पण येणार ममईहून !"

या उत्तरानं शास्त्रीबुवांच्या अंतःकरणांत कालवाकालव सुरू झाली. ते जागच्याजागीं उभे राहिले. विष्णुपंतांनीं त्याना भानावर आणून परत चालायला सुरवात केली.

" याचे आजोबा आहेत का रे हयात ?" शास्त्रीबुवान पुन्हा एकदा प्रश्न केला.

" म्हजी–रावसाहेब तेच नव्हत का ?–आज त्यांनाच आणाया आम्ही ठेसणावर चाललों !"

शास्त्रीबुवा इतक्या वर्षांच्या काळानंतर खरोखरीच खंगले होते. जरेनें त्यांना सर्वतोपरी ग्रासलें होतें, पण सात्त्विक वृत्तीच्या माणसाच्या चेहेऱ्यावर जें एक प्रकारचें तेज तळपत असतें तें तसेंच पूर्वीप्रमाणें आतांहि त्यांच्या चेहेऱ्यावर उसळत होतें. गंगाधरपंतांच्या त्या गोंडस व प्रेमळ नातवास पाहून तो सहा वर्षांपूर्वीचा प्रसंग–आपली प्रतिज्ञा–या सर्वांचें चित्र त्यांच्या डोळ्यापुढें उभें राहिलें. त्यांची अधु दृष्टि अश्रूंनीं डबडबून गेली. सारी शक्ति आपल्या अवयवांना सोडून जातेशी त्यांना वाटली. बोलतां बोलतां गाडीच्या फाटकापाशीं ते आले.

" विष्णुपंत, शेवटीं मीच हरलों ना–देवा, माझी प्रतिज्ञापालन करण्याच सामर्थ्य मला दे." शास्त्रीबुवांच्या नेत्रांतील अश्रू चमकतांना पाहून विष्णुपंतांनींहि उपरण्यानें आपले डोळे त्यांच्या नकळत पुसले.

"त्याचं काय घेऊन बसलांत, शास्त्रीबुवा, आपण बोलण्याच्या भरांत वाटेल त्या प्रतिज्ञा करतों, पण त्या सर्वांविषयीं असं मनाला का लावून घ्यायचं असतं! समजा, गंगाधरपंत जरी असले तरी ते तुम्हाला तुमच्या प्रतिज्ञेची का आठवण करणार आहेत! आजपर्यंत अनेक व्यवसायांत ते या गोष्टी विसरलेहि असतील." त्यांचें समाधान करण्याकरितां विष्णुपंत बोलले.

"ते विसरले असतील पण मी विसरलों नाहीं ना! आजपर्यंत माझा शब्द केव्हांच फोल ठरला नाहीं. बोलेन तें करून दाखविण्याची शक्ति आतांपर्यंत त्या दयाघनानं मला दिली होती, मग हा वाचेचा खोटेपणा आतांच मला देवानं कसा अनुभवायला दिला! प्राक्तन, दुसरं काय! विष्णुपंत, भेटूं द्या मला गंगाधरपंत, माझी प्रतिज्ञा मी खरी करून दाखविणार. वाक् ब्रह्मापुढं या नश्वर देहाची काय किंमत! स्वप्नांतला शब्द खरा करून दाखविण्यासाठीं हरिश्चंद्र राजानं आपलं अफाट राज्य व संपत्तीचा त्याग करून मृत्युहून भयंकर आपत्ती सोसल्या. मग माझ्यासारख्या मृत्यूच्या दरबाराकडे वाट चालत असलेल्या माणसांनं एवढ्या हाताचाहि मोह सोडूं नये—हरिश्चन्द्राच्या आर्यभूमींत आम्ही जन्मलों ना? हवं तें झालं तरी, विष्णुपंत, माणसानं सत्य सोडूं नये—सत्यापाशींच परब्रह्म असतं, याहून धर्माची—मुक्तीची व्याख्या मी जाणत नाहीं. शिवाय—"

म्हातारा आणखी किती तरी बोलला असता, पण कुणाचें लक्ष जातें न जातें तोंच त्यांना एका सैरावैरा धांवत असलेल्या बैलानं दूर रेल्वे लाइनवर भिरकावून दिलें. आपोआप उघड झांप होणारें तें रेल्वेचें फाटक आतां गाडीची वेळ झाली असल्यामुळें बंद झालें. विष्णुपंतांनीं कठड्यावर चढून आंत उडी मारण्याचा प्रयत्न करण्यापूर्वींच मुंबईची गाडी धडाक्यानें येत असतांना दिसली. शास्त्रीबुवांना तिरमिरी आल्यामुळें चटकन् उठण्याची शुद्धि राहिली नाहीं. विष्णुपंत ओरडले, बुवा, बुवा, उठा—लवकर उठा, पुढून गाडी येते आहे." विष्णुपंतांनीं आंत उडी घेतली पण त्यांना ओढून आणण्यापूर्वींच ती महामाया—मुंबईहून येणारी गाडी—शास्त्रीबुवांची मृत्यु देवता. त्यांच्या देहाची पायघडी घालीत स्टेशनच्या अलिकडेच थडकली. विष्णुपंतांना गाडीच्या वेगाच्या त्या भीषण

आवाजांत सुद्धां पुढील मंद शब्द ऐकूं आले. "माझी प्रतिज्ञा ! देवा-शेवटीं हरलों-प्रतिज्ञा ! !"

* * * *

गाडी मध्येंच थांबली. सर्व उतारू अपघातांत कोण सांपडले म्हणून पहावयास उतरले. गंगाधरपंत व विभाकरही डब्यांतून उतरून अपघाताच्या जागीं आले. त्यावेळीं ऐन संध्याकाळ असल्यामुळें स्पष्ट असें कांहींच दिसत नव्हतें. गंगाधरपंतांच्या पायाला कांहींसें गारगार लागलें.

गाडीच्या कंदिलाच्या मंद प्रकाशांत त्यांनीं शास्त्रीबुवांचा छिन्नविछिन्न देह पाहिला, आणि त्यांचा एक हात शरीरापासून तुटून पडलेला व रक्तानें माखलेला शास्त्रीबुवांचा उजवा हात आपल्या पायांशीं पडलेला त्यांनीं पाहिला. सहा वर्षांपूर्वींच्या प्रसंगाचें चित्र—शास्त्रीबुवांची प्रतिज्ञा—त्यांचा गंभीर ध्वनि—हें मूर्तिमंत चित्र त्यांच्यापुढें उभें राहिलें. त्या भीषण सायंकाळीं प्रतिज्ञापूर्तीच्या प्रतिध्वनीनेंच सारें वातावरण भरून राहिलें असें त्यांना वाटलें.

यशवन्त नोव्हेंबर १९३०



# जगाचा न्याय !



किती विचित्र जगाचा न्याय ! सावाला चोर, गुणवानाला दुर्गुणी, सत्यनिष्ठाला सत्यभ्रष्ट, पातिव्रतेला पतिता बनविण्याची शक्ति या लहरी जगांत आहे. माझ्यासारख्या बिकट परिस्थितींत सांपडलेल्या दुर्दैवी जीवावांचून जगाच्या या विक्षिप्तपणाची कल्पना इतरांना व्हावयाची नाहीं !

जवळ असलेली सारी मालमत्ता विकून माझ्या आईनें माझें लग्न केलें, लग्नाच्या दुसऱ्या दिवसापासून मी सनाथ झालें, पण तिला रस्त्यावर राहण्याइतकी अनाथावस्था प्राप्त झाली. मी माझ्या आईची एकुलती एक मुलगी. कुटुंबाचीं सारीं नातीं माझ्यामध्येंच एकवटलीं असल्यामुळें माझें लग्न होतांच आईला कोणाचाच मायापाश उरला नाहीं. लग्नानंतर आपली व्यवस्था जांवयाकडे होऊन आपल्याला आपल्या मुलीकडेच आजन्म आश्रय मिळेल या आशेनें माझ्या भोळ्या आईनें सारी चीजवस्तु, किडूक-मिडूक विकून एकदांची मला सौभाग्यवती केलें. माझे यजमान माझ्याप्रमाणेंच एकटे होते. दोन माणसांचें पोट भरण्याइतकी त्यांना ताकद होती. पण राक्षसी मन होतें त्यांचें !

माझ्या आईला आश्रय द्यावा म्हणून केवढी विनंति केली मी त्यांची; पण मलाच हांकून देण्यापर्यंत मजल गेल्यावर माझ्या आईनें काशीचा मार्ग पत्करीला, व भिक्षान्नावर तिनें कसेबसे पांचसहा महिने काढले. संसाराच्या त्रिविध तापांतून परमेश्वरानें तिला लवकरच मुक्त केलें, पण माझी दशा काय ? या त्रिविध तापांत होरपळायला माझी नुक्तीच सुरवात झाली होती.

लग्नानंतर अवघ्या दोनच वर्षांनीं देवानें मला माझ्या आजच्या परिस्थितींत आणून सोडलें. अपघातानें तिकडे मृत्यु आल्यामुळें माझी कोणतीच सोय त्यांच्याकडून करण्यांत आली नव्हती. वाडवडिलांची निंदा करूं नये म्हणतात; परंतु असे प्रसंग माझ्यासारख्या एखाद्या दुर्भागी जीवावर कोसळले म्हणजे बोलणें भाग पडतें. एरव्हीं तोंडावाटे जरी अपशब्द काढला नाहीं तरी अंतर्याम

जळतच असतें मग उचंबळून आलेल्या भावनांना व्यक्त करून दाखविलें तर पापाचा अल्पांश तरी कमी होईल !

माझ्या वाडवडिलांची कांहीं मला आठवण नाहीं; कारण ते माझ्या स्मृतिकालापूर्वीच ह्या जगाला सोडून गेले होते. आईजवळ जें कांहीं थोडेंबहुत द्रव्य होतें व स्वकष्टानें तिनें जें कांहीं मिळविलें होतें तें सारें तिनें माझ्या लग्नाकरितां उपयोगी पडावें म्हणून संभाळून ठेवलें होतें. त्यांतील थोड्याशा पैशाचा उपयोग जर तिनें मला शिक्षण देण्याच्या कामीं केला असता तर हें मातृनिंदेचें पाप तरी मला करावें लागलें नसतें. साधारण आपल्या पायावर कोणत्याही परिस्थितींत उभें रहातां येईल एवढें शिक्षण मुलीला देणें हें तिनें लग्न कसेंबसें करून देण्यापेक्षां अधिक हितावह नाहीं काय ! मला थोडेंसें लिहितां वाचतां येत होतें; परंतु तेवढ्या सामग्रीवर माझें आयुष्य मला काढतां येईल अशी जी माझी कल्पना होती ती फोल ठरली.

पतिनिधनानंतर मला आश्रय देईल अशी माझ्या सासर अगर माहेरची एकही व्यक्ति माझ्या आठवणींत नाहीं; त्यामुळें पतिवियोगाचें दुःख मला विसरावें लागलें. जोंपर्यंत पोटाची विवंचना मनुष्याच्या मागें लागली आहे, तोपर्यंत जगांतील दुःखाचे इतर सर्व प्रकार गौणच ठरतात. मीही जगाचा एक घटक होतें; मलाही माझें सारें दुःख बाजूला ठेवून पोटाची टीचभर खळगी भरावी म्हणून रानोमाळ हिंडावें लागलें.

\+ + + +

## " अनाथ महिलाश्रम "

अनाथांच्या अंतःकरणाला आनंददायक अशी ती भव्य पाटी पाहून माझ्या अंतःकरणांत काय झालें, कोणता आनंद उद्भूत झाला हें सांगण्याची शक्ति मजमध्यें नाहीं. स्वतःच्या पायावर उभें राहून उर्वरित आयुष्यक्रम रेंटण्याएवढी माझ्या अंगांत शक्ति नव्हती, याची मला पूर्ण जाणीव होती. अशिक्षित विधवांना जर कोणता योग्य धंदा असेल तर तो स्वयंपाकपाण्याचा ! अनाथांना आश्रय देणारें तें ठिकाण एवढाच बोध मला त्या पाटीवरून झाला. मीही अनाथच होतें. आंत शिरून माहिती काढण्याचा व शक्यतोंवर त्या ठिकाणीं

आश्रय मिळविण्याची खटपट करण्याचा मी निश्चय केला. मला आतां सारें जग वावरायला मोकळेंच होतें व प्रसंगानें मला धीट केलें होतें. आमश्लाघेचा दोष पत्करूनही मी कबूल करतें कीं, मी तरुण व सुस्वरूप होतें. शिवाय साऱ्या जगांत आपुलकीनें पाहणारें असें मला कोणी नव्हतें. अशा परिस्थितींत माझ्यासारख्या विधवेला समाजांत स्वतंत्रपणें वावरणें किती धोक्याचें होतें ! म्हणूनच कोणत्या तरी संस्थेचा आश्रय घेऊन व प्रामाणिकपणें काम करून आयुष्य ढकलावयाचें असा मी निश्चय केला. आपण पुष्कळ निश्चय करतों; पण सर्वच कुठें सिद्धीला जातात ?

अनाथाश्रमाच्या आवारांत मी कसाबसा प्रवेश तर केला. चढतांच उजवीकडे एका खोलींत बऱ्याच स्त्रिया, कांहीं पुरुष व एकदोन पोलीस शिपाई बसलेले पाहून माझें अंतःकरण चर्रर्र झालें. मी कोठें आहे, कसल्या लोकांत आलें आहे, त्या बायका कोण, त्यांच्याबरोबर शिपाई काय म्हणून, अशा अनेक प्रश्नांनीं माझ्या मनांत गोंधळ उडवून दिला. त्यांच्या चर्या मला अत्यंत करुणास्पद वाटल्या. एकदां वाटे मागचा पाय मागें घ्यावा, पण दबकत दबकत जातांना मला त्या सर्व मंडळीनें पाहिलें होतें—मग आतां माघार घेण्यांत काय शोभा ? मी तशीच पुढें गेलें. मला व्यवस्थापकांची भेट घ्यावयाची आहे असें सांगतांच एका लहानशा पोऱ्यानें मला त्या मंडळीच्या शेजारीं असलेल्या एका रिकाम्या बांकावर बसावयास सांगितलें.

व्यवस्थापकांना भेटण्याची ज्या वेळीं माझी पाळी आली तेव्हां मला आल्याला बरोबर दीड तास लोटला होता. माझ्या आसपास बसलेल्या स्त्रियांना आश्रमांत स्थान मिळालें होतें असें दिसतें. कारण ते पुरुष व पोलीस मात्र परत जातांना दिसले. "देवा, मलाही ह्या ठिकाणीं त्यांच्याप्रमाणेंच लवकर आश्रयस्थान मिळूं दे." अशी मीं मनाशींच परमेश्वराची करुणा भाकली.

मी आंत जातांच व्यवस्थापकसाहेबांनीं एका खुर्चीकडे बोट करून मला बसावयास सांगितलें. दरवाजांतून त्यांनीं आसपास डोकावून पाहिलें.

—कां कुणास ठाऊक ? व एखाद्या प्राण्याचा उद्धार करण्यास प्रवृत्त झालेल्या साधूचा आव आणून स्वारींनीं आपली खुर्ची माझ्याजवळ सरकविली व अतिशय मंद अशा स्वरांत बोलावयास सुरवात केली.

" बाई ! मुळीं घाबरूं नका—इथें सांगितलेली हकीकत बाहेर मुळींच फुटावयाची नाहीं ! चुकणें हा मनुष्यधर्मच आहे, त्यांतून तुमच्यासारख्या स्वरुपसुंदर तरुण विधवेचें पाऊल जर वांकडें पडलें तर त्यांत फारसा दोष नाहीं तुमचा; आणि—"

ते गृहस्थ आणखीन् पुष्कळ बोलले असते; पण त्यांच्या त्या बोलण्याचा मला अर्थच कळेना. त्यांनीं आपली अक्कल आणखी उधळूं नये म्हणून मींच त्यांना मध्येंच थांबविलें.

" म्हणजे ?—तुम्ही मला कोण समजतां आहां ! " मी रागानें विचारलें

" आमच्या आश्रमाच्या आश्रयाला येणाऱ्या पैकींच एक ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे !—आतां स्पष्टच सांगूं कां ? आपल्यासारख्या ज्या दुर्दैवी स्त्रियांचें पाऊल चुकून माकून—त्यांच्या अगर इतरांच्या अपराधामुळें, जुलुमामुळें वांकडें पडतें—ज्यांची इच्छा पुढें सन्मार्गानें चालण्याची असते—अशा पतित स्त्रियांच्या मदतीकरितां हा आश्रम स्थापन करण्यांत आला आहे. आपल्यालाही इकडे जरूर आश्रय मिळेल ! पण आपल्याला कोणत्या नराधमानें फसविलें ?—त्याचें नांव काय ? सध्यां आपण कोणत्या परिस्थितींत आहां ?—"

" बस्स करा हा चारगटपणा ? " पुढील वाक्य ऐकणें अशक्य झाल्यामुळें मी मध्येंच ओरडून त्यांना आपलें भाषण थांबविणें भाग पाडिलें. परत वाटलें कीं त्यांच्याशीं मी निष्ठुरपणानें वागलें; कारण आजपर्यंत त्यांची भेट घेणाऱ्या स्त्रिया तसल्याच परिस्थितींतील असल्या पाहिजेत ! त्यांना तसले प्रश्न विचारणें हा त्यांचा नित्याचा व्यवसाय ? मग रागावयाचें काम काय ?

थोडेसें नरमाईवर येऊन मीं म्हटलें, " तुमची कांहींतरी चूक होत आहे समजण्यांत साहेब ! आपल्याला वाटतें आहे त्यापैकीं कोणतेंही संकट सध्यां माझ्यावर कोसळलें नाहीं. मी मनानें व शरीरानेंही अगदीं पवित्र आहें. "

" मग इथें ह्या आश्रमांत आपलें काय काम ? "

" काम मिळविण्यासाठींच तर माझ्या गरिबीनें मला इथें खेंचून आणलें

आहे. मी अनाथा आहे. आपल्या आश्रमाचें नांव अनाथाश्रम आहे. एवढ्या-वरून माझ्यासारख्या अनाथेला इकडे आश्रय मिळेल या समजुतीनें मी इथें आलें आहे साहेब ! एवढा मोठा हा आश्रम, इथें स्वयंपाकपाण्याचें करून मोठ्या आनंदानें, या विस्तीर्ण आश्रमाच्या एका कोपऱ्यांत सारें आयुष्य घालवीन. "

" परंतु आमच्याकडे आपल्याला द्यायला कामच कोठें आहे ? आश्रमांतील स्वयंपाकपाण्याचीं, झाडलोट करण्याचीं सारीं कामें इकडे आश्रय घेऊन राहणाऱ्या स्त्रियाच करतात; आल्यागेल्या भिकार पोरांसाठीं हा आश्रम कांहीं काढलेला नाहीं, समजलांत बाई ! तुम्ही आपली सोय इतर कुठेंही लावा ! "

"नका, साहेब, असें म्हणूं नका !! एवढ्या पांचपन्नास बायकांत माझ्यासारख्या एकस्या जीवाला काय लागणार ? "

" अहो, आणखीन् एका जीवासकट आलां असतां तर तुम्हां दोघांही जीवांची सोय इथें सहज झाली असती ! "

त्याचें तें बाष्कळ भाषण ऐकून माझी तळपायाची आग मस्तकाला पोहोंचली, अनाथ विधवेला हवें तें बोलावें किंवा तिच्या शीलाविषयीं नाना तऱ्हेचे कुतर्क करावे ! पोटाची खांच भरण्याकरितां व कष्टानें आणि अब्रूनें जीवित घालविण्याकरितां विधवांना काय काय अपमान व हालअपेष्टा सहन कराव्या लागतात हें समजायला माझ्याच स्थितींतून जायला पाहिजे. तरी पण त्या अफाट जगांत पृथ्वीची शय्या व आकाशाच्या पांघरुणाखालीं राहणें म्हणजे माझ्यासारख्या तरुण स्त्रीला कसलें दिव्य वाटतें याची पूर्ण कल्पना असल्यामुळें मीं परत त्या चांडाळाची विनवणी करण्याचा प्रयत्न केला.

" साहेब ! असें कसें बरें म्हणतां आपण ! आपल्या आश्रमांत ज्या दुर्दैवी स्त्रियांना येणें भाग पडतें आहे, तें तरी त्यांच्या असहाय स्थितीमुळेंच ना ! अशा वाट चुकलेल्या स्त्रियांना सन्मार्गाला लावून देण्याचें पुण्यकर्म आपली संस्था करीत आहे ना ? मग मी अद्याप वाट चुकलें नाहीं. सरळ मार्गाला आतांच नेण्याची व प्रामाणिकपणें आयुष्य काढतां यावें याचीच याचना मी आपल्यापाशीं करीत आहे ना ? यांत माझी चूक कोठें आहे ? वाट चुकलेल्या वासरांना हुडकून आणण्यापेक्षां त्यांना वाट चुकायची संधि न देणेंच बरें नाहीं ?

महाराज, मी आपल्या पायां पडतें. या अफाट जगांत मी कुणाच्या आश्रयाला जाऊं! कुणाचे पाय धरूं? मी स्त्री! त्यांतून तरुण विधवा!! आपल्याकडे आलेल्यापैकीं शेंकडा नव्याण्णव स्त्रिया माझ्यासारख्या असहाय्य स्थितीमुळें या दुर्नीतीच्या मार्गाला लागल्या असाव्यात! महाराज, या अधःपातापासून ह्या अबलेचें रक्षण करणें आपलें काम आहे!"

"तें सर्व खरं आहे बाई! पण मी तरी काय करणार? मीही संस्थेचा नोकर आहे. मला तरी संस्थेच्या नियमबाह्य वर्तन कसें करतां येईल?"

"साहेब, साधक बाधक विवेकाची किंमत व्यवहारांत कांहींच नाहीं का? नियमाचें पालन इतकें अक्षरशः का करायचें असतें सुज्ञांनीं?—समजा, आपण म्हटल्या स्थितीमध्यें जर मी आपल्याकडे आश्रयाची याचना केली असती तर?—"

"वा! तर मग काम फारच सोपें व सरळ रीतीनें झालें असतें! हा फॉर्म नुसता भरायचा न इथें सुखानें रहायचें!"

"म्हणजे? एखाद्या स्त्रीनें जर प्रामाणिकपणें व पावित्र्यानें राहून आयुष्य कंठायचें मनांत आणलें तर आपली संस्था तिला मदत करायला तयार नाहीं, असेंच ना?"

"होय असेंच!"

"तिनें पापाच्या पंकांत रुतूनच आपल्या उद्धारार्थ अपेक्षा करायची?" हे शब्द जवळ जवळ मी माझ्याशींच उच्चारिले.

एखाद्या विस्तीर्ण वृक्षाची घनदाट छाया पाहून त्याखालीं विश्रांतिसुख मिळविण्याची इच्छा धरावी व तो वृक्षच आपल्या अंगावर समूळ कोलमडून पडावा अशीच माझी स्थिति झाली.

*   *   *   *

जो पहावा तो आपल्याच कामांत दंग! ही मुंबईची स्थिति!! तिथें माझ्यासारख्या निःसहाय जीवाची चौकशी करायला वेळ कोणाला? गिरगांवचाच रस्ता होता तो! ऐकून माहीत होतें, कीं साधारण चांगल्या लोकांची वस्ती होती ती! चटकन् विचार आला कीं एखाद्या कुटुंबांत जर काम मिळालें तर कांहीं वाईट नाहीं. जन्माची ददात मिटेल! विचार येतांच समोरच एक मोठें

आवार असलेलें घर पाहतांच मी आंत शिरलें. ओटीवर दोन मुलें खेळत होतीं. मला पाहतांच एकानें आंत जाऊन वर्दी दिली असावी; कारण हां हां म्हणतां गारुड्याचा खेळ पाहायला ज्याप्रमाणें प्रेक्षक जमतात त्याप्रमाणें मला पाहण्यासाठीं घरांत असलेली झाडून सारी मंडळी बाहेर आली असें मला त्यांच्या संख्येवरून वाटलें. मला चमत्कारिक वाटलें. पशु-संग्रहालयांत चोहों-कडून रोंखून पाहणारीं माणसें पाहून पिंजऱ्यांतलि जनावरांना ओशाळल्यासारखें होतें; तद्वत् माझी स्थिति झाली.

" काय पाहिजे आहे बाई तुम्हांला ? " एका पोक्त दिसणाऱ्या बाईनें प्रश्न केला.

" एखादें काम मिळेल का मला या घरीं ? "

" ही शाळा आहे कीं खानावळ आहे असें तुला वाटतें ? "

" हें एका सभ्य कुटुंबाचें घर आहे अशी माझी समजूत आहे. "

" बरीच चुणचुणीत दिसते !—बरें बाई, या घरांत कसलें काम मिळेल असें वाटलें तुला ? मेल्या शिकल्यासवरलेल्या लोकांचे कोण हाल कामें मिळवितांना ? "

" पण मी कसल्याही दर्जाचें काम प्रामाणिकपणें करायला तयार आहे. "

" काय येतें ग तुला ? "

" मला काय येणार विशेष ? साधारण स्त्रीला जें स्वयंपाक पाण्याचें शिक्षण लहानपणापासून मिळतें तेंच मला येत आहे ! "

लिहितां वाचतां येतें का ? " त्या सर्व जमावांत साधारण सुशिक्षित अशा दिसणाऱ्या स्त्रीनें प्रश्न केला.

" होय, साधारण येतें ! "

" हिशेबठिशेब ! "

" साधारणच ? "

" साधारण ?—कमाल झाली बाई तुमची ! इतकें वय शिकल्या केल्या-वांचून घालविलंत !— मी म्हणत नव्हतें बाबू, कीं स्त्रियांना सुशिक्षित केल्या-वांचून त्यांची आर्थिक उन्नति होणार नाहीं ! " शेवटचें वाक्य तिनें एका तरुणाला उद्देशून उच्चारलें.

" माझ्या मतें तर स्त्रीशिक्षण वाढवायाला, अशा ज्या लग्नासाठीं उतावीळ होऊन अर्धवट शिक्षण सोडलेल्या स्त्रिया आहेत, त्यांना समाजानें मुळींच मदत करूं नये, अशा स्थितींत. " त्या बाबू नांवाच्या गृहस्थानें उत्तर केलें पण त्याचा प्रत्येक शब्द माझ्या अंत:करणाला झोंबला.

" महाराज, मी शिकलें नाहीं हा दोष माझा नसून माझ्या आईबापांचा नव्हे का ! "

माझ्या स्थितीबद्दल अनुकंपा उत्पन्न करण्याच्या उद्देशानें मी म्हटलें.

" आहे का तुझी शिकण्याची इच्छा ? "

" नुसती इच्छा असून काय उपयोग ? "

" अग, इच्छा असणें म्हणजे अर्धे अधिक काम हातीं आलें म्हणायचें !–मी चिठ्ठी देतें ती घेऊन घाटकुपरला या पत्त्यावर जा–म्हणजे तापीबाई आपल्या शाळेंत तुला घेतील ! " आपण स्त्रियांच्या शिक्षणप्रसारांत फार मोठें कार्य केलें अशी कृतकृत्य मुद्रा करून त्या बाईनीं मला खरोखरीच एक पत्र लिहून दिलें.

पोटांत भुकेनें काहूर माजलें होतें. अशा वेळीं शाळेंत जाऊन शिकून तयार व्हायचें, नंतर स्वतःच्या पायावर उभें राहयचें ही कल्पना जरी कितीही रम्य व उत्तेजक असली तरी दुपारची भ्रांति पडल्यावर या कल्पनेंतील अनुपम सौख्य कुणा जीवाला उपभोगायला आवडेल ?

" ताई, मी उपाशीं व आश्रयहीन आहे. आपण माझी आपल्या घरीं व्यवस्था केल्यास मी काम करून उरल्या वेळांत जरूर शाळेंत जाईन. "—माझ्या भुकेल्या पोटानें मला अन्नासाठीं याचना करावयास लावलें.

" बाई, बाई. बाई ! शर्थ झाली तुम्हां बायकांच्या लोचटपणाची ! भटाला दिली ओसरी न् भट हातपाय पसरी गऽबाई ! " एवढी भीक मागत फिरत होतीस तर शाळेंत फुकट शिकायला मिळेल अशी सोय करून दिली हिनें–तों तुमचें भिकारणीचें वाढतच चाललें एकेक ! " आतांपर्यंत गप्प बसलेल्या त्या पोक्त बाई म्हणाल्या.

" अन् आई, ठेवलेंही असतें; पण ह्या रस्त्यावर फिरणाऱ्या बायका ! धड जात, गोत, कूल, शील कांहीं नसायचें ! बारा गांवचें पाणी प्यालेल्या ह्या ! "

एका सुशिक्षित व समजुतदार स्त्रीनें दुसऱ्या एका अनाथ स्त्रीबद्दल असे अविश्वासाचे व अनुदारतेचे उद्गार काढले याचें मला नवल वाटलें. माझा सर्व आयुष्यक्रम विचारून, मला तिच्याकडून सहानुभूति मिळेल व आश्रय मिळेल ही माझी अपेक्षा विफल ठरली. एवढेंच नाहीं. पण माझ्या शीलाबद्दल तिनें संशय प्रगट करतांच माझी सुप्त अभिमानाची ज्योत जागृत झाली. क्षणभर मी भूक तहान सर्व विसरलें. " बाई, आपल्याला मदत करायची नसेल तर करूं नका; परंतु माझ्या शीलाबद्दल मात्र थोडासाही संशय घेतलेला मला खपायचा नाहीं ! "

" भिकारीण न् ऐट किती ? एवढी मिजास आहे आपल्या शीलाची तर आण कुणाचें शिफारसपत्र, आतां ठेवतें कामाला ! "

एखादी–बिन–ओळखी अशिक्षित न् भिकारणीच्या दर्जाला पोंचलेल्या स्त्रीला शिफारसपत्र कोण देणार ? न् कुलशील हीन ठरलेल्या माझा टिकाव त्या सुशिक्षित समूहाच्या डावपेंचापुढें कितपत टिकला असता ?

*　　*　　*　　*

एकंदरींत मी मनानें कितीही पवित्र राहिलें तरी सद्यःस्थितींत जग मला कलंकिताच समजणार ! जगाच्या दृष्टीनें भिकारीण ठरलेली मी कितीही अट्टाहासानें माझें पावित्र्य प्रस्थापित केलें तरी माझें खरें कोण मानणार ! तरुण सुंदर विधवा आपल्या जीवाचें पाणी करून आपलें पावित्र्य टिकवूं शकेल ही कल्पनाच समाजाला अशक्य वाटते. आज दोन दिवसांची मी उपाशी होतें. इतके दिवस एखादा पैसा मिळाला म्हणजे मी त्याचे चुरमुरे खाऊन एखाद्या देवळांत रात्र घालवीत असे, पण आज दोन दिवस भुकेनें माझे प्राण बाहेर येऊं पहात होते. मनुष्याच्या आयुष्यांतील आणीबाणीचा प्रसंग हाच असतो ? अशी स्थिति कुठवर सहन करणें शक्य होतें ! एक क्षणभरच विचार आला कीं, आपण पतित आहोंत असा नुसता कबुलीजबाब देऊन जगाच्या आड अनाथाश्रमामध्यें प्रामाणिकपणें दिवस कां घालवूं नयेत ! मनाला समाधान तरी वाटेल ! सुरक्षितता वाटेल ? ? नाहींतर बाहेरच्या जगांत माझ्या सारख्या एकट्या स्त्रीचें पवित्र जीवन पतित करायला केवढे मोह, केवढीं संकटें ' आ ' पसरून बसलीं आहेत ! जग मला पापी समजेल,

समजेना! माझें अंतर्याम त्या सर्वसाक्षी परमेश्वरापुढें माझ्या पावित्र्याची ग्वाहीच देईल ! ! या कल्पनेनें मला दुप्पट अवसान आलें. भूक तहान मी विसरलें. हें शेवटचें नाटक करून पाहावयाचें मीं ठरविलें.

* * * *

धापा टाकीतच मी अनाथाश्रमाच्या आवारांत प्रवेश केला. व्यवस्थापक खोलींत एकटेच होते. मला आलेली पहातांच त्यांना आश्चर्य वाटलें.

"कां आल्यात बाई परत ! मी सांगितलें ना मागें, कीं तुमची सोय येथें होणार नाहीं म्हणून ?"

"होय साहेब—पण त्या वेळीं !" पुढले शब्द माझ्यानें उच्चारणें जड वाटूं लागले.

"आतां कशा आलांत वळणावर ? अहो पापाचा घडा फुटणारच केव्हां तरी ! त्या वेळीं पातिव्रत्याचा केवढा आव आणला होतात—घ्या आतां ! त्याच दिवशीं कबूल झालां असतात तर एवढ्या हाल अपेष्टा कशाला सहन कराव्या लागत्या !"

"खरेंच साहेब, पण मी आपल्या तोंडी कसें सांगावें ? आमचें विधवांचें जीवन किती नाजूक !—किती धोक्याचें असतें याचा अनुभव मला पूर्णपणें आला साहेब !

"काय हकीकत आहे तुमची ती आतां कांहीं आडेवेढे न घेतां सरळ सांगा, म्हणजे रिपोर्टात भरायला बरं पडेल." चष्म्यांतून आपली दृष्टि माझ्या नजरेला भिडवून भेदक दृष्टीनें ते माझ्याकडे पाहूं लागले.

पतितेलाही आपण पतित आहों असें स्वमुखानें सांगणें जड जातें तर केवळ परिस्थितीमुळें पवित्र असतांही माझ्या खोट्या अधःपतनाची हकीकत त्या मांगाच्या अंतःकरणाला पाझर फुटावा म्हणून रंगवून सांगतांना माझ्या जिवाचे जे हाल झाले असतील, अंतःकरणाला ज्या वेदना झाल्या असतील, आंतड्याला जो पीळ पडला असेल, त्याचें योग्य चित्र कल्पनेनें कुणालाही रेखाटतां यावयाचें नाहीं. तें तसें सांगण्याची पाळी आली म्हणूनच माझें अंतःकरण भरून आलें, डोळ्यांवाटे अश्रूंची धार लागली. त्यावेळीं मी घेतलेल्या भूमिकेला त्याची मदतच झाली. मी स्फुंदून स्फुंदून सांगूं लागलें.

" महाराज, मी कबूल करतें, मी पतिता आहे; आपण त्यावेळीं म्हटल्याप्रमाणें माझा अधःपात खरोखरीच माझ्या चुकीनें न होतां माझ्या परिस्थितीनें घडवून आणला आहे. माझे पति वारल्यापासून महाराज, मी अनाथ झालें; नात्यागोत्याचीं माणसें कोणी राहिलीं नाहींत. असहाय व निर्धन स्थितींत मदतीला कितीशा मैत्रिणी धांवून येणार ? राहत्या घरांतून बाहेर पडून मला जगाचें घर करावें लागलें. नोकरीला लावतों असें सांगून माझ्या माहितींतल्या व मी सभ्य समजणाऱ्या एका गृहस्थानें नोकरीचें आमिष दाखवून मला आश्रय दिला. पण थोड्याच दिवसांत समजून आलें कीं, स्त्रियांच्या शीलाचा बाजार वसविणाऱ्या नराधमाच्या टोळींत मी सांपडलें आहे. महाराज, इथेंच माझ्या पावित्र्याचा भंग झाला—आतां मी जरी कलंकिता असलें तरी माझें अंतःकरण शुद्ध आहे ! माझ्यासारख्या आणखीन् दोन दुर्दैवी स्त्रिया त्यांच्या टोळींत सांपडल्या आहेत. आम्हांला बाहेरगांवीं नेण्याकरितां स्टेशनावर नेण्यांत आलें. त्यांची नजर चुकवून मी वाट मिळेल तिकडे पळत सुटलें व आपला आश्रम पाहिला-पण आपण त्यावेळीं मला आश्रय दिला नाहीं. माझीच चूक झाली त्यावेळीं ! गावांत आश्रय मिळेल म्हणून हिंड-हिंड-हिंडलें; पण आज संध्याकाळीं त्या नराधमाला मी याच गांवांत पाहिला, त्याच्या नजरेआड होण्यापूर्वीच तो माझ्यामागें लागला. महाराज, हीच माझी हकीगत ! तो आतां कदाचित् या आवाराच्या बाहेर असेल. महाराज, मला आतां इथून लोटून त्या मांगाच्या हातीं देऊं नका." असें म्हणून मी मनसोक्त रडूं लागलें. प्रसंग शहाणपणा शिकवितो म्हणतात तें खरें. माझ्या प्रसंगानेंच मला कल्पकतेची मदत केली. आजपर्यंतच्या ऐकलेल्या गोष्टींचा उपयोग केला. माझ्या नाटकाचा इष्ट तोच परिणाम घडून आला. मी आश्रमवासिनी बनलें.

आश्रमाला भेट देणाऱ्या व्यक्ती माझ्या पतितत्त्वाबद्दल सहानुभूतीचे सुस्कारे टाकतात—पण कायमचें आश्रयस्थान मिळाल्यामुळें निश्चिंत्य पावलेलें माझें शरीर व मन सात्त्विक आनंदाचा मनमुराद आस्वाद घेतें.

रत्नाकर 'महिला अंक' नव्हेंबर १९३२.



# याला जबाबदार कोण ?



सर्वस्वी मीच ! ह्या सर्व अनर्थाला कारण ! देवाला, दैवाला दोष देण्यांत काय अर्थ ? चंद्रावर पृथ्वीची छाया पडली कीं चंद्रग्रहण लागतं म्हणतात. माझ्या संसार चंद्रावर छायेची छाया पडली, आणि माझ्या वैवाहित आयुष्यास ग्रहण लागलं ! वडिलांच्या जीवावर, भावा भावजयांचीं कुत्सित बोलणीं खाऊन, माहेरीं मी आज घास गिळीत पडलें आहे. पुष्कळदां विचार येतो, ह्या स्थितीला कारण कोण ? एकदां वाटतं तिकडची स्वारी ! एकदां वाटतं छाया, पण पूर्ण विचारांती खात्री होते कीं ह्या सर्व अनर्थाला कारणीभूत कोण, मीच ! कशी म्हणाल ?—

असंख्य मानवी जीवांनीं हें पृथ्वीतल गजबजलें आहे, परंतु " यथा काष्ठं च काष्ठं च " या न्यायानं ह्या भवसागरांत ऋणानुबंधानुसारच कांहीं विवक्षित व्यक्तींच्या गांठीभेटी पडत असतात. नाहीं तर शेंकडों मैलांच्या अंतरावर बसणाऱ्या व्यक्तींत जीवभावाची मैत्री आढळते, तर शेजारच्या खोलींत राहणाऱ्या व्यक्तींशीं कधीं बोलण्याचाहि प्रसंग येत नाहीं; आपल्या जीवन क्षितिजावर हे नवीन नवीन मैत्रीचे तारे प्रकाशतांना त्यांच्या परिणामाचें भविष्य ज्योतिषशास्त्र जर अगाऊ सांगेल तर केवढाले दारूण प्रसंग आपल्याला टाळतां येणार आहेत—पण !—

छायेची व माझी भेट अशीच अचानक शाळेंत झाली. नांवाप्रमाणेंच किंबहुना तिच्या वर्णानुसारच तिचं नांव ' छाया ' हें ठेवलं असावं ! छाया रंगानं सांवळीं असली तरी फार मोहक होती. तिचा बांधा सुदृढ होता. रंगाच्या गोरेपणामुळें एखादी बायको प्रथमच सौंदर्यवती दिसूं शकेल परंतु नित्याच्या परिचयानें तिच्या सौंदर्याचा हिणकसपणा प्रत्ययास येईल. छायेच्या सहवासांत राहणाऱ्यांना तिच्या प्रत्येक अवयवांत सौंदर्याची मोहकला दिसल्यावांचून

राहणार नाहीं. एखाद्या कलावन्ताला छायेची मूर्ती कलेचा नमुना म्हणून स्फूर्तिदायक वाटली असती. एखाद्या चित्रपटांत छायेच्या शामसुंदर मूर्तीला हजारांनीं मोल आलं असतं. आम्हीं शाळेंतही तिला ' शाम्सुंदरी ' ह्या अन्वर्थक नांवानेंच हांक मारीत असूं. पण त्याबद्दल तिला केव्हांही विषाद वाटला नाहीं. कारण आपल्या कृष्णसौंदर्यांतसुद्धां मोहकतेची मादकता आहे, ह्याची तिला पूर्ण जाणीव होतीसें दिसतें. तिच्या त्या आकर्षक चेहेऱ्यामुळें व पोषाखांतील सदभिरुचि व टापटिपीमुळें तिच्या मूळच्या सौंदर्यांत भर पडे. किंबहुना ती आपल्या विशेष टापटिपीमुळेंच पाहणाराचें मन आपल्याकडे ओढून घेई. तिचा स्वभावही तिच्या त्या गोड रूपास साजेसाच असल्यामुळें तिनें फारच थोड्या अवधींत शाळेंतील विद्यार्थिनीं व अध्यापिका वर्गांमध्यें लोकप्रियता मिळविली.

माझं सौंदर्य लौकिक सौंदर्याच्या कक्षेंत मोडतां येण्यासारखं असल्यामुळें सौंदर्याच्या बाबतींत आम्हीं केव्हां कधीं एकमेकींच्या प्रतिस्पर्धी होऊं ही कल्पनाच माझ्या मनांत येऊं शकली नाहीं. छायेची व माझी गाढ मैत्री जमली. मुलींचं शाळेंतील जीवन किती अस्थिर असतं ? मैत्रीमध्यें टिकाऊपणा अशा अस्थिरावस्थेंत कसा राहयचा ? मुलींच्या शिक्षणांत जोपर्यंत कोणत्याही प्रकारचं ध्येय आंखलेलं नसतं, तोपर्यंत त्यांचा शिक्षणक्रम अनिश्चितच ! हिंदु मुलींच्या शिक्षणक्रमाला वडील माणसांकडून फारसं महत्त्व दिलं जात नाहीं. चांगलंस स्थळ मिळेपर्यंतच हिंदु मुलींच्या शिक्षणाची साधारणतः मर्यादा असते. माझ्याही बाबतींत तसंच घडून आलं.

मुंबईकडे एक बऱ्यापैकीं स्थळ बाबांच्या नजरेस आलं—आणि इथंच माझ्या शिक्षणाची परिसमाप्ति झाली. छायेपासून दूर जाण्याच्या कल्पनेनं मला फार वाईट वाटलं. छायेनं मला धीर दिला.

" प्रभावति ! तूं कितीहि दूर गेलीस तरी छाया कांहीं तुला सोडायला तयार नाहीं. ' छायेवांचुनि कधीं प्रभा ती कुणी पाहिली काय ? "

काव्यार्धांत तिनें आपल्या बोलण्याचा शेवट केला. तिच्या विनोदानें मी ही उल्हसित झालें. तिच्या स्वभावांतील हेंच वैशिष्ट्य-गंभीर प्रसंगींही विनोदानं बोलण्याचें तिचें वैशिष्ट्य आम्हां सर्वांना फार आवडे. मीहि विनोदानें म्हणालें—

" नासे.......प्रवास गमनें स्नेह ! " असं म्हणण्याची पाळी आणावयाची नाहीं बरं कां छाया ? "

त्या दिवशीं गोदावरीच्या कांठीं अस्तमानास छायेचा मी निरोप घेतला. दोन एकत्र आलेले जीव परिस्थितीच्या फटकाऱ्यासरसे एकमेकांपासून विभक्त झाले—पण फार उशीरां मला कळून आलें कीं ते विभक्त झाले पण " पुनर्मिलनाय च ! "

× × × ×

माझं वैवाहिक जीवन कोणीही हेवा करण्याएवढं सुखाचं होतं. तिकडली स्वारी मुंबईतील एक नामांकित व प्रख्यात चित्रकार होती. धंद्यांत त्यांचा चांगलाच जम बसलेला होता. त्यांची दृष्टि कलावंताची असल्यामुळें कोणत्याहि सौंदर्ययुक्त वस्तूनें त्यांच्या मनाला अतिशय मोह पडत असे. मग ती वस्तु पुरुष असो, स्त्री असो, एखादं मूल असो, लहानसं फूल, चांदणी असो, अगर एखादी कलाकुसरीची वस्तु अगर वस्त्रप्रावरण असो, त्याबद्दल त्यांना अतिशय प्रेम वाटायचं ! अशा सुंदर वस्तूंचा संग्रहहि त्यांनीं आमच्या घरांत करून ठेविला होता. जी जी वस्तु सुंदर दिसायची ती ती वस्तु त्यांनीं माझ्याकरितां खरेदी करून आणली नाहीं असा एकही दिवस जायचा नाहीं. त्यांच्या ह्या सौंदर्योपासक वृत्तीला मी उत्तेजन द्यावं हीच त्यांची इच्छा ! पण माझ्या हातून तें कांहीं सिद्धीला गेलं नाहीं. मला नेहमीं म्हणायचं होई.

" प्रभा, तूं खरोखरीच सुंदर आहेस, पण मिटलेल्या कळींत जें सौंदर्य लपून असतं तसं तुझं आहे. तुझ्या घट्ट बांधलेल्या केसांच्या प्रत्येक वळींत सौंदर्य खच्चून भरलं आहे. पण त्या सौंदर्याचा विकास व्हावयाला वाव नाहीं. " मी जरी सधन कुटुंबांतली असलें तरी भरींव गोटपाटल्या, भरदार मोत्यांची कुडी, फार तर नवीन डायमंड तासाच्या मुंबईच्या मानानें मात्र पंधरा वर्षांनीं जुन्या ठरलेल्या दोन दोन तीन तीन बांगड्या, एखादं टोपपदरी इरकली लुगडं, जरीच्या खणाची चोळी व त्यावर एक बिन् बाह्यांची बंडी हीच आमची जास्तींत जास्त फॅशनची कल्पना. लुगड्याच्या व चोळीच्या रंगांत कांहीं योग्य प्रकारची एकतानता लागते, याची आमच्या गांवढळ मनाला काय कल्पना पण ह्या बाबतींत तिकडून मला बरेंचसें सहाय्य होई.

आज मला तिकडच्या मित्राच्या घरीं चहाला जावयाचं होतं. तिकडची इभ्रत राहावी म्हणून माझ्या मनानें मी खूपच थाट केला. केंस विसकटूं नयेत म्हणून विशेषच तेल चोपडलें होतें. आईनं दिलेलं इरकली निळसर रंगाचं लुगडं मी आज नेसलें. गुलाबी रंगाच्या जरीच्या खणाची चोळी व त्यावर केशरी रंगाची बंडी घातली. नेहमींच्या बोरमाळेवरूनच मोत्याचं पेंडोळं घातलं पण इतक्यांत आरशांत मागें तिकडची स्वारी नखशिखांत तयार होऊन उभी राहिलेली पाहिली. माझ्या वेषभूषेबद्दल आतां स्तुती होईल असं मला वाटलं. आम्हां स्त्रियांना आपल्या पतीकडूनच स्तुति करून घेण्यांत खरी धन्यता वाटते हें मला आतां कळत आहे. तेव्हांही कळत होतं, वळलं मात्र नाहीं. तिकडून म्हणायचं झालं " काय आज हा पोषाख केला आहेस ? परवां आणलेलं तें पातळ व तो ब्लाऊज कां घातला नाहींस ? अन् हें काय रूपाचं बेरूप केलं आहेस ? "

" नेसेन केव्हां तरी पातळ ! चार चौघांत छिचोर पोषाख करून कसं जायचं ? "

तिकडून स्वस्थ राहायचं झालं.

ह्याच अमंगल घटकेपासून माझ्या सुखास क्षय लागावयास सुरवात झाली.

* * * *

" तिथंच काय पहात राहायचं ? असं बायकांच्याकडे सारखं पाहाणं सभ्य गृहस्थाला बरं दिसत नाहीं ! "

" पाहाण्यासारखी वस्तू असल्यावर पाहूं कां नये ? डोळे बंद करून घेऊं का ? ए थिंग ऑफ ब्यूटी इज ए जॉय फॉर एव्हर. नाहीं कां ? "

" असं कोडग्यासारखं बोलणं शोभत नाहीं आपल्या सारख्या सुशिक्षित म्हणवून घेणाऱ्या गृहस्थाला—माझ्याकडे जर असं कुणी सारखं टक लावून पाहत राहिलं तर आपल्याला आवडेल ? बोला ! असं झालं तर आपल्याला काय वाटेल ? "

" काय वाटेल ? धन्यता वाटेल ! माझ्या पत्नींत इतरांच्या सदभिरुचीला जागृत करण्यासारखें कांहींतरी आहे ह्या जाणिवेनें मला धन्यता वाटेल ! पण माझ्या नशिबीं तें नाहीं. " असें म्हणून तिकडून एक सुस्कारा टाकल्याचें मला ऐकूं आलें.

त्या संध्याकाळीं आम्हीं मलबारहिलवरील हँगिंग गार्डनवर सहल करावयास

गेलों होतों. तें ठिकाण म्हणजे मुंबईच्या सौंदर्याची फुलबाग! नाना तऱ्हेची फुलपाखरं तिथं स्वच्छदानं उडत असतांना दिसायची! प्रत्येक पांखराची तऱ्हा वेगळी! एकाची तऱ्हा दुसऱ्यांत नाहीं सांपडायची. आमच्याजवळ दोन दक्षिणी मुली बागडत बसल्या होत्या. फॅशनच्या सदराखालीं ज्या ज्या गोष्टी येऊं शकल्या असत्या त्या सर्व त्या दोघींत एकवटल्या होत्या. त्यांच्याकडे सारखं टक लावून तिकडून पाहणं चाललं होतं. तें पाहून मला कससंच वाटलं व वरील प्रश्न मी त्यांना केला.

बराच वेळ आम्ही दोघेहि मुग्धावस्थेंत बसलों. कांहीं वेळानं तिकडून म्हणायचं झालं, "प्रभावती मला ज्या गोष्टी आवडतात, ज्या गोष्टींत धन्यता मानून घ्यायला मी तयार आहे, असल्या गोष्टी तूं माझ्याकरितां कां करूं नयेस? तुला ईश्वरानं चारचौघांत उठून दिसेल असं रूप दिलं आहे, जरा नीटनेटकी वागलीस, तरबेजपणा दाखविलास तर तुझ्या नैसर्गिक सौंदर्यांत अधिक भर पडल्यासारखें होणार आहे.

"पण, मला नाहीं बाई वेश्येसारखं नटायला मुरडायला न् लोकांच्या कुटाळ दृष्टीचा विषय व्हायला आवडत!"

"प्रभा, ह्या फुलांकडे पहा! हीं फुलं जर आपआपल्या विविध रंगांनीं मनुष्याचं मन रंजविणार नाहींत तर ह्या फुलांपासून आपणाला काय उपयोग! स्त्री ही सौंदर्याची मूर्ति परमेश्वरानं घडविली आहे. साऱ्या राष्ट्रांतील स्त्रिया सौंदर्योपासक आहेत. आपणच तेवढे लोक जुन्या कल्पनांना इतकं चिकटून आहोंत. जुन्या आर्यवर्तातील स्त्रिया खास तुमच्यासारख्या नव्हत्या हें कालिदासादि कवींच्या काव्यांतील स्त्रियांच्या वर्णनावरून कळून येईल. बरं, प्रभा! मी एकच प्रश्न विचारूं तुला? आपलं लग्न होण्यापूर्वी त्या दामोदरपंतांशीं तुझा विवाह घाटत होता. ऐश्वर्यानें ते माझ्याहून केवढे तरी श्रेष्ठ, पण त्यांच्या अगदीं जुन्या बालबोध वळणाच्या राहाणीवरूनच तूं तें स्थळ नाकारलं नाहींस कां?"

"अगऽबाई ही गोष्ट आपल्याला कशी कळली?"

"कशी कां कळेना पण ती खरी आहे कीं नाहीं?"

"इश्श! आतां त्या गोष्टी कशाला काढायच्या! ज्याचा जसा ऋणानुबंध असेल तसं आपोआप घडून येतं."

" पण तुम्हांला असा गबाळग्रंथी नवरा मात्र चालत नाहीं. मग आम्ही पुरुषानं मात्र तुमच्याकडून एवढीही अपेक्षा कां करूं नये ? प्रभावति, माझी दृष्टि कलावंताची आहे. प्रत्येक स्त्रीमध्यें कांहींतरी सौंदर्याचा अंश असतोच अशी माझी समजूत आहे. म्हणून कोणीही सौंदर्ययुक्त वस्तुव्यक्ति पाहतांना कोणत्याहि तऱ्हेची मादक दृष्टि माझी नसते. परंतु समाजाच्या दोषैक दृष्टीला माझ्या पाहण्यांत तुझ्याप्रमाणेंच कदाचित् विपरीतता दिसून येत असेल-प्रभा ! वागणार ना माझ्या मनाप्रमाणं ? तुझं रूप-तुझ्या सौंदर्याचा विकास मला आवडला म्हणजे झालं-तुला इतर जणांशीं काय कर्तव्य आहे ? "

त्यांच्या सौंदर्यमिमांसेंत मला कांहीं फारसा आनंद वाटला नाहीं. " होय ! आपल्या आवडीप्रमाणं राहण्याचा मी प्रयत्न करीन " एवढंच आश्वासन मी दिलं.

* * *

" नेहमीं म्हणायचं ना तुला कोणी मैत्रीण नाहीं म्हणून ! ही घ्या माझी बालमैत्रीण राहायलाच येणार आहे दोन महिन्याकरितां. "

" कोण बुवा ही बालमैत्रीण ?— अन् एकदम दोन महिने मुक्काम ! हें कसं जमणार ? "

" हें पत्रच सांगेल आपल्याला. " असें म्हणून मी नुकतंच माझ्या नांवावर आलेलं पत्र त्यांच्या हातीं दिलं. पत्र वाचून होतांच तिकडून म्हणायचं—" हूं ! एकंदरींत ह्या तुमच्या छायाबाईचं प्रकरण बडं दिसतयं ! चांगल्या बी. ए. पर्यंत शिकल्या आहेत, तेव्हां त्यांच्या तोलानंच आपण राहला पाहिजे. बाकी दोन महिने त्यांच्या तैनातींत तूं अन् मी घालवायचे म्हणजे—"

" म्हणजे बिणजे कांहीं नाहीं अन् आपल्याला वाटतं तसं तें प्रकरण नाहीं. माझी छाया इतक्या वर्षांनीं बदलली असेल असं मला नाहीं वाटत. दोन नाहीं चार महिने राहिली तरी आपल्याला तिचा कसा त्रास पोंचणार ? अन् तिच्या गोड स्वभावामुळें आपल्यालासुद्धां ती हवीशीच वाटेल ! " भवितव्य जणूं माझ्या तोंडीं वरील शब्द वदलें.

छाया आली. किती वर्षांनी छायेची ती सांवळी मूर्ती मी पाहिली. ती होती तशीच होती. पण विद्येच्या व तारुण्याच्या तेजामुळें ती पूर्वीपेक्षां कितीतरी चित्ताकर्षक दिसत होती ! तिच्या रंगाला खुलून दिसेल अशाच नि[illegible]र रंगाचें

लुगडें ती नेसली होती. त्याच रंगांतील फिक्या रंगाचें ब्लाऊज तिनें अंगांत घातलें होतें. हाताच्या बाह्या तोकड्याच, परंतु तिच्या मांसल बाहूंचा डौल दाखविणाऱ्या, हातांत एकेक सोन्याची बांगडी, हाताला नाजूकसें घड्याळ, लुगड्याच्या व ब्लाऊजच्या एकसूत्रतेस शोभेल असा निळ्या रंगाचा नऊ चौरस इंच नक्षी काढलेला हातरुमाल, डाव्या पदराखालीं ब्लाऊजच्या आंत, पण गळ्याच्या बाजूनें दिसेल असा अलगत ठेवून दिलेला. साधारण वळ्या पडलेले केंस, एक दोन स्वैर केसांच्या बटी कपाळावर आलेल्या, सैलसा अंबाडा ह्या सर्व गोष्टी तिची छाप कुणावरहि पाडण्यास पुरेशा होत्या.

इकडल्या स्वारीची तीच स्थिति झाली. छाया येण्यापूर्वीच फारशी उत्सुकता न दाखविणारी स्वारी ती येतांच तिच्या स्वागतार्थ कांहीं अंतर पडूं नये म्हणून स्वतःच तिची व्यवस्था पाहूं लागली. छायेचा स्वभावहि पण पूर्वी होता तसाच आतां होता, त्यामुळें आमच्या दोघांचाहि काळ तिच्या सहवासांत अत्यंत सुखांत जाऊं लागला. पण सुखाचे दिवस असे किती टिकणार ?

छायेनें ज्या सुमंगल (?) वेळीं माझ्या घरांत प्रवेश केला त्यावेळीं माझ्या सुखानं बाहेरचा मार्ग धरला होता याची मला काय कल्पना ?

छायेच्या एकंदर राहणींतील, पोषाखांतील व बोलण्याचालण्यांतील कुशलता पाहून तिकडली स्वारी जणूं भारून गेली होती. ती आल्यापासून त्यांच्या कलेला स्फूर्ती मिळाली. मी कामांत असलों म्हणजे छायेच्या नानातऱ्हेच्या 'पोझीस' घेण्यांत स्वारीची खटपट चाललेली दिसून यायची ? प्रथम प्रथम ह्या करण्यांत मला कांहीं विशेष दिसलं नाहीं. त्यांचा धंदाच चित्र-काराचा होता. आतांपर्यंत त्यांनीं अनेक स्त्रियांना मॉडेल्स म्हणून घरीं आणल्या होत्या. परंतु छायेशीं आतांशा त्यांचं होत असलेलें वर्तन मला दोषास्पद वाटलं. पुढें पुढें तर हा प्रकार मला असह्य होऊं लागला. छाया माझी एवढी जीवाभावाची मैत्रीण ना ! पण तिचा सारा दिवस त्यांच्या स्टुडिओंतच जायचा. ते बाहेर गेल्या वेळींच तेवढी तिला माझ्याशीं बोलायची फुरसत सांपडायची !

त्या प्रसंगानें तर माझ्या भवितव्यतेचें भेसूर चित्र माझ्या दृष्टीपुढें उभें राहिलें. त्या दिवशीं रविवारचा दिवस होता. भावबंधन नाटक पाहायला जायचें आमचें ठरलें. आज छाया पराकाष्टेची मोहक दिसत होती. ! मी स्त्री आहे

ना--आणि एक स्त्री ज्यावेळीं एखाद्या सौंदर्याबद्दल प्रशंसोद्गार काढते, त्यावेळीं त्या स्त्रीचें सौंदर्य खरोखरीच असामान्य असलं पाहिजे यांत बिलकूल शंका नाहीं-तरी मी कबूल करतें कीं कोणत्याही पुरुषाला मोह पाडील असंच छायेचं स्वरूप आज दिसत होतं. नाटक सुरू होण्यापूर्वी पांच मिनिटें अगदीं नाटकगृहांत पोहोंचलीं. बसायच्या वेळीं मात्र मोठ्या युक्तीनं स्वारीनं छायेच्या शेजारींच स्थान पटकावलं. माझ्या ध्यानीं ही गोष्ट आली नाहीं असं नाहीं, परंतु आलेल्या परिस्थितींत गप्प राहण्यापेक्षां माझ्या हातून अधिक तें काय होणार होतं ! माझ्यासारख्या गबाळ पत्नी शेजारीं बसायला त्यांना आवडलं नसावं ? यांत दोषी कोण ! माझं मस्तक भणाणूं लागलं, आणि कोणत्या स्त्रीचं मस्तक भ्रमण करूं लागणार नाहीं !

" कृष्णा रजनीचंच दर्शन कधीं कधीं सुखावह होतं बुवा ! " पुढच्या ओळींतले एक गृहस्थ मान मोडेपर्यंत मानेचा स्क्रू फिरवीत व छायेकडे वक्र दृष्टी फेंकित म्हणाले.

" रात्रीच्या प्रहरीं प्रखर सूर्य प्रकाशाची काय किंमत बुवा ! " त्याच्या टारगट मित्रानें उत्तर केलें.

एक अंक कसाबसा माझ्यानं पाहवला. तिकडच्या ओळखीचे व फार दिवसांनीं भेटलेले एक गृहस्थ आमच्याजवळ आले व छायेकडे दृष्टिक्षेप करून म्हणाले,

" वा ! आज अगदीं सहकुटुंब नाटकाला आलास रे प्रभाकर ? आणि ह्या आमच्या वहिनी वाटतं ? ओळखबिळख तरी लेका करून दे " असं म्हणून त्या मिस्कील गृहस्थानें छायेला माझ्या पदावर स्थापून विचारिलें-" कां वहिनी कसं काय आवडलं नाटक ? "

छाया बिचारी काय उत्तर देणार ?

त्यांना हा प्रकार फारसा आवडला नाहीं असें दिसलें. त्यांनीं आपल्या मित्राची चूक लगेच सुधारली.

" ओ आय अम् सॉरी " एवढंच म्हणून स्वारीची आपल्या वहिनींशीं बोलण्याची इच्छा थंडावली.

या प्रकारानें माझ्या मस्तकांत भयंकर वेदना होऊं लागल्या. मी छायेला म्हटलं—" छाया, मला कससंच होतं पहा ! मी घरीं जाऊं ? तुम्ही इथंच बसा ! "

छायेनं ही गोष्ट तिकडे कळवितांच आम्ही सर्वच जण घरीं आलों. वाटेंत स्वारी एवढंच पुटपुटली--" एकाद्याचा हिरमोड करायची तुला फार वाईट खोड ! "

* * * * *

माझ्या घरांत माझ्या डोळ्यांदेखत, माझ्या स्थानावर हळूं हळूं छाया आपलें पद प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करते आहे. असें मला वाटे. छायेचे जाण्याचे दिवस जसजसे जवळ येऊं लागले तसतशी तिकडच्या मनाची होत असलेली अस्थिर वृत्ति त्यांना माझ्यापासून दडवून ठेवतां आली नाहीं. आतांशा छायेसाठीं नाना तऱ्हेचीं पातळें व पोलकीं, फुलें वगैरे जिन्नस हळूं हळूं येऊं लागले होते. अर्थात् शंकराबरोबर नंदीची पूजा ह्या न्यायानें माझाहि हिस्सा त्यामध्यें असायचाच ! पण आर्य स्त्रीला पतिप्रेमापेक्षां अधिक अमोलिक वस्तु अशी कोणती वाटणार ? ह्याच वस्तू पूर्वी माझ्यासाठींच येत नसत कां ? मीच आपल्या हातानें त्यांचा अव्हेर केला, त्या अर्पण करणाराच्या भावनेची किंमत मी करूं शकलें नाहीं. मग आतां दोष कुणाला द्यावयाचा ! आपण धिक्कारलेल्या वस्तूचा जर इतरांनीं स्वीकार केला तर त्याबद्दल आपल्या मनाला वाईट वाटण्याचं कारण ?

त्या दिवशीं शनिवार होता. सकाळपासूनच माझ्यापाठीं लागायचं कीं एकत्र फोटो घ्यायचा ! दोघींचा एकत्र फोटो घ्यायचा तो बायकोच्या फोटोच्या नांवाखालीं छायेचं मनमुराद दर्शन घेतां यावें म्हणूनच, ही अंदरकी बात स्त्रियांना त्यांच्या स्वभावसुलभ मनोविकारामुळें कळते. मलाही ती अशीच कळली. माझ्यावरच्या प्रेमासाठीं कांहीं फोटो काढणं व्हायचं नव्हतं, मग ! कशाला त्या फंदांत पडायचं ! मी चक्क नाहीं म्हणून सांगितलं. " बरं जा ! तुझा एवढा ताठा नको तुझ्यासारख्या गबाळ स्त्रिचा फोटो काढण्याइतका मी कांहीं मूर्ख बसलों नाहीं. छायेचाच काढूं एकटीचाच ! छाया, तयार हो बरं ! "

फोटो काढण्याची पूर्व तयारी चालली होती. एका मोठ्या आरशासमोर हातांत मोठा थोरला गुच्छ देऊन छायेला 'पोज' देणं चाललं होतं. " हं ! अस्सा हा पदर धरायचा बरं ! अन् हा निऱ्यांचा घोळ असा लांबच लांब पायामागें रुळता ठेवायचा ! अरे, खांद्यावर पदर नीट ठेव ना ! छे, तुम्हीं बायका असूनसुद्धां तुम्हांला साधत नाहीं. " असं म्हणून स्वारींनी छायेच्या खांद्यावर हात ठेवला, व पदर नीट करायला सुरवात केली. पदर नीट करण्याच्या निमि-

त्यानं ठेवलेला हात किती वेळपर्यंत तरी तसाच होता. हें दृश्य मला माझ्या खोलींतच आरशांतील प्रतिबिंबामुळें दिसत होतें.

" छाया, किती गोड दिसतेस तूं हं, अशीच उभी रहा. जरा इकडल्या बाजूला मान झुकव, बस ! एक्सलेंट !! अन् इतका गंभीर चेहरा कशाला ? थोडी हंसशील ?

एक वचनी हांक मारीपर्यंत स्वारीची मजल गेली, तरी मी त्यांची बायको अज्ञानांतच ! परत त्यांचा आवाज ऐकूं आला.

" अस्सं ! थोडं मृदु स्मित कर छाया ! "

छायेनें मंद हास्य केलें, आणि शेवटची ती गोळी अचूक वर्मी लागू पडली. छायेच्या कौशल्याची सफलता झाली. सौंदर्याचा अखेर विजय झाला. छायेच्या मुग्ध हास्यानें वेडावलेली तिकडची स्वारी तिच्या चेहेऱ्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहातच राहिली. कॅमेऱ्याचें शटर दाबावयाचें तसेंच राहून गेलें.

दुसऱ्या क्षणीं मी काय पाहिलं ?

" छाये, माझ्या जीवनप्रवासांत तुझी भेट फार उशीरां झाली. "

हवेंत मिसळलेले व मला ऐकावयास नको असलेले शब्द माझ्या कर्ण-पथावर आदळलेच !

छायेची माझ्या घरीं राहण्याची मुदत दोन महिन्यांची होती. आज तिला पुरे दोन महिने झाले, पण ह्याच दिवशीं मी घरांतून स्वेच्छेनें पाय काढला व माहेरवास पत्करला. छायेचें पद माझं होतं. स्वारी मूळची चंचल नव्हती. माझ्याकडून जें त्यांना मिळत नाहीं, तें छायेनं त्यांना दिलं. मग ? त्यांत अपराध कुणाचा ? छायेचा ? कोणाहि स्त्रीच्या मोहपाशांत पडण्यापूर्वी त्यांनीं मला संधि दिली होती. माझ्याच जीर्ण व खोडसाळ समजुतीनं मी माझा हट्ट चालविला. त्यांच्या कलोपासक भावनेला माझ्याकडून पोषक असा ओलावा मिळाला नाहीं. मग अपराध काय त्यांचा ? नाहीं ! मी कुणालाही दोष देत नाहीं. माझ्या अज्ञानाचं मूळच ह्या साऱ्या प्रसंगाला जबाबदार ! माझ्या ह्या बलिदानापासून माझ्या परिस्थितींतील स्त्रियांना कांहींच कां शिकतां येण्यासारखं नाहीं ?

———

# समाजाचें अग्निकुंड

" झालों बुवा तुझ्या ऋणांतून मुक्त एकदाचा ! "

असें म्हणतच गोविंदरावांनीं आपलें अंगरखा पागोटें काढून खुंटीवर ठेवलें

" म्हणजे !–कुणाच्या ऋणांतून मुक्त व्हायचं म्हटलं ? "

स्वयंपाक घराच्या दारांत येऊन राधाबाईनें प्रश्न टाकिला.

" कुणाच्या म्हणजे ?—तुझ्या न् रेवतीच्या ! "

" अगऽबाई, जमलं वाटतं त्या दिक्षितांचं स्थळ !

मी म्हणत नव्हतें कां, कीं माझी रेवती फार फार भाग्याची आहे म्हणून ! घ्या,—चांगलं पालखी पद—स्थांचं स्थळ मिळालं कीं नाहीं ?

" बरं, एवढ्यावरच कांहीं चढून जाऊं नकोस ! "

" इश्श !—मी कशाला बाई चढून जाऊं ? बरें, पण हुंड्याच्या रकमेचं काय ठरलं ? आपल्या बेतातलंच आहे ना ? नाहींतर बाई, तोंडाशीं आलेला घांस जायचा एकाद वेळ ! "

" कुणी सांगावं ? अक्षता पडेतोंवर काय काय घडामोडी उपस्थित होतील हें आतांच कुणी सांगावं ? पण हुंडाबिंडा कांहीं त्यानं मागितला नाहीं एवढं खरं–नाहीं तरी त्यांना कळत नाहीं थोडंच कीं, माझ्यासारख्या भुकेकंगालापासून त्यांनीं हुंड्याची अपेक्षा काय करायची ? अन् आपलं जें कांहीं आहे, तें आपल्यामागं सारं रेवतीलाच मिळायचं ! पण आपल्या साऱ्या हयातींतील मिळकत त्यांच्या महिन्याच्या मिळकतीच्या पासंगालाहि पुरायची नाहीं; तसें अप्पाराव दूरदर्शी आहे म्हणा ! "

" त्या भामाबाईच्या सुभद्रेचं कसं जुळलं नाहीं तिथें ? त्या तर फारच चढून गेल्या होत्या. पैशाचा पाऊस पाडून मनोहरासारखा जांवई हस्तगत करायचा असा तर त्यांच्या यजमानांचा निश्चय–मग आपल्या सारख्यांच्या मुलीला अप्पारावांनीं कसं पसंत केलं ?

" त्याचं असं झालं,–तूं म्हणतेस त्याप्रमाणें आपली रेवती भाग्याची खरी यांत संशय नाहीं. अप्पारावांच्या वंशांत आजपर्यंत दत्तकांची रांग लागली आहे; त्यामुळें आपल्या वंशावर देवाचा शाप असावा ह्या विचारानं त्यांना अगदीं अस्वस्थ वाटत आहे.–ही दत्तकाची परंपरा आज कित्येक वर्षानुवर्षं चालू आहे, त्यामुळें जवळ भरपूर पैसा असूनहि अप्पांना फार वाईट वाटतं. आपल्या रेवतीच्या पत्रिकेवरून, तिला भरपूर संतति असल्याचें त्यांचेच ज्योतिषिबुवा सांगत होते, त्यामुळें या एकाच गुणाकडे पाहून आप्पांनीं मी जातां क्षणींच आपल्या रेवतीला त्यांनीं पदरांत घेतल्याचें सांगितलें. "

" कोणत्याहि कारणानं असो––आपल्या रेवतीचं भाग्य उदयास आलें एवढं खरं ! "

मी तुला म्हणत नव्हतों कां–आपली तपश्चर्या आपले कष्ट केव्हांहि वायां जायचे नाहींत म्हणून. दीनांचा वाली परमेश्वर ! "

" हो बाई, मी बोललेला सत्यनारायण पुढल्या महिन्याच्या पहिल्या तारखेलाच करून टाकायचा बरं–देवानं आपल्याला चांगला दिवस दाखविलान्–आपण त्याचं ऋण कशाला ठेवायचं ?–नाहीं तर बाई आपले हाल कुत्र्यानं खाल्ले नसते–आतांपर्यंत आपण जोडे थोडे कां–झिजवायचे लोकांच्या दारीं ? म्हणतात ना, भोक्तृत्व सरलं म्हणजे साऽऽरं ठीक होतं ! "

" हुं, !–तुका म्हणे तेथें न चले तांतडी । प्राप्तकाळ घडी आल्याविना ॥ असं जे तुकोबा महाराज म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. "

२

" अगदीं वेळेवर आलास विश्वनाथ ! नाहीं तरी आम्ही तुला एकदोन दिवसांत तार करून बोलावणारच होतों. " कित्येक दिवसांनीं आपला लाडका पुतण्या आलेला पाहून राधाबाईनें म्हटलें. "तार !–अन् ती काय म्हणून बुवा ! " आपलें सामान आंत आणीतच विश्वनाथानें आश्चर्यानें विचारलें.

" ओळख ! ओळख पाहूं !–एवढा कॉलेजांत जाऊन एवढालीं पुस्तकं वाचतोस, गणितं सोडवतोस, ओळख आतां पाहूं तुला कशाला तार केली असती ! "

" काकांना पगारांत वाढ झाली असेल ! "

" अन् त्यासाठीं तुला तार करून बोलावण्याचें कारण ! "

" अरे हो हें लक्षांतच नाहीं-आलं !-हं-पण त्याबद्दल सत्यनारायण करायचा बेत असेल ! "

" बरोबर ! थोडासा मुद्याच्या जवळ येत चाललास. सत्यनारायण तर करायचाच, पण पगारवाढीबद्दल मात्र नाहीं. "

" मग कशाबद्दल बुवा ? "
विश्वनाथ फारच विचारांत पडल्यासारखा दिसला. " कदाचित् रेवती पास झाली असेल परीक्षेंत ! होय ना काकू ? "

" होय बाबा, बरोबर ओळखलंस, पण कोठल्या परिक्षेंत तें तिलाच विचार," असें म्हणून राधाकाकू—जोरा जोरानें हांका मारूं लागल्या. " रेवा ! रेवा ! हें पहा कोण आलं आहे ! " एका क्षणांत हरिणीप्रमाणें जिन्यावरून उड्या मारीतच रेवती येऊन उभी राहिली.

" काय आई, कां हांक मारलीस ?—अन् विसू, तूं केव्हां आलास ? कॉलेजला सुट्टी पडली ? "

" हां आतांच आलों रेवाताई;—तुम्हाला तार करण्याची तसदी पडूं नये म्हणून अगोदरच अन् वेळेपूर्वीच आलों. काकू सांगत होत्या आपण कसली तरी परीक्षा पास झालांत—कसली बोवा ? कळून तर द्या आम्हांला "

" परीक्षा—आतां कसली रे परीक्षा ? आतांच तर दोन महिन्यापूर्वी माझी ' इंटर ' झाली ना ! कांहींतरी विचारतोस,—तरी बरं राजश्री कॉलेजचेच एक रेसीडेन्ट आहेत म्हणून ? "

" मला काय माहीत ?-काकू म्हणाल्या रेवती कोणत्याशा परिक्षेंत पास झाली आहे. हें तिलाच विचार-मग सांग ना ? "

" इश्य,-मला नाहीं बाई सांगतां येत ! अन् आई विनोद करायला कधींपासून शिकली ? "

" बरं बाबानों, मीच सांगतें, एकढं शिकवूनहि ही रेवती आमच्या अडाणी बायकांसारखी आपलें लग्न जमल्याचें सांगायाला लाजते. "

" काकू रेवा कितीहि शिकली तरी शेवटीं बायकांच्याच जातीवर गेली ! अरे पण कुणाशीं लग्न जमलं तें तर कळूं द्या आम्हांला !-आम्हीं कांहीं वधूपिते नाहींत, आमची मुलगी तिथें देऊन तुमचं लग्न फिसकटायला ! "

" अरे, आपले ते रावसाहेब आप्पाराव आहेत ना, त्यांचे चिरंजीव मनोहरराव–त्यांच्याशीं रेवतीच्या लग्नाचं नक्की झालं आहे. समजलास ! "

" अरे वा ! Congratulations, रेवती !! आहे बुवा लाख नशीब ! "

३

"काय बाई आचरटपणा तरी आतांच्या पोरींचा ! जें जें ऐकावं तें नवलच !!" " कोणाबद्दल बोलतां हें सुंद्राबाई, त्या राधाबाईच्या रेवतीबद्दल कां ! " अगबाई, हो, तिची गोष्ट तर गांवभर झाली आहे अगदीं ! "

" म्हणजे काय झालं वत्सलाबाई तिचं ? "

" काय व्हायचं राहिलं आहे तें विचारा विठाबाई ! त्या रावसाहेबांच्या मन्याशीं तिचं लग्न नाहीं कां जुळलं ? "

" होय-मोठ्या भाग्याची खरी बाई–नाहींतर सत्यभामाबाईसारखं आपल्या तोडीचं स्थळ सोडून ही भिकार पोरगी त्यांनीं कां पत्करली असती ?–"

" अहो. पण ती शिकलेली आहे, वेणूबाई ! " "असेना, सत्यभामाबाईची सुभद्रा तर हजारांत बायको आहे रुपानं–समजलांत लक्ष्मीबाई ! "

" तिचं झालं काय पण ? " विठाबाई अधीर होऊन म्हणाल्या. "अगबाई-लग्न जुळल्यापासून नुसता स्वर्ग दोन बोटं उरला आहे मायलेकींना, ह्या महिनाभरांत इकडे त्या फिरकल्या आहेत कां क्षणभर तरी ? "

" अहो न मिळणारं स्थळ मिळालं आहे–मोठ्यांशीं टक्कर द्यायची तेव्हां लग्नाची तशीच तयारी करून नको कां ठेवायला ? म्हणतात ना कायसं बाई—" ' तें कायसं काय म्हणतात हें वेळींच न आठवल्यामुळें सुंद्राबाईनं आठवण करण्याचा प्रयत्न सोडून दिला.

" ही गोष्ट तर साऱ्या गांवभर झाली आहे बाई—मग विठाबाई तुम्हालाच तेवढी कशी कळली नाहीं ? " महादेवापुढील नंदीला एक प्रदक्षणा घालतांना वेणूबाई म्हणाल्या. " मघांपासून बाई तुम्ही ' ही गोष्ट ती गोष्ट ' असं सारखं चालविलं आहे, पण एकीच्या तोंडून तरी तिचा उच्चार होतो आहे का ?— सांगायचं असलं तर सांगा नाहींतर ही बाई मी निघालें. "

" तुम्ही तरी विठाबाई नाकावर माशीहि बसून देत नाहीं आतांशा अहो ती राधाबाईची पोर अलिकडे एक तरुण मुलाबरोबर सारखी गावांतून हिंडत असते—फिरायला जाते-नाटकाला-सिनेमाला–कांहीं कांहीं म्हणून तिनं शिल्लक

ठेवलं नाहीं—अन् हंसतात काय नि करतात काय ?–इथून तिथून सारा आचरटपणा न् निर्लज्जपणा ! ! ”

“ काय बाई तरी या अलिकडल्या शिकलेल्या पोरी—एकाशीं लग्न लावायला तयार व्हायचं न् दुसऱ्या बरोबर हुंदगडायला जायचं ?–मरो मेल्या ! आमच्यावेळीं नव्हतं बाई असं ! सख्या नवऱ्याबरोबर बाहेर जातांनासुद्धां आम्हाला कोण चोरी !–ते सडकेच्या उजवीकडून चालले तर आम्ही अगदीं डावीकडून जायचं; जणूं आम्ही एकमेकांची कोणीच नव्हतं ! ”

“ तुमचं राहूं द्या विठाबाई !—पण हें अप्पारावांना न् मनोहरला कसं चालतं सारं ! वेणूबाई म्हणाल्या.

“ त्यांच्या कानापर्यंत ह्या गोष्टी जातील तर ना ? ”

“ अनसूयाबाईना तरी ही गोष्ट माहीत आहे ? अगऽबाई ! त्यांना कळलं तर त्या आकाश-पाताळ एक करून टाकतील अगदीं ! ”

“ भिकाऱ्याला ओकारी ” म्हणतात त्यांतली गत !—चांगलं स्थळं मिळालं पण तें नीट पचवायला तर अंगीं शहाणपण असलं पाहिजे ना ? ”

“ फार छान झालं ! राधाबाईंना फार घमेंड आपल्या मुलीची, चांगलं नाक ठेचलन् पोरीनं ! ” “ कोणाचंहि बरं करावं न् वाटेवर सोडावं म्हणतात. मला तर वाटतं बाई अनसूयाबाईच्या कानावर ही गोष्ट घालावी. तुम्हांला कसं वाटतं शांताबाई ? ” सत्यभामाबाईनें आपलं मत प्रदर्शित केलें.

“ जसं कोणाचंहि बरं करावं म्हणतात, तसंच कुणाचं जोडलेलें लग्न तोडूं नये असंहि म्हणतात. मला वाटतं आपण ह्या फंदांत कशाला पडावं ? त्यांचं तीं पाहून घेतील ! ” शांताबाईनें आपलें मत दिलें. त्या सर्व स्त्री समूहांत शांताबाईच तेवढ्या मितभाषिणी होत्या.

“ अहो, मुलींच्या जातीनं विशेष लग्न जमलेल्या तरुण मुलीनं परक्या तरुण पुरुषाबरोबर हिंडाफिरायला जाणं—मौजा मारणं म्हणजे ही काय लहानसान गोष्ट आहे ? अन् समजा आपल्याच सुनेबद्दल आपण अशी गोष्ट ऐकली तर आपण गप्प राहूं ? अनसूयाबाई कां आपल्याला परक्या आहेत ? आपल्याच पैकीं त्या एक ! त्यांच्या कानावर घालावीच ही गोष्ट ! ”

आपल्या मुलीला केवळ रेवतीमुळें तें स्थळ मिळालें नाहीं म्हणून खट्टू

झालेल्या सत्यभामाबाईनीं ह्या मतावर जोर दिला. " घातलंच पाहिजे हें सारं अनुसुयाबाईच्या कानांवर " परत त्या उद्गारल्या.

" काय घालतां बाई माझ्या कानांवर ? " अनपेक्षित रीतीनें अनसुयाबाई पुढें उभ्या राहिल्यामुळें सर्वजणींची त्रेधा उडाली.

" अगबाई ! अशा एकदम कुठून आलांत अनुसुयाबाई ? आतांशा देवळांत यायचं अगदीं सोडून दिलं आहे ? "

" अहो, आतां घरीं लाडू पोळ्या करायच्या धांदलींत इथें येण्याची फुरसत अनुसुयाबाईना कोठची ! "

" असं तर खरंच बाई !–तें सारं राहूं द्या, माझ्या कानावर काय घालणार होतात सत्यभामाबाई ? " अनुसुयाबाईनें प्रश्न केला.

" कांहीं नाहीं–तें आपलं असंच–! " चाचरत सत्यभामाबाई बोलल्या. " मला नाहीं वाटत असंच कांहीं तरी असेल. कांहीं तरी विशेष आहे, होय ना शांताबाई ? "

" आहे म्हटलं आहे–तसं नाहीं ही ! " शांताबाईनें उत्तर दिलें.

" मग जें आहे म्हटलं आहे ना ? तेंच सांगा ! " क्षणभर त्या स्त्री समाजांत शांतता पसरली. शेवटीं विठाबाईनें धाडस केलें सांगण्याचें.

"–तें असं आहे अनुसुयाबाई–तुमच्या नव्या सूनबाई आहेत ना ?-पण नकोच बाई !–आपल्याला कदाचित् आवडणार नाहीं ! "

"असं मध्येंच थांबायचं नाहीं बरं–त्यानं माझी उत्कण्ठा अधिकच वाढेल!"

विठाबाईनीं गळ्यांत गोळा आणून सांगावयास सुरवात केली. " रेवती म्हणे आतांशा एका परक्या तरुणाबरोबर फिराहिंडायला नाटक-सिनेमाला-वेळीं अवेळीं जात असते "

" आमच्या मन्याबरोबरच असेल कदाचित् ! "

" नाहीं हो—तुमच्या मनोहराला कां जग ओळखीत नाहीं ? "

" खरं हें ? – अगदीं खरं ?—तुम्हीं स्वतः पाहिलांत ? " मोठ्या विस्मयानें आपली तीक्ष्ण नजर रोखीत अनुसुयाबाई म्हणाल्या.

" मी स्वतः कशाला पाहूं—या सुंद्राबाई सांगतील ! "

" सुंद्राबाई, खरं हें–तुम्ही स्वतः रेवतीला असं हिंडतांना पाहिलंत ? "

" अहो, मीच कशाला–साऱ्या गांवानं पाहिलं आहे! त्याला माझीच साक्ष काय करायची? ह्या ताराबाईच्या पुतण्याच्या मेव्हण्यानं स्वतः पाहिलं आहे त्या देवशीं त्या दोघांना नाटकाला जातांना!"

" किती उलट्या काळजाची पोर?–शेवटीं आपल्या कुळावरच गेली! बरं झालं बाई–सत्यभामाबाई तुम्ही मला जागं केलंत-नाहींतर केवढा घात होणार होता!–आपल्या खानदानी कुटुंबांत अशा उच्छृंखल पोरी नको ग बाई! माझा मनोहर किती साधा भोळा आहे! त्याच्या डोळ्यांत धूळ फेंकायला ही आजकालची शिकलेली पोरटी कमी करणार नाहीं–आतांच जाऊन घरीं सांगतें, याचा पुरा निकाल लावायला" असें म्हणून अनसुयाबाई देवदर्शनहि न घेतां आल्यापावलीं परत निघाल्या. त्यांना दोन पावलं पोंचविण्याच्या निमित्तानें सत्यभामाबाईहि त्यांच्याबरोबर निघाल्या. "मग जुळल्यास माझ्या सुभद्रेला विसरायचं नाहीं हं अनसुयाबाई!" अनसुयाबाई केव्हांच गाडींत जाऊन बसल्या. त्यांच्या कानीं हे सत्यभामाबाईचे शब्द पडले कीं नाहीं हें ईश्वर जाणे. आपण एका खानदानी कुटुंबाचा मोठ्या संकटांतून बचाव केला अशा विजयी मुद्रेनें तो देवळांतील स्त्रीसमाज हळुहळु घराकडे वळला.

४

" तुला म्हणून मी खासगी विचारतों—रेवतीच्या कानीं जाऊं देऊं नकोस बरं!"

" काय तें?" आश्चर्यानें आपल्या पतीकडे पाहून विचारलें.

" म्हणे रेवती आतांशा कुणा तरुण पोराबरोबर भटकत असते हें खरं?"

" असं कोण म्हणतं?" साऱ्या गांवांत ही चर्चा चालली आहे न् काय?"

" जळो मेल्या गावांचं तोंड! माझ्या रेवतीचा मोठेपणाच लोकांच्या डोळ्यांत सलतो आहे दुसरं काय? सारा दिवस न् रात्र ती माझ्या आसपास वावरते न् लोकांना बोलायला काय होतं? आपल्याला तें खरं वाटतं?" " मला खरं वाटत नाहीं म्हणून तर विचारतों. श्रीमंतांच्या पोरांनीं हवं तें केलं तरी समाजाला खपून जातं, परंतु आपल्यासारख्या गरीबाच्या बाबतींत जें पिकत नसेल तेंहि विकलं जाईल!" " नाहीं म्हणायला विसूबरोबर मात्र ती बाहेर जात असते." " त्याला काय हरकत आहे? विसू कसा झाला तरी तिचा चुलत भाऊच आहे–पण लोकांची दृष्टी किती जहरी!"

" आपल्याला काय करायचं लोकांशीं ? आपल्या मुलीविषयीं आपली खात्री असली म्हणजे झालं ! " " काय पण मेले लोक तरी–स्वतःच्या भावाबरोबर हिंडत फिरत असलेली मुलगी पाहवत नाहीं ! वाईट दृष्टीनं पाहणाऱ्यांना साऱ्या जगांत अपवित्रता भरलेली दिसून येते. "

"जाऊं दे, आपली मुलगी एकदा आपल्या घरीं दारीं नांदायला गेली म्हणजे ह्या जगाच्या न् लोकांच्या जाचांतून आपण सुटलों म्हणायचें !—

" म्हणूनच, म्हणतें मी कीं, मुहूर्त लवकरचा साधा. विसूलाहि सध्यां सुट्टी आहे. दोन महिने म्हणजे सारं होईल ! " ' लिहितोंच आतां पत्र रावसाहेबांना मुहूर्ताबद्दल.

५

संध्याकाळचा सुमार ! रेवतीच्या लग्नाचं जुळून आल्याबद्दल नवसाचा सत्यनारायण आज गोविंदरावांच्या घरीं व्हावयाचा होता. गरिबा घरची पूजा ! तरी पण ज्याला त्याला हौस आहे ना ? गरिबाच्या साधारण स्वरुप असलेल्या मुलीला कमी हुंड्यांत संपवायची म्हणजे बापाची काय स्थिति होते हें मुलीचा बाप झाल्याखेरीज कळावयाचें नाहीं. आजपर्यंतचें गोविंदरावांचें आयुष्य शक्य तितक्या साध्या व काटकसरीच्या राहणींत गेलें. आपल्या एकुलत्या एक कन्या अपत्यासाठीं आपल्या सुखाची पतिपत्नीनं परवा केली नव्हती. रेवतीच्या नांवें–तिच्या पुढील आयुष्यांत उपयोगीं पडावं म्हणून थोडसं द्रव्यहि त्यांनीं जमा करून ठेवलें होतें. त्या पैशाच्या जोरावर त्यांनीं रेवती केवळ चवदा वर्षांची असतां पासूनच वरसंशोधनाला सुरवात केली होती. आतां रेवती वीस वर्षांची होती. ह्या सहा वर्षांच्या काळांत वरसंशोधनार्थ गोविंदरावांना जी झीज सोसावी लागली, जे कष्ट व अपमान सहन करावे लागले, त्यामुळें त्यांना भर मध्यम वयांतच वार्धक्यानें गांठलें होतें. प्रस्तुतचें स्थळ शोधण्यांत गोविंदरावांनीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली होती या ठिकाणीं जर अपयश आलं असतं तर मुलीला आजन्म कुवार ठेवायची–चांगलं शिक्षण देऊन तिला स्वावलंबी बनवायची, असा त्यांनीं निश्चय केला होता. पण शेवटीं देवाला दया येऊन त्यांच्या प्रयत्नांना–रेवतीच्या सुदैवानें यश आलें, व मनोहरसारखा जांवई मिळतांच त्यांना तारुण्याची उमेद परत आली. त्यांच्या त्या दोघांहि पतिपत्नीच्या सात्विक आनंदाकडे पाहून कुणाचेंहि

अंतःकरण सुखावलें असतें. कष्टाच्या मार्गानें एखाद्या गोष्टीची प्राप्ति झाली म्हणजे जो कल्पनातीत आनंद होतो—अनुपमेय सुख वाटतें; पर्वताचें शिखर गांठल्यानंतर आजुबाजूचें सृष्टिसौंदर्य पाहून चढण्याचे कष्ट मनुष्य विसरून जातो; उमललेल्या गुलाबाचा गुच्छ हातीं येतांच, कांटे बोचून रक्तवर्ण झालेल्या बोटाच्या वेदनांची विस्मृति होते, थेट तशीच स्थिति ह्या उभयतांची झाली. आपल्या आईवडिलांना इतक्या आनंदांत असतांना साऱ्या हयातींत रेवतीनं पाहिलं नव्हतं. त्या लहानशा घरांत त्या तीन चार व्यक्तींच्या आनंदाचें साम्राज्य पसरलें होतें— पण —

"गोविंदराव किर्तने!" पोस्टमननें एक पत्र आंत टाकलें. रेवतीनें धांवतच तें आपल्या वडिलांना नेऊन दिलें. हस्ताक्षर अप्पारावांचें पाहून पत्र मुहूर्ताबद्दलच असणार असें वाटून, त्यांनीं तें घाईघाईनें फोडलें.

दिक्षितांचा वाडा. ता. १२-९-२९

रा. गोविंदराव किर्तने यांस,

नमस्कार वि. वि.

लिहिण्यास वाईट वाटतें कीं, मागच्या भेटींत आपल्या मुली संबंधीं दिलेला शब्द मोठ्या दिलगिरीनें परत घ्यावा लागत आहे; व त्याला सर्वस्वी कारण आपली मुलगीच. एकाशीं लग्न करून दुसऱ्या बरोबर मौज करायची नवीन पद्धती आमच्या खानदानी घराण्यांत शिरू देणें माझ्या मतें गैर आहे. खुद्द माझ्या पत्नीला अगदीं खात्रीलायक व्यक्तींकडून आपल्या सुशिक्षित मुलीच्या लीला ऐकावयास मिळाल्या आहेत म्हणून तिच्या आवडीला येईल त्या मुलाशीं तिचें लग्न करून द्यावें. वाटेल ते सुधारकी थेर आमच्या मंडळींना पसंत नाहींत. कळावें. आपला,

आप्पाराव.

पत्र वाचतांच गोविंदरावांचा देह धाडकन् आजुबाजूला पसरलेल्या पूजा सामग्रीवर कोसळला. डॉक्टरची मदत देईपर्यंत त्यांचें चैतन्य त्यांच्या जड देहाला सोडून पार गेलें होतें.

साम्राज्याच्या अग्निकुंडांत प्रत्यहीं अशा किती व्यक्तींचें बलिदान होत असेल!

आत्मोन्नति फेब्रुआरी १९३३

# त्यागाचा आनंद

**पदवीधर नवरा मिळावा म्हणून पुराणांना शिव्या देणाऱ्या सुशिक्षित मुलीही पार्वतीसारखी तपश्चर्या करायला तयार असतात असें असतां बॅरिस्टर वसंतरावांना झिडकारून सुनंदेनें आपल्या जोडीदाराची निवड कशी केली ?**

" पण हा काय भलताच हट्ट वन्स ? लग्न नाहीं करायचं तर काय जन्मभर अशाच राहणार ? "

" मी कुठें ह्मणतें जन्मभर लग्न करणारच नाहीं म्हणून ?–पण मला ज्यावेळीं आवश्यकता वाटेल. त्याचवेळीं मी ह्या प्रश्नाचा विचार करीन वहिनी ! "

" कांहीं तरीच बोलणं तुमचं ! त्यांत आवश्यकता नि बिवश्यकता ती कसली ?–लग्न हें प्रत्येक स्त्रीनं केलंच पाहिजे ! "

" अगदीं बरोबर बोललयात वहिनी ! स्त्रीलाच लग्नाची आवश्यकता पुरुषापेक्षां अधिक वाटत असते ! तिला स्वतंत्रता नसते, आपला चरितार्थ चालविण्याची तिच्यांत धमक नसते, म्हणूनच हक्काची भाकरी मिळविण्यासाठीं तिला लग्न करून घेणं भाग पडतें–समजलं का ? "

" मग वन्स, तुम्हीं तरी एक स्त्रीच आहां ना ? "

" हो, मी स्त्री आहे, पण पोटापाण्याचा प्रश्न सोडविण्याकरितां दुसऱ्याची ताबेदारी पत्करण्याचें मला कारण नाहीं. बाबांनीं मला माझ्या मनासारखें व आपल्या पायावर उभं राहूं देईल इतकं शिक्षण दिलं आहे. निव्वळ पोटापाण्याची तरतूद व्हावी ह्याच कारणाकरितां मला लग्नाची आवश्यकता भासत नाहीं. "

" पोटापाण्याचं मेलं राहूं द्या –पण हें चंचल मन तुम्हाला स्वस्थ बसूं देईल ? "

" बरं ! जेव्हां माझं मन अगदीं बंडच करूं लागेल ह्या बाबतींत

तेव्हां पाहून घेईन मी वहिनी ! पण तोंपर्यंत तर तुम्ही त्रास द्यायचा थांबवाल ना ?”

“इश्श ? त्यांत त्रास कसला ? विलायतेहून तुमच्याच दादाचं तसं पत्र आलं आहे ! शिवाय आपल्या लग्नाची वाटाघाट चालली असतां मुलींच्या मनाला कशा गुदगुल्या होतात बरं वन्स !”

“खरं आहे तें !-पण त्या वाटाघाटींत आनंद वाटणाऱ्या मुलीला !—माझ्यासारखीला नाहीं बरं वहिनी ! आणि हा आपलाच अनुभव सांगता आहां वाटतं ? ज्या मुलीला आपल्या लग्नाबद्दल बेफिकीरी वाटते तिला नाहीं असल्या वादांत आनंद वाटत !”

“तुमच्या तोंडाला कुणी लागावं बाई ! शिकलेल्या मुली तुम्ही;—पण तुमची गोष्ट एकवेळ जरी सोडली तरी एका माणसाला भासतेना फार आवश्यकता लग्नाची ?”

“कोण तें माणूस ?”

“जसं कांहीं माहितच नाहीं तुम्हाला वन्स ! आतां तुमच्या दादांच्या बरोबर पाहुणा म्हणून कोण माणूस येईल तें दिसेलच.”

“हं आलं लक्षांत सारं वहिनी ! म्हणजे दादाबरोबर येणारा पाहुणा कांहीं तरी हेतूनेंच येतो आहे म्हणायचा !”

“एवढं सारं माहित आहे, नि वेड घेऊन उगाचच पेडगांवाला जायचं वन्स ! वसंतराव नुकतेच बॅरिस्टर झाले आहेत. त्यांच्यासारखा नवरा चटकन् मिळणं नशीब लागतं वन्स ! वसंतरावांसारखा नवरा मिळावा म्हणून पुराणांना शिव्या देणाऱ्या सुशिक्षित मुलीही पार्वतीसारखी तपश्चर्या करायला तयार असतात.”

“Oh stop ! पुरे कर ~~हा [illegible]~~ [redacted] !”

आपला उजवा पाय जमिनीवर दाणकन् आपटीत सुनंदा म्हणाली, “साफ खोटं आहे हें वहिनी ! ही सुशिक्षित मुलींची निंदा आहे निव्वळ ! एखाद्या मुलीच्या वर्तनावरून नियम ठरवूं नका असा !”

“अगबाई, पण इतकं रागवायला काय झालं वन्स ?”

पण वहिनीच्या प्रश्नाकडे लक्षच नव्हतें सुनंदेचें.

“किती हुंडा कबूल केला आहे वहिनी ?”

" तुम्हाला काय त्याचं ? अन् त्यानं किती मागितला तरी त्यांची किंमत आहे तेवढी ! "

" हो खरंच ! सार्वजनिक संस्थेच्या पैशावर परदेशी शिक्षण घेऊन पुन्हां आपण आपल्या इतर देशबांधवांपेक्षां थोर आहोंत हें पटविण्याजोगतीच हुंड्याची रक्कम ते पटविणार असतील ? "

हें बोलतांना सुनंदा अगदीं संतापानें लाल झाली होती.

" सांगा वहिनी, किती हुंडा कबूल केला आहे वसंतरावांना ? "

" हें काय बाई विचारायचं ? तुमच्या नांवें मामंजीनीं ठेवलेला पैसा कुणाचा ? "

" कुणाचा ?—माझा आहे तो ! त्यांतील एक कपर्दिकही वसंतरावांना हुंड्या-दाखल मिळायची नाहीं. वहिनी, कळव असं दादाला ! "

" आतां उगाचच वाद घालतां वन्स ! एकदां लग्न झालं कीं हा माझा पैसा नि तो त्यांचा असा भेदच राहणार नाहीं तुमच्या मनांत ! "

" पण हें सर्व मी त्यांच्याशीं लग्न करीन तेव्हां ना ? "

" हें काय असं वेड्यासारखं डोक्यांत राख घालणं ?—वसंतरावामध्यें तुम्हांला एवढे कोणते अवगुण दिसून आले ? "

" वहिनी, बायकोच्या पैशावर अल्पावधींत व बिन कष्टानें वैभव संपन्न होऊं पाहणाऱ्या ह्या परभृतामध्यें याहून अवगुण तो कोणता सांपडणार ? नाहीं वहिनी मी साफ सांगतें, मला एव्हांना लग्नच करायचं नाहीं.—नि वसंतरावांशीं तर मुळींच नाहीं. "

" नाहीं तर बसाल एखाद्या कंगाल माणसाचं घर सारवित ! वहिनी जरा फणकाऱ्यानेंच म्हणाल्या.

" पत्करलं !—आपल्या हिंमतीवर बायकोचं पोट भरणाऱ्या पुरुषाशींच मला लग्न करायचं ! "

" अस्सं ? लग्न न करण्याच्या गोष्टींवरून शेवटीं अटीतटीवर आल्यांत म्हणायच्या !—पण हें पहा वन्स, तुम्हांला जो कांहीं वाद घालायचा तो आपल्या दादाबरोबर घाला ते आले म्हणजे ! समजलं ? मला काय जें तिकडून लिहिलं तेंच तुम्हांला सांगितलं. "

× × × ×

" अगबाई कोण ? आपले डोळे झांपणाऱ्या माणसाचे हात चाचपित सुनंदा म्हणाली.

" वहिनी कोण हो ?-हं ह्या बांगड्या लागत आहेत हाताला !-कोण मंदा ?"

" हरलीस बरं का सुनंदा !-ही मंदा नाहीं-कुंदा बरं का ? "

सुनंदेच्या डोळ्यावरून आपले हात काढीत कुंदबाला म्हणाली.

" अगबाई कुंदे ! केव्हां आलीस तरी. गांवाहून ?"

" परवां सकाळींच आलें ! "

" अन् उतरलीस आहेस कुठें ? "

" विभाकर दादाकडे ! "

" हे कुठले दादा तुझे आणखीन् ?—नवीनच नांव ऐकतें बाई ! "

" माझा चुलत भाऊ आहे तो ! "

" मग आजपर्यंत आली नाहींस ह्या भावाकडे राहायला ? "

" अग इतके दिवस तो मुळीं भटकतच होता आपल्या धंद्याचा जम बसविण्यासाठीं; कुठंहि राहायचा, नि कुठंहि जेवायचा ! आतांच त्यानं बिऱ्हाड केलं आहे मी येणार होतें म्हणून ! "

" असं कां ? घरीं कोण आहे त्यांच्या ? "

" कोणी नाहीं ग !- साऱ्या जगांत त्याला नि मला एकमेकांखेरीज कोणी नाहीं. "

" मग लग्नबिग्न नाहीं करून घेतलं अद्याप ? "

" लग्न ?— सुंदा, बेकारीच्या सांथींत सांपडणाऱ्या तरुणानें लग्नाचें नांवही काढतां कामा नाहीं ! "

" म्हणजे ? तुझा तो विभाकरदादा बेकार आहे ? तूं कांहीं म्हण कुंदा आपल्या तरुणांचं चुकतं तें हेंच ! कधीं धंदेशिक्षण घ्यायचं नाहीं, आणि नुसत्या नोकऱ्या शोधून गुलाम होऊं पाहायचं ! अशानें ह्यांची उन्नति तरी कशी होणार बाई ? "

" बरीच कीं ग तरुण जगाची काळजी वाहणारी आहेस तूं ! पण माझ्या विभानें ‘ Soaps & Oils ’ ह्या धंद्याचं चांगलंच शिक्षण घेतलं आहे आतांपर्यंत ! "

" मग ? तरीही बेकार ? " आश्चर्याच्या सुरांत सुनंदा म्हणाली.

" होय, सुनंदा. तुझ्यासारख्या श्रीमंत घराण्यांत जन्म घेतलेल्या मुलीला विभाच्या परिस्थितीची कल्पना कशी येणार ? जाऊंदे त्या गोष्टी ! आपण आपल्या स्वतःविषयींच बोलूं ! "

पण विषयांतर करण्यास सुनंदा कबूल नव्हती.

" पण असं कसं ग कुंदा ? एवढं शिकल्यावर आतां कसली अडचण ? "

" कसली अडचण ? नोकरी करण्यांत ज्याप्रमाणें कुणाची तरी गुलामगिरी करावीच लागते, त्याचप्रमाणें नुसतें धंदेशिक्षण घेऊन कांहीं आजकाल भागत नाहीं, त्याला भांडवलवाल्यांची तरी गुलामगिरी करावीच लागते आणि विभा-दादानें आजपर्यंत कित्येक श्रीमंतापुढें आपल्या कारखान्याची ' स्कीम ' दाखविली असेल ! पण अद्यापपर्यंत त्याला भांडवल मिळण्याची आशा राहिली नाहीं—आणि ह्या काळजी काळजीनं विभा अगदीं हताश झाला आहे सुनंदा ! आत्महत्त्येचे विचार त्याच्या मनांत डोकावित आहेत, म्हणूनच मी कांहीं दिवस त्याच्याकडे घालविण्यास आलें आहे. "

विभाकराच्या असहाय्य स्थितीच्या जाणिवेनें सुनंदाचें नाजूक व हळवें हृदय कंपित झालें–आणि एकदांच अगदीं एकदांच–तिच्या मनांत झटकन् एक सूक्ष्म विचार येऊन गेला. ' वसंतरावांच्या जागीं विभाकर असते तर ! "

* * * *

कुंदेला परत भेट देण्याची आज सुनंदेची पाळी होती.

टेबलावरील एका सोनेरी चौकटींत बसविलेल्या फोटोकडे सुनंदेची दृष्टि स्थिर झाली.

" कुणाचा ग हा फोटो ? "

" विभाचा आमच्या ! "

" खरं ! "

" म्हणजे ? "

" किती उमदा नि सुंदर दिसतो आहे ! " सुनंदा सौंदर्याची भोक्ती होती. "

" पण आतां जर त्याला पाहशील तर तूं ओळखणार सुद्धां नाहींस फोटोंतला विभाकर तो हाच म्हणून ! "

" कां बरं इतका फरक ? "

" काळजी ! काळजीसारखा दुसरा रोग नाहीं जगांत ! "

"खरंच ! कुंदे, आपल्या तरुणांच्या आयुष्याचं मातेरं जर कशानें होत असेल, उत्साह भंग जर कशानं होत असेल तर ह्या भांडवलशाहीनंच ! एखाद्या माणसावर पैशाचा पाऊस पडावा व दुसऱ्याला पैशाचें दुर्भिक्ष पडून अस्तित्वही कठीण व्हावें, कुंदा हाच आपल्या समतेसाठीं भांडखाऱ्या समाजाचा विषम न्याय नाहीं का ?— "

" खरंच, जगांतील ह्या विषमतेचा नायनाट झाला तर सारं जग सुखी होईल असं नाहीं का तुला वाटत ? "

" नुसतं वाटून काय उपयोग सुनंदा ? मी गरीब आहे; मी जर असं विधान केलं तर स्वार्थाचा आरोप माझ्यावर होईल ! तुझ्यासारख्या समृद्ध व संपन्न कुटुंबांतील मुलीनं असं म्हणणं तुझ्या थोर अंतःकरणाचीच साक्ष देतें यांत शंका नाहीं. पण आपली संपत्ति वाटून देण्याचं जरी तूं मनांत आणलेंस सुनंदा, तरी तुला एक Disadvantage आहे त्यांत ! "

" कोणतं बाई ? "

" तूं स्त्री आहेस ! "

" मग माझं स्त्रीत्व अशा दानाला कुठं आड येतं ? "

" स्त्रियांच्या वारसा हक्काचा अभाव आड येतो आहे ! "

" उं, पण स्त्रियांच्या–मुलींच्या–नांवानें बाजूला काढलेलं असं थोडसं द्रव्य असतंच ! "

" तें कोणतं बाई ? "

" मुलीच्या हुंड्यासाठीं लग्नासाठीं ह्मण ! "

" अस्सं ! म्हणजे तुझ्या नांवानें असलेली संपत्ति अशीच वाटून टाकायचा विचार बिचार आहे कीं काय तुझा ? "

–परंतु कुंदेच्या प्रश्नाकडे सुनंदेचें लक्षच नव्हतें. ती कसल्या तरी विचारांत गढलेली दिसत होती.

" कायग कुंदा ?—एवढं काय भांडवल लागणार आहे तुझ्या विभाकर दादाला ? "

" कुणास ठाऊक ?—पण पाहूं या हं त्यानें तयार केलेलें Estimate काढून ! इथंच कुठें तरी ठेवलेलं आहे त्यानं ! " असें म्हणून कुंदानें विभाकराचें सर्व टेबल धुंडाळिलें. " फारच बाई निष्काळजी हा ! हें पाहिलंस सुनंदा तुला वाटतं कीं मी दिवसभर कसलं काम करीत असतें म्हणून; पण दादाला सांभाळायला जर एकादं माणूस नसेल तर लहान मुलाची नि त्याची स्थिति अगदीं सारखीच ! हे पाहिलेस कपडे कसे अस्ताव्यस्त फेंकले आहेत ?— आणि हें टेबल तर मूर्तिमंत अव्यवस्थाच जन्माला आल्यासारखं वाटतं ! कसं बाई याचं होणार ? "

" खरंच ! "

सुनंदेचंहि अंतःकरण विरघळलं विभाकराच्या त्या अव्यवस्थित संसाराकडे पाहून.

* * *

" कुंदा—कुंद ! कुठें आहेस तूं ? "

कुंदाला स्वयंपाक घरांतून बाहेर येण्याची सवड न देतांच विभाकर एक ' टाईम्स ' चा अंक हातांत घेऊन, व धोतराच्या लांबचलांब सोग्यांत पाय अडखळवित स्वयंपाक घरांत पोहोंचला.

" काय झालं रे दादा ! "

" Here's good luck ! "

" पाहूं, पाहूं काय तें ! " असं म्हणून कुंदानें तो अंक त्याच्यापासून जवळ जवळ ओढूनच घेतला. आपल्या दादाच्या मुखावर इतकें तेज व आनंद तिनें केव्हांच पाहिला नव्हता.

" ही जाहिरात वाच ! "

कुंदा वाचूं लागली.

A person desires to invest Rs. 20,000, in a Soap-factory. Persons having sound knowledge of the science only need apply, to Post Box 105.

" पाहिलंस कुंदे ! मी म्हणत नव्हतों का—' उत्पद्यते मम कोऽपि समानधर्मा. "

"इश्श ! मीच तर तुला हें सांगत असे, नि धीर देत असे, तूं तर उलट हताश झाला होतास ह्या कामीं आठवतं का ?"

"बरं बुवा ! कुणाच्या का म्हणण्याप्रमाणें होऊं द्या-मी तर आतांच अर्ज करून टाकतों; पण समज कुंदा माझ्यासारखे दुसरेहि उमेदवार असणारच; नाहीं ?-मग माझाच वशिला कुठून लागणार ?"

निराशेच्या विचारांनीं परत उचल खाल्ली व विभाकर क्षणभर गप्प बसला.

"असं नको करूंस विभा ! ह्या काळजी काळजीनं तूं आपल्या शरिराची किती माती केली आहेस बरं ! प्रयत्न तर करून पहा ! प्रयत्नवादी पुरुषावरच लक्ष्मी प्रसन्न होते ना ?"

"हो-मला लक्ष्मी प्रसन्न करून घ्यायला एकाद्या श्रीमंताच्या पोरीशी लग्न लावल्यावाचून मार्ग नाहीं !"

"खरंच ! दादा, तुह्मा पुरुषांना ही गोष्ट कांहीं अगदींच अशक्य नाहीं !"

"अशक्य नाहीं ?-कुंदा किती वेडी आहेस तूं ? जांवयाच्या शोधार्थ एखाद्या माझ्यासारख्या बेकार पदवीधराकडे नजर फेंकण्याइतके श्रीमंत लोक खास मूर्ख नाहींत ?"

"माझ्या सुनंदाला तूं पाहिलं आहेस ?"

"नाहीं ! कोण ती ?"

"गेल्या महिन्यांत नाहीं का तिच्याकडे मी गेलें होतें ?"

"मग तिच्याबद्दल काय ?"

"नाहीं म्हटलं तिची नि तुझी ओळख झाली असती तर ?"

"तर काय ?"

"कांहीं नाहीं !--तिचे विचार फारच वेगळे आहेत ?"

"असतील ! तिचे विचार माझी परिस्थिति बदलूं शकत नाहींत."

"कदाचित् तें शक्यहि झालं असतं !"

"पुरे कर, कुंदे !—तुझ्या ह्या मैत्रीण पुराणश्रवणानें आमचा अर्ज मात्र मागें राहायचा !—मग सावकाश बोलूं तुझ्या मैत्रीणीसंबंधीं !"

* * *

सुनंदा आपल्या श्रीधरकाकांशीं बोलत होती. तिच्या वडिलांचे ते एकनिष्ठ मित्र होते. व तिच्या वडिलांच्या मृत्यूनंतरहि त्यांनीं आपलें प्रेम व निष्ठा त्यांच्या मुलांवर—दादासाहेब व सुनंदा या दोघांवरही सारखीच ठेवली होती. सुनंदा श्रीधरकाकांना सांगत होती—

" नाहीं—हें पहा काका, माझ्यासाठीं एवढं कराच ! दादा येण्यापूर्वी हें सारं झालं पाहिजे ! खरं सांगतें मी ! ते वसंतराव निव्वळ माझ्या पैशाकरितां माझ्याशीं लग्न लावूं पाहत आहेत—आणि तें कांहीं असलं तरी मला त्यांच्याशी नाहींच लग्न करायाचं काका ! "

" अरे, पण सारखी बोलते आहेस मघापासून, पण मी नक्की काय करूं त्या बाबतींत तें सांगत नाहींस ! "

" काका, मी ती जाहिरात दिली टाईम्समध्यें, त्याप्रमाणें एक दोन अर्जाहि आले आहेत, त्यांत विभाकरांचाहि अर्ज आला आहे काका ! त्यांच्या भेटीसाठीं तुमचा पत्ता कळवायचा नि तुम्हीच त्यांची भेट घेऊन त्यांच्या हवाली माझ्या नांवें बँकेत असलेली रक्कम करायची. जाहिरात देणारे ते गृहस्थ तुम्हींच असं दर्शवायचं बरं का काका ? "

" अन् दादासाहेब काय म्हणतील ? "

" कांहीं नाहीं म्हणायचे !—आणि म्हणाले तरी काका तुम्हाला मध्यें पडलेलं पाहिल्यावर, दादाला गप्पच बसावं लागेल ! "

" पण मी असं विचारतों पोरी, इतक्या अर्जांमधून त्या विभाकराचाच नेमका अर्ज पसंत करायचा अट्टाहास कां ?—कां मला आपला सुदेव ब्राह्मण बनवायचा विचार आहे तुझा अं ? "

" इश्श ! कांहींतरीच काकांचं !—विभाकर माझ्या मैत्रीणीचे चुलतभाऊ आहेत. "

" अस्सं ! "—श्रीधरकाका मिस्किलपणें हंसले, पण त्या हंसण्याची रक्तिमा जणुं सुनंदेच्या कपोलावर उमटलेली दिसली.

* * *

वरील गोष्टीला सव्वा वर्ष लोटलें होतें. सुनंदेचे दादा व वसंतराव नुकतेच परदेशाहून आले असल्यानें त्यांच्या स्वागताप्रित्यर्थ श्रीधरपंतानें एक लहानशीच

चहापार्टी देण्याचें ठरविलें होतें. अनेक लहानमोठ्या मंडळीबरोबर कुंदा व विभाकर ह्या दोघांनाही आमंत्रणें दिलीं होतीं. बैठक बगिच्यांतच मांडल्यामुळें, व मधून मधून जपानी कंदील वेलींतून व झाडांतून लावून दिले असल्यानें त्या स्थळाला विशेषच शोभा आली होती. वसंतराव हे आजच्या प्रसंगाचे विशिष्ट पाहुणे असल्यामुळें सर्वांच्या दृष्टींचे ते केंद्र झाले होते. एका टेबलाभोंवतीं चार खुर्च्यांवर वसंतराव, दादासाहेब, श्रीधरपंत व सुनंदा एवढी मंडळी बसली होती. आपल्या परदेशांतील अनुभवाचें गाठोडें वसंतराव सुनंदेपुढें सोडीत होते, पण तिचें त्याकडे मुळींच लक्ष नव्हतें. तिला इष्ट असणारें माणूस अद्याप आलें नव्हतें.

"च्च् !—अद्याप कुंदा कशी नाहीं आली काका ?"

"कोण कुंदा ?" दादासाहेबांनीं विचारिलें.

"मैत्रिण माझी !"

"कदाचित् विभाकरपंताना कारखान्यांतून यावयास उशीर झाला असेल !" श्रीधरकाका म्हणाले.

"हे कोण बुवा विभाकरपंत ? नवीन नवीन ओळखी झालेल्या दिसतात आमच्या गैरहजिरींत !" दादासाहेब विस्मयानें म्हणाले.

"तर काय ?"

"भारत सोप वर्क्सचे मालक !"

"एवढ्यांत विभाकरपंत व कुंदा यांना बागेंत शिरतांना सुनंदेनें पाहिलें. आतांपर्यंत उदासीनतेनें बोलणाऱ्या सुनंदेच्या चेहेऱ्यावर विलक्षण उत्साह आलेला पाहून वसंतरावांना मोठें आश्चर्य वाटलें. त्या दोघांना 'रिसीव्ह' करावयास सुनंदा धांवतच पुढें गेली.

"कुंदे, कितीग उशीर करायचा ?"

"हे राजश्री लवकर तयार होतील तेव्हांना ? बायकांपेक्षां अलिकडच्या पुरुषांना Toilet करायला वेळ लागतो बाई !"

आजच्या विभाकरच्या मूर्तीकडे पाहून सुनंदेला आपण कुंदेच्या घरीं प्रथमच पाहिलेल्या विभाकराच्या फोटोची आठवण झाल्याखेरीज राहिली नाहीं. त्याची ती भव्य व रुबाबदार शरीरयष्टि, व उत्साही चित्तवृत्तीमुळें अधिकच तेजस्वी

दिसणारा चेहेरा, सुनंदेला अतिशय आकर्षक वाटला यांत नवल नाहीं. आपल्याला योग्य ती पैशाची मदत मिळतांच, त्यानें आपल्या धंद्यांतील सारें कौशल्य एकवटून एक दोन वर्षांच्या आंतच हातीं घेतलेल्या धंद्यांत कुणालाही हेवा वाटेल असें यश संपादन केलें होतें. सुनंदेनें दोघांनाही वसंतरावाच्या टेबलापाशीं आणलें.

" हे विभाकरपंत,-भारत सोपवर्क्सचे मालक, आणि हे वसंतराव गुणे ! नुकतेच आमच्या दादाबरोबर विलायतेहून परत आले आहेत !-आणि ही माझी मैत्रीण कुंदबाला ! "

सुनंदेनें पाश्चात्य पद्धतीप्रमाणें दोघांची ओळख करून देण्याचा प्रयत्न केला.

" ओळख करून देण्याची जरुरी नाहीं सुनंदाबाई !-वसंतराव आम्हाला अपरिचित नाहींत ! "

विभाकर म्हणाला.

" म्हणजे ? "

" ते माझे वर्गबंधु आहेत नि कुंदेचे– "

पण वसंतरावांना आतां धरणी पोटांत घेईल तर बरें असें झालें होतें. इतक्या उघड्या बगिच्यांत सुद्धां आपलें घामानें डबडबलेलें तोंड पुसण्याकरितां त्यांनीं सुवासिक रुमाल बाहेर काढला.

" इश्श ! कांहीं तरीच विभाचं ! " मानेला मुरका देत कुंदा म्हणाली.

" म्हणजे काय विभाकरपंत ? " सुनंदेच्या दादानेंहि तेवढ्याच आश्चर्याच्या स्वरांत विचारिलें.

"कुंदेचे हे वाग्दत्त पति आहेत ! विलायतेस जाण्यापूर्वींच त्यांचा वाङ्निश्चय झाला आहे.—आणि केव्हां आलास वसंत ? कुंदेला पण दाद नाहीं तुझ्या येण्याची ! "

" हें सारं खरं आहे वसंतराव ? " दादानें कठोर शब्दांत विचारलें.

सुनंदेनें व श्रीधरकाकांनीं एक दीर्घ निश्वास सोडला. सुटकेचा निश्वास तर नव्हता तो ?

* * * *

" आज–आतां तुम्हीं कामांत आहांत !–पण उद्यां आपली सारी रक्कम

घेऊन येतों श्रीधरपंत ! ऋण जरी फेडावयास समर्थ झालों आहे मी, तरी उपकाराचं ऋण आमरण इथं असेंच राहणार ! ”

एका लतावेलींनीं वेष्टित अशा कुंजाच्या आंत ठेवलेल्या बाकावर श्रीधरपंत व विभाकर सर्व मंडळीपासून दूर निवांतपणें बसले होते.

“ त्यांत उपकार कसले ? नुसता बँकेंत पैसा शिल्लक राहण्यापेक्षां तो एका जीवाचा उद्धार करण्यास समर्थ झाला यांतच पैशाचें सार्थक झालें, असं मी समजतों विभाकरपंत ! ”

“ खरंच आपल्या मनोवृत्तीचे जर जगांतले सारे श्रीमंत बनले, तर ?— श्रीधरपंत आजच्या सारख्या प्रसंगीं येण्याची लायकी जर माझ्यांत कोणी उत्पन्न केली असेल तर ती तुम्हीं ! मला माणूसकींत बसविण्याचं श्रेय जर कुणाला द्यायचं असेल तर तें तुम्हाला ! ”

“ कांहीं तरीच मिथ्या स्तुति करतां आहां विभाकरपंत तुम्हीं ! ”

“ खरंच ! आपल्या तेजानं-सामर्थ्यानं आपण किती पद्मांना उमलवितों याची दाद दिनकराला कुठें असते ?

“ हें पहा विभाकरपंत ! तुमचं हें काव्यमय भाषण माझ्यासारख्या अरसिक म्हाताऱ्याला ऐकविण्यापेक्षां आमच्या सुनंदेलाच ऐकवा ! तिला आवडेल हें भारी !—थांबा, तिलाच देतों इथं पाठवून ! ” असें म्हणून हंसत म्हातारा उठलाच तिथून.

“ छे, छे ! काय वेडेपणा श्रीधरपंत ! सुनंदेचा ह्या बाबतींत काय संबंध ? आणि आपल्या अंगाबाहेर ही गोष्ट अशी टाकूं नका !–मी थट्टा करीत नाहीं– पण आजचा माझा उत्कर्ष केवळ आपल्या...”

“ नाहीं ! माझ्यामुळें मुळींच नाहीं ! –आपला उत्कर्ष करविता धनि वेगळाच आहे विभाकरपंत ! ”

“ कोण ? ”

“ कोण ?—थांबा, पाठवूनच देतों त्याला, म्हणजे आपआपल्या ऋणाच्या फेडीबिडीचा निकाल आपसांतच लावून घ्यावा झालं ! ”

* * * *

“ हें काय काका ? कुठें नेतां मला ? ”

श्रीधरपंतांनीं सुनंदेला जवळ जवळ ओढीतच आणली त्या कुंजाकडे.

" ही घ्या आपल्यावर प्रसन्न झालेली लक्ष्मी का दिनकर कीं काय तुमचा तो ! " असें विभाकरपंतांना सांगून व " आलों हं दादासाहेब ! " असें म्हणत श्रीधरपंत तेथून पसार झाले.

" श्रीधरपंतांनीं सांगितलं तें खरं ? "

शेवटीं विभाकरानेंच प्रथम बोलण्यास सुरवात केली.

" काय सांगितलं काकांनीं "

" माझ्या कारखान्यासाठीं निनांवीं भांडवल देऊन माझ्या सद्यस्थितीला कारणीभूत होणारी देवता सुनंदाबाई आपणच ना ? "

" इश्श !– फारच दुष्ट आहेत काका ! " आणि त्यांत मी विपरीत तें काय केलं ?—माझ्यासारख्या संपन्न स्थितींत असणाऱ्या प्रत्येक कुमारिकेनं आपला हुंडा असाच योग्य ठिकाणीं पटविला पाहिजे !—तरच देशांतील अनेक उत्साही तरुणांच्या जीवितांत आनंद उत्पन्न होईल ! "

" म्हणजे ? ती रक्कम मी हुंडा म्हणून समजावी अशी इच्छा आहे सुनंदा तुझी ?–खरंच हें ? "

" इश्श ! मी काय बोललें हें ! "

" कांहीं नाहीं-मनानं सांगितलं तेंच जिभेवर आलं ! होय ना सुनंदा ? म्हण होय म्हणून ! सुनंदेचा हात आपल्या हातीं घट्ट धरून ठेवण्याइतका विभाकर धीट झाला होता आतां !

सुनंदेनें खालच्या मानेनेंच विभाकराकडे एक कटाक्ष फेंकला--पण त्यांत तिच्या अंतःकरणांतील विभाकराविषयींचें आजपर्यंतचें प्रेम एकवटलें होतें व त्यागाच्या आनंदाची छटा तिच्या गालावरही उमटली होती.

वैश्य युवक सप्टेंबर १९३३.



# कोटीक्रम



" हें पहा, आतां मीच तुझा नवरा तुला सांगतो आहे ना त्यांत कांहीं हरकत नाहीं म्हणून ! "

" हो तर !—तुम्हाला कांही हरकत नाहीं दिसायची त्यांत पण मला चार-चौघांत तोंड काढायला जागा नाहीं राहायची ! "

" तोंड काढायला जागा न राहण्यासारखं काय वाईट कृत्य करणार आहेस तूं ? "

" वाईट नाहीं तर काय ?—वाटेल त्या पुरुषाला पति समजून त्याच्या-बरोबर काम करायचं !—देवा ! कल्पनाच किती अघटित वाटते; अहिल्येला चुकून इंद्राची गौतमाकार माया न जाणल्यामुळें साठ सहस्र वर्षे शीळा होऊन पडावं लागलं—! "

" हें पहा, अहिल्येच्या अन् सीतेच्या गोष्टी काढूं नकोस माझ्या जवळ मला एवढं माहिती आहे पुराणावरून कीं आर्यपतिव्रता कधीं नवऱ्याची अवज्ञा करीत नाहींत ! "

" पण तें जरी सोडून दिलं तरी साऱ्या हयातींत मी कधीं हावभाव केले आहेत कां ? शाळेतल्या समारंभांत सुद्धां मी कधीं भाग घ्यायची नाहीं लहान-पणीं—आणि आतां ह्या तुमच्या सिनेमांत जाऊन कसलं काम करणार मी ? "

आतां कांहीं लोकांसमोर काम करायचं नाहीं तुला ! स्टुडिओमध्यें फक्त ठराविक माणसं असतात ! आणि तुझी जर इच्छा असेल तर आपण इतरांना येण्याची बंदी करूं—मग तर तुझी हरकत नाहीं ना ?

" हरकत आहे तर ! "

" कसली हरकत ? "

" मला स्वतःलाच सिनेमांत काम करणं आवडत नाहीं—आणि मग अशा रडतराऊताला घोड्यावर बसविण्यांत तरी आपणाला काय मोठसं वाटतं ? "

" मालती, हा तत्त्वाचा प्रश्न आहे ! "

" कसलं तत्त्वं ?—आणि आपण आपल्या तत्वाच्या पावनार्थ माझ्या सारखीच्या तत्वाची पायमल्ली करतां हें तरी आपल्या तत्वप्रधान मनाला रूचतं ? "

माधव निरूत्तर झाला त्यानें आरामखुर्चीच्या पाठीवर आपली मान रेलली; खुर्चीच्या लांबच लांब हातावर मालती एका बाजूला दोन्ही पाय सोडून, व आपला एक हात माधवाच्या मानेभोंवतीं ठेवून बसली होती. विचाराला चालना देण्याकरितां माधवानें जवळच पडलेली ' गोल्डन स्पॅरो ' सिगारची पेटी उघडून त्यांतील एक सिगार काढली. तिचें टोंक तो खुर्चीवर ठोकूं लागला——पण तें ठोंकणें अगदीं निर्हेतुक होतें.

" इतकं काय बरं विचारांत असायचं ? "

मालती माधवाच्या भांगांतील इतस्तत: उडलेले केस नीट करीत म्हणाली.

" विचार करण्यासारखीच परिस्थिति प्राप्त झाली आहे मालती, आणि तुला त्याची दादही नाहीं ! "

"बरं–मी सिनेमांत गेल्यानं आपल्याला कशा तऱ्हेचा फायदा होणार आहे ? "

" कशा तऱ्हेचा ?–मालती, आम्ही पुरुष हव्या त्या सुधारणा घडवून आणण्याच्या खटपटींत असतों नि तुम्ही बायका आमचा मनोभंग करून आम्हांला निरुत्साह करीत असतां ! "

" एवढी कोणती सुधारणा नि क्रांति घडवून आणण्याचें मनांत आणिलें आहे आपण ? " मालती जरा थट्टेच्या स्वरांतच म्हणाली

" हें पहा, मालती अशी थट्टेवारी गोष्ट नेऊं नकोस ! " तितक्याच गंभीर मुद्रेनें माधवानें उत्तर दिलें.

त्याच्या उत्तरांतील गंभीरपणा पाहून मालतीची थट्टेची लाट जागच्या जागीं जिरली.

" नाहीं गडे मी थट्टा करीत आपली !–सांगायचं आपण कोणत्या सुधारणेविषयीं बोलतां तें ! "

" आज कित्येक दिवस आमच्या मनांतून एक सिनेमा कंपनी काढावी असं आलं आहे "–पण आजपर्यंत पैशाची पंचाईत असल्याकारणानें आमचे मनोरथ जागच्या जागीं स्थीर होते.

" मग आतां कुणी हुंडी आणून दिली ? "

"—आणि ती जर आणून दिली नसती तर तुझ्यापाशीं ही याचना करण्याचें कांहींच कारण पडलें नसतें—आमच्या हेतूला मूर्त स्वरूप देण्याचं सारं श्रेय भालचंद्राकडे आहे. त्यानं आपला सारा पैसा ह्या नवीन चित्रपट कंपनी-करितां खर्चायचं ठरविलं आहे—आमच्या क्लबचे सारे सभासद कंपनीमध्यें काम करणार आहेत; मला मात्र त्यानें मॅनेजरच्या जागीं नेमलें आहे."

"पण मी कांहीं आपल्या क्लबची सभासद नाहीं"

"सभासदाची पत्नि तर आहेस ना?" मालतीच्या गालावर हळूच एक टिचकी मारीत माधव म्हणाला.

"माले, माझा अंत पाहूं नकोस ग! स्त्रियांची भूमिका स्त्रियांकडून घेण्याचा आमचा विचार आहे—व तुझ्या सारख्या कुलीन स्त्रियांनीं मध्यें भाग घ्यावा अशी सर्वांची इच्छा आहे—तरच एक नवीन सुधारणा केल्याचं श्रेय आमच्या कंपनीला मिळणार आहे. नाहींतर नुसत्या व्यापारी धोरणावर काढलेल्या कंपन्या पुष्कळ मिळतील!—मग ऐकणार ना माझं?"

"पण गडे सर्वांच्याच पत्न्या काम करणार आहेत कां मध्यें!"

"सर्वच स्त्रिया कांहीं सिनेमांत काम करण्याच्या लायकीच्या नसतात मालू! सिनेमांत काम करायला थोडेंसें सौंदर्य लागतें—चेहरा मोहक असावा लागतो?" आपल्या स्तुतीनें मालतीला आनंद होईल असें वाटून माधव तिच्याकडे क्षणभर पाहातच राहिला.

"म्हणजे!—माझ्या सौंदर्याचा विक्राच मांडला आहे आपण असंच नाहीं का म्हणायचं?"

"ह्या भलत्या वादांत शिरून माझा अंत पाहूं नकोस—! एकदांच सांग—तुला ऐकायचं का माझं?—आर्य पतिव्रता म्हणतेस ना तूं आपल्याला?"

"मी आपली कोणती गोष्ट ऐकली नव्हती? पण ही गोष्ट अशी आहे कीं, आपल्या म्हणण्यासाठीं जरी एक वेळ मी होय म्हटलं तरी जन काय म्हणेल?"

"जनाच्या—लोकांच्या पंचायती तुला कशाला मालू? साऱ्या जगांत तुला किंवा मला आपणा एकमेकांखेरीज मायेचें माणूस कोण आहे? जनापवादाची भीति आपल्यासारख्यांना कां असावी?"

"लोकनिंदेचं मेलं राहूं दे!—पण पर पुरुषाबरोबर काम कसं करायचं?"

" भालचंद्र कुणी परका आहे कां आपल्याला ? तोच मुख्य काम करणार आहे—त्याला हौस आहे तशी काम करण्याची—आणि त्याच्या बरोबरच तुला कामं केलीं पाहिजेत ! "

" पण बाई, परक्या पुरुषाशीं—आपलं माणूस समजून वागायचं—कल्पनाच मला कशीशीच वाटते ! "

" त्यांत एवढं अवघड काय आहे, मालती मला कळत नाहीं ! नेहमींच कांहीं शृंगाराचे प्रकार असत नाहींत चित्रपटांत—आणि एखाद वेळ असले तरी आपलं मन जोंवर शुद्ध आहे—मनांत कसलीच पापाची भावना नाहीं—तोंवर शरीराच्या बाह्य हावभावाला पापी कृत्यांत कसें ओढतां येईल !—आणि अशी हलकी कल्पना मनामध्यें आणणाऱ्यापैकीं मी नाहीं ! "

" पण आपलं बाई मला हें म्हणणंच समजत नाहीं ! असलीं शृंगारिक कामें करतांना एखाद्याच्या मनांत परस्पर पात्रांच्या मनांत पापवासना आहे कीं नाहीं हें कसं समजायचं ? चोरानं चोरी केली त्या कृत्यालाच आपण अनीतीच्या सदरांत गणतों नाहीं कां—त्यानं ती चांगल्या हेतूनें केली याकडे लोकांची दृष्टि नसते. "

" हें पहा-तूं अशी सारखी माझ्याशीं वाद घालीत बसूं नको. तुला आपल्या नवऱ्याचा शब्द ऐकून त्याला सुखी करायचं आहे कां ? " कपाळाला आठ्यांचं जाळें विणीत माधव म्हणाला.

" बरं बाई, आपल्याला ज्यांत आनंद आहे, त्यांत मलाही आनंद मानून घेतला पाहिजे. मात्र आपला हा कोटीक्रम आपल्या असुखाला कारण न हो म्हणजे झालं ! "

आपल्या मताला पत्नीचाहि पाठिंबा मिळाल्याचें पाहून माधवाला कल्पनातीत आनंद झाला, मालतीनें आपलें डोकें माधवाच्या वक्षस्थलावर ठेवलें होतें पुढें येणाऱ्या दिव्याच्या जाणीवेनें तिच्या नेत्रांतून मोत्यांच्या सराप्रमाणें टपाटप अश्रू पडत होते. त्या समाधींतच दोघेंही झोंपी गेली.

* * * *

## २

" माधव—ए माधव ! "

हांक मारीतच वामनानें माधवाच्या खोलींत प्रवेश केला.

" अद्याप आले नाहींत ते स्टुडिओंतून आणि असं बाहेरूनच काय विचारा-याचं भाऊजी ! " मालतीनें उत्तर दिलें.

" केव्हां येईल मग ?—लवकर येणार असेल तर बसतों. जरा वाट पाहात त्याची !—मग बसूं कां वहिनी ? "

" इश्श, त्यांत काय विचारायचं ?—बसा कीं ! नाहीं तरी नेहमीं त्यांच्याच-पाशीं यावं अन् वहिनींची विचारपूस देखील करूं नये असं थोडंच आहे ! "

" कोण म्हणतो ?—पण आतांशा तुम्हीं पुष्कळदां स्टुडिओंतच असतां तो " संभाजी " चित्रपट सुरू झाल्यापासून !—मग आम्हीं तुम्हांला कसं नि केव्हां भेटावं ?—आणि तरी सुद्धां आमचीच चूक नाहीं कां वहिनी ? "

" होय बाई ! जावं लागतं खरं आतांशा असं सारखं बाहेर—कुणाकडे जाणं नाहीं येणं नाहीं,—सारखा आपला संसार नि सिनेमा ! पण काय करायचं ? जे जे संस्कार ह्या देहाला घडायचे असतील ते ते सोसले तर पाहिजेत ? "—मालतीनें एक दीर्घ सुस्कारा सोडला.

" म्हणजे !—असें काय म्हणतां वहिनी ? माधवाप्रमाणें तुम्हींही सिनेमाच्या प्रेमी आहांत—सिनेमाच्या धंद्यांत क्रांति घडवून आणण्याचा तुमचा दोघांचा विचार आहे, मग असं आपल्या आवडत्या व्यवसायाबद्दल तुम्हांला असं उसासा सोडण्याचं कारण ? "

आपण बोलण्यांत घाई केली ही आपली चूक ध्यानीं येतांच मालतीनें जीभ चावली, पण वामनानें ती चक्क पाहिली. " कुणी सांगितलं आपल्याला भाऊजी, मी सिनेमासृष्टींत क्रांति घडवून आणणार आहे म्हणून ? " आश्चर्यानें मालतीनें प्रश्न केला. " अरेच्या कुणी म्हणजे काय ? तुमची मुलाखत · प्रसिद्ध झाली आहे ना त्या परवाच्या ' विश्ववृत्त ' पत्रांत ! "

" माझी मुलाखत ? " मालतीच्या आश्चर्याचा पारा अधिकच चढला.

" आणि ती कोणी घेतली ? "

" म्हणजे तुम्हांला पत्ताच नाहीं वहिनी ?—आश्चर्य आहे बुवा !—अहो, त्यांत चांगली तुमच्या तोंडचीं उत्तरें आहेत. तुम्हांला ही कला केव्हांपासून आवडली त्या कलेच्या वृद्धीसाठीं तुम्ही कोणत्या सुधारणा करणार आहां, तुम्ही उठतां

केव्हां—व्यायाम घेतां कीं नाहीं—सकाळीं फेरफटका करण्याचा तुमचा नियम आहे, तुम्हांला मांजरापेक्षां कुत्रींच फार आवडतात, तसेंच पारव्यावर तुमचें फार प्रेम आहे आणि--"

" आणि हें सगळं त्यांत लिहिलं आहे भाऊजी ? "

" तुम्ही गाण्यासाठीं नृत्यासाठीं किती तास खर्चिता-शिवाय पाश्चात्य चित्रपटांत जेनेट मॅक्डॉनल्ड ह्या नटीचा अभिनय फार पसंत आहे—"

मालतीच्या रागाचा पारा आतां फारच वर चढल्यामुळें पुढले शब्द ऐकणेंही तिला अशक्य झालें.

" पुरे करा भाऊजी ! धादांत खोटं आहे हें ! !—मी कुणाला मुलाखतही दिली नाहीं आणि माझ्याकडे कुणी मुलाखत घ्यायलाही आलं नाहीं व ती देण्याची लायकीही एका चित्रपटांत मारून मुटकून काम केल्यानें माझ्यामध्यें आली नाहीं हें मी स्पष्ट आपल्याला सांगतें भाऊजी ! "

वामन विचारांत पडला. मालतीचे क्रोधानें लाल झालेले डोळे पाहून आपण हा विषय उगाचच काढला असें त्याला वाटलें.

" राहूं द्या तो विषय वहिनी !—आपण आपल्या दुसऱ्याच गोष्टीकडे वळूं या—त्या तुमच्या बाळूचं पत्र येत असतं कां तुम्हांला आतांशीं ? "

वामनाच्या प्रश्नांकडे लक्षच नव्हतें मालतीचें !

"साऱ्यांनीं माझ्या आयुष्याचा खेळखंडोबा मांडला आहे ! "

रागाचें अवसान उतरतांच तिला आपल्या असहाय्य स्थितीची जाणीव झाली. तिच्या डोळ्यांत अश्रू चमकूं लागले.

" हें काय वहिनी ?–असं डोळ्यांत पाणी कां ? क्षमा करा वहिनी ! मी हा विषय काढायला नको होता ! "

" त्यांत तुमची चूक मुळींच नाहीं भाऊजी—ओघालाच साऱ्या गोष्टी आल्या म्हणून सांगतेंच. माझ्या भावना मी आजवर कशा इथं सांठवून ठेवल्या आहेत, एक मला नि त्या सर्वसाक्षी परमेश्वराच माहीत ! मला ना आई ना बाप, ना कुणी मैत्रीण. माझं दुःख मी कुणाला सांगायचं ?—भाऊजी, सिनेमांतील हा नटीचा पेशा मी स्वखुषीनें पत्करिला आहे असा का तुमचा साऱ्यांचा समज आहे ? "

" म्हणजे ? "

तेंच तर मी आतां सांगणार आहे तुम्हाला भाऊजी ! केवळ पतीचा शब्द खालीं पाडावयाचा नाहीं—त्यांच्या अर्ध्यावचनांत वागायाचं म्हणूनच मी हें खडतर व्रत पत्करलं आहे. भाऊजी ! पत्नीचं सतीत्व पाहण्याच्या आर्यांच्या चालीरीती आतां ह्या विसाव्या शतकांत पार बदलल्या आहेत. तिकडलं प्रेम सिनेमावर अतिशय, म्हणूनच भालचद्रांनीं त्यांना मॅनेजरची जागा द्यायचं कबूल केलं पण एकाच अटीवर ! "

" कोणती ती अट ? "

"–कीं मी मध्यें मुख्य नायिकेचं काम केल्यास !—मला ही कल्पना कशीशीच वाटली; पण तिकडून माझी समजूत घालण्यांत आली कीं भालचंद्र आपलेच आहेत. शिवाय कंपनी काढण्यांत सिनेमासृष्टींत सुधारणा घडवून आणण्याचा दोघांचा बेत होता. हं त्या त्या हलक्या दर्जाच्या नटीबरोबर काम करणें भालचंद्राना आवडेना ! "

" माधव सुद्धां काम करतोना ? "

" होय ! "

" मग तुम्ही माधवाबरोबरच काम करण्याचा अट्टाहास कां धरला नाहीं ?–माधवानेंच मुख्य भूमिका कां घेतल्या नाहींत ? "

" पण भालचंद्र मालक आहेत. त्यांची इच्छा हेंच कंपनीला प्रमाण ! " त्यानांही मुख्य काम करण्याची—व तेंही माझ्याबरोबर—फारच आवडल्यामुळें त्यांनीं स्वारीला गळ घातली. मी पुष्कळ आढेवेढे घेतले, परंतु स्वारीनें माझ्या आर्यपत्नीत्वाची कसोटीच मुळीं ह्या मुद्यावर घेण्याचें ठरविलें. दोन दिवस खाणें पिणें सोडून दिलें. शेवटीं मी कबूल झालें तेव्हां कुठें स्वारी पूर्ववत् वागूं लागली माझ्याशीं !—भाऊजी, प्रणयाच्या प्रसंगाचं स्टेजींग आलं म्हणजे माझी स्थिति काय होत असेल याची कल्पना तुम्हाला कशी होणार ? शिवाय अशा प्रसंगीं भालचंद्राच्या नजरेंत एक प्रकारची मादकता दृष्टीस पडते, त्यामुळें तर माझें सर्व शरीर कंपित होतें. त्या नजरेंत विषयलालसेचें वीष कसं दिसून येतं हें आम्हां स्त्रियांखेरीज इतरांना कसं कळणार ?

" पण माधवाला याचं कांहींच वाटत नाहीं ? नायक नायिकेचा ज्यांत

शृंगार दाखविला जातो असे प्रसंग दाखविले जाण्याचा संभव नेहमीं असतो चित्रपटांत—अशा तऱ्हेचीं कामें करण्याची त्यानें तुम्हाला कशी परवानगी दिली ? "

" त्यांचा कोटीक्रम ह्या बाबतींत कांहीं विलक्षणच आहे. शृंगारिक हावभाव करतांना, त्यांत पापवासना नसते म्हणून तें कृत्य अनीतीच्या सदराखालीं येऊं शकत नाहीं, असं त्यांचं मत आहे. "

" पण त्या कृत्यांत पापवासना आहे कीं नाहीं हें कसं ठरवितां येईल आपल्याला ? "

" तेंच तर मी त्यांना सारखं विचारीत होतें. पण ' माझ्याशीं वाद घालीत बसूं नकोस, तुला माझें म्हणणें ऐकायचें कीं नाहीं ' हा निर्वाणीचा प्रश्न जेव्हां त्यांनीं मला विचारला तेव्हां मी माझी सारी विचारसरणी बाजूला ठेवून कबूल झालें एकदाची ! "

वामन थोडासा विचार करूं लागला.

" हें पहा वहिनी, आपण त्याचाच कोटिक्रम त्याच्याच गळ्यांत घातला तर ! "

" तो कसा ? "

" थोडसं नाटक करावं लागेल-पण आतां तुम्हांला नाटकांत-नव्हे सिनेमांत अभिनय करण्याची संवयच झाली आहे, तेव्हां—"असं म्हणून वामनानें आपला सारा बेत मालतीला समजावून सांगितला. एवढ्यांत दारांत पावलें वाजलीं. माधवच होता तो ! तें बोलणें तिथवरच राहिलें.

* * * *

ती एक मोठी विस्तीर्ण खोली होती. मधोमध एक लिहिण्याचा मेज ठेवला होता. त्यावर एका बाजूला टेलिफोनचा स्टॅन्ड, हिरव्या कांचेची एक मोठीशी जोडदौत, चामड्यानें मढविलेलें एक ब्लॉटिंग पॅड, आसपास वेगवेगळ्या लेखकांची " सिनेमा हॅन्डबुक्स् " डेन्चचें Making The Movies वगैरे सिनेमाच्या धंद्याला लागणारीं प्रमुख पुस्तकें इतस्ततः पडलीं होतीं. त्याप्रमाणें सिनेमाला वाहिलेल्या अनेक मासिकांचा ढीग बाजूला करून ठेवण्यांत आला होता. पाश्चात्य व पौर्वात्य प्रख्यात सिनेमा नटींची—विशेषतः नटींचीच

छायाचित्रें प्रामुख्यानें भिंतीवर लटकविलेलीं होतीं. या सर्व वातावरणावरून तें एखाद्या सिनेमा कंपनीच्या मॅनेजराचें अगर मालकाचें ऑफिस होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. दरवाजाला असलेल्या कांचेच्या अर्ध शटरवरही "ऑफिस" अशी इंग्रजी अक्षरें दिसत होतीं. भालचंद्र एका पाश्चात्य नटीच्या फोटोकडे अनिमिष नजरेनें पहात बसला होता. एवढ्यांत कांचेच्या शटरवर तीन टिचक्या कुणीतरी मारलेल्या भालचंद्रानें ऐकल्या.

"कोण आहे ?" भालचंद्रानें गडबडीनें फोटो बाजूस ठेवून विचारलें.

" मी ! " बाहेरच्या व्यक्तीनें उत्तर दिलें.

कांचेच्या त्या शटरखालून स्त्रीच्या लुगड्याचा घोळ, व चपला घातलेले पाय भालचंद्राला दिसले.

" या आंत या ! "

बाहेरील व्यक्ति आंत आली.

" ओ हो ! मालतीबाई ! !—आणि आज ऑफिसांत !—या–बसा इथं ! असं म्हणून मोठ्या उत्सुकतेनें भालचंद्रानें आपल्या शेजारची गादीची खुर्ची पुढें केली. मालतीकडे तो क्षणभर पाहतच बसला.

आजचा मालतीचा थाटही कांहीं औरच होता. कुणीं कांहीं म्हटलें तरी स्त्रियांचं अर्ध अधिक काम त्यांच्या वेषभूषेवरून साध्य होतं. आपल्या भूमिके-करतांहि इतक्या उल्हासानें थाटमाट करतांना मालती त्यांना दिसली नाहीं. ' खरंच, स्त्रियांच्या स्वभावाचं कोडं सोडवणं मोठं अवघड काम आहे ' असंच भालचंद्राला वाटलं.

" आज इथं कोणत्या निमित्तानं येणं झालं आमच्या स्टारचं ? "

" हें पहा भालचंद्रपंत, आज कित्येक दिवस मी विचार करीत आहे पण माझ्या कामांत कांहीं मला Satisfaction नाहीं वाटत ! "

"—आणि बरोबरच आहे तें !–त्याचं कारण तुम्ही मनमोकळेपणानें काम करीत नाहीं. त्या ' संभाजी ' चित्रपटांत तुम्हीं केलेलं काम फार घाबरून केल्यासारखं वाटतं—अन् लोकही तीच Criticism करताहेत त्यावर ! "

" म्हणजे कसं करायला पाहिजे होतं बाई ! "

" त्याचं असं आहे,—तुम्ही जी माझ्या गळ्याभोंवतीं मिठी घातली आहे

ना ती किती भीत भीत घातल्यासारखी दिसते आहे. नाहींतर विलायती चित्रपट पहा,---त्या बायकांना मुळीं कांहीं शिकवावं लागत नाहीं ! ”

“ खरंच मलाही असंच वाटूं लागलं आहे आतांशा. मी माझ्याकडून कसूर करीत नाहीं भालचंद्रपंत, पण आम्हां हिंदु स्त्रियांचे संस्कार कांहीं झालं तरी आपला अंमल चालविणारच आमच्यावर नाहीं कां ? ह्या साऱ्या चुका माझ्या हातून होऊं नये म्हणून मी आधींच तालीम घेण्याचं ठरविलं आहे, व त्यासाठींच आपली मदत मागायला व सल्ला घ्यायला मी आलें आहे. ”

“ वा, मग तर आनंदच आहे ! आम्हांला कुठून तरी उत्तम व आकर्षक असेच चित्रपट तयार करायचे आणि कंपनी काढण्यांत आम्हीं हेंच ध्येय आमच्यापुढें ठेवलं आहे. आपल्यासारख्या सुशिक्षित स्त्रियांनीं मन लावून व इतकी मेहनत घेऊन काम करायचं ठरविल्यानंतर काय प्रश्न आहे ? यश जवळच आहे समजायचं मालतीबाई, नाहीं कां ?—व म्हणूनच मी म्हणत असतों कीं सुशिक्षित स्त्रियांनीं जर ह्या क्षेत्रांत पाऊल घातलं तरच त्या ती कला सुधारण्याचा प्रयत्न करतील; आतां तुम्हींच पहा, तुमचं काम तुम्हांला समाधानकारक वाटत नाहीं म्हणून तुमच्या मनाला तळमळ लागून तुम्ही इथवर आलां, माझ्या सल्याकरितां ! आपल्या सारख्याची सहानुभूति हेंच मी आपल्या कंपनीचें यश समजतों—आपलं काय म्हणणं आहे ? ”

“ मी सांगितलंच मघा आपल्याला भालचंद्रपंत, कीं डायरेक्टरांसमोर व स्टुडियोंत काम करण्याच्या वेळीं जमा झालेल्या अनेक माणसांसमोर पुष्कळदां चुकायला होतं—शिवाय असे प्रसंग एकदांच घेण्याचें सोडून, ते चांगलेसें साधत नाहींत ह्या सदराखालीं असे प्रणयचेष्टांचे प्रयोग माझ्या कडून डॉयरेक्टर अनेक वेळां करून घेतात, व हे सर्व टाळण्यासाठीं त्या त्या प्रसंगाची तालीम अगाऊच करून ठेवली तर, सगळ्या लोकांसमोर होणाऱ्या ह्या विटंबना तरी टळतील नाहीं कां ? मालतीच्या सूचनेबद्दल भालचंद्राला अतोनात आनंद झाल्यासारखा दिसला, व अशाप्रसंगीं नेहमी त्यांच्या डोळ्यांत चमकणारें विषारी तेज पुन्हां एकवार चमकल्याचा मालतीला भास झाला. तिचें अंग जरा थरारलें, पण तिनें आपल्याला सांवरून घेतलें.

“ ही कल्पना माझ्या मनांत केव्हांपासूनच आली होती मालतीबाई; परंतु

ती आपल्याला रुचेल न रुचेल म्हणून आपल्यापाशीं उघड करण्याचें धाडस मी केलें नाहीं " भालचंद्र म्हणाले.

" एकदां एखादं कार्य हातीं घेतलं म्हणजे त्यांत चुकारपणा करूं नये असं आपलं मला वाटतं "

" छान !—फारच छान ! ! आतां आपण त्या नवीन चित्रपटांतील तो राधारमणाचा सीन तयार करून ठेवूं हो शुभस्य शीघ्र ! आणखीन दोन आठवड्यानें सीन घेण्याला सुरवात होईल. त्यापूर्वी डायरेक्टरकडून ती भूमिका समजावून घेतों. "

" पण आपण स्टुडीओमध्येंच कां ही सारी व्यवस्था करूं शकाल ? "

" हो ! त्याला काय हरकत आहे ? रविवारीं सुट्टी असते व दिवाणखान्याच्या असलेल्या त्या खोलींत आपल्याला सहज प्रॅक्टीस करतां येईल. "

" मग ह्या रविवारीं जमेल ?—सवड आहे आपल्याला ? "

"सवडीचा प्रश्नच नाहीं मालतीबाई ! हें लोकांचं कां काम आहे ? माझ्याच कामाला मी सवड नाहीं काढायची तर कुणी ? " असें म्हणून भालचंद्र मनसोक्त हंसले.

" बरं जाते बाई मी आतां, बराच वेळ घेतला आपला, मग येत्या रविवारीं मी साडेसहाच्या सुमारास येईन हं ! "

असें म्हणून मालती ऑफिसच्या बाहेर पडली.

भालचंद्र किती वेळ तरी तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहातच होते.

" शेवटीं मासा गळाला लागण्याच्या बेतांत आला आहे म्हणायचा " ते आपल्याशींच पुटपुटले. स्मिताची एक मंद रेषा त्यांच्या गालांवर उठली.

* * * *

बीच कॅन्डीच्या समुद्रांत असलेल्या एका विस्तीर्ण खडकावर दोन तरुण बसले होते—अगदीं दोघेच ! तो खडकहि त्यांनीं जनसंमर्दापासून दूर असा शोधून काढला होता. आजूबाजूनें समुद्राचें पाणी त्या खडकावर आपटत होतें—पण या तरुणांना त्याची दादही नव्हती. अंधार पडत चालला. माणसांच्या नुसत्या आकृत्या दिसूं लागल्या. समुद्राचें पाणीहि आतां खडकावर चढत चाललें.

" आतां चलूं या ना माधव ? अंधार पडत चालला. पायाखालची वाट दिसायची नाहीं या काळ्या खडकांत ! " त्या तरुणांपैकीं एक उद्गारला. थांबरे, जरा वेळ बसूं— घरीं जाऊन तरी काय करायचं ? अंधाराविषयीं म्हणशील तर आतां अंधाराची मुळींच भीति वाटत नाहीं मला ! अंधारापेक्षां किती तरी गोष्टी जगांत भिण्यालायक आहेत ? "

" —आणि हें काय नवीन तत्त्वज्ञान आज तूं शिकवूं लागला आहेस ? "

" वामन, जसजसें आपण संसारसमुद्राचा किनारा सोडून मध्यावर येतों, तसतशीं आपल्याला एकाकी जीवनाची कल्पना येते नाहीं ? "

" ह्या काव्यांतलं एक अक्षरही कळलं नाहीं मला माधव ! "

" थट्टा करूं नकोस, वामन !–खरंच, तूं ह्या संसाराच्या मोहाला बळी पडून आंत शिरला नाहींस ही खरोखर फार चांगली गोष्ट केलीस ! "

" अरे, पण असं झालं तरी काय तुला एकाद्या बैराग्याप्रमाणें उद्गार काढायला ? "

" माझ्या घरची परिस्थिति तुला एकूण कळली नाहीं म्हणायची ? "

" म्हणजे ! तुझ्या घरीं तर तुझ्यावांचून नि वहिनीवांचून कोणीच नाहीं; मग परिस्थितींत वादळ उत्पन्न व्हायला काय कारण ? "

" दोन माणसेंसुद्धां आयुष्यांत वादळ उत्पन्न करूं शकतात, वामन ! "

" हुं !—याच्यावरून मला एक अशी अंधूक कल्पना येत आहे, कीं तुम्हां दोघांत कांहीं तरी वादळ सुरूं झालं आहे आणि तुझ्या म्हणण्याप्रमाणें वहिनींच्या इतकाच तूंहि त्याला कारणीभूत आहेस ! "

" असं कोण म्हणतो ? मुळींच नाहीं ! मी माझी चूक सुधारून असं म्हणतों कीं दोन माणसांच्या संसारांतसुद्धां वादळ उत्पन्न होऊं शकतं ! "

" बरं वाद राहूं दे ! वादळाचीं लक्षणं तरी सांगशील ? "

" वामन तूं अद्याप वैवाहिक बंधनांत पडला नाहींस म्हणून तुला माझ्या मनाच्या परिस्थितीची जाणीव नाहीं, व ह्या सर्व गोष्टी तूं विनोदांत काढूं शकतोस ! "

" माधव मी जरी वैवाहिक बंधनांत शिरलों नसलों तरी मला तुझ्याबद्दल सहानुभूति वाटणार नाहीं हें तुझं विधान सर्वस्वी खोटं आहे—आज कित्येक दिवसांपासून मला तुझ्या मनोवृत्तींत फरक झालेला दिसून आला आहे, त्याच

प्रमाणें वहिनींच्या वागणूकींतील फरकहि माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहिला नाहीं; पण म्हटलं ही तुम्हां पति-पत्नींतील चहाच्या पेल्यांतील वादळ, त्यांत आपण कशाला पडायचं ! "

" म्हणजे मालतीच्या वर्तणूकींत फरक तुलाही दिसून आला तर मग—वामन ! "

" तसंच—केवळ नाहीं—पण पूर्वीसारख्या वहिनी मनमोकळेपणानें माझ्याशीं बोलत नाहीं. नेहमीं कुठं तरी बाहेर जाण्याच्या गर्दींत असतात ! "

" अगदीं बरोबर बोललास हेंच तिचं वर्तन मला अलिकडे असह्य होऊन बसलं आहे, व गेल्या आठवड्यापासून तर तिच्या असल्या वर्तनाचा कळस झाला आहे. केव्हांही थकून भागून घरीं जा, ही कुठें तरी बाहेर गेलेली असायची, व तेवढ्यांत आलीच तर माझ्या बरोबर मन सोडून वागायचीही नाहीं. पूर्वी मी येण्याच्या वेळेला तासन्‌तास डोळ्यांत तेल घालून वाट पहाणारी मालती हीच कीं काय अशी आतां मला शंका वाटूं लागली आहे. स्टूडिओंतून घरीं यावं, तिच्या बरोबर फिरायला जाण्याच्या उद्देशानें तो ही बाहेर मैत्रिणीबरोबर फिरायला जाण्याचा हट्ट धरून बसायची ! "

" कोणत्या मैत्रिणीबरोबर ! किती वाजतां ? "

" अरे संध्याकाळीं सहाच्या सुमाराला ! पण तिच्या मैत्रिणी अलिकडेच उद्भवल्याचं पाहिलं आहे मी ! यापूर्वी ती नांवही काढीत नसे मैत्रिणीचं ! "

" आणि किती दिवसापूर्वीची ही गोष्ट तूं सांगतो आहेस ? "

" आज आठ दिवस तर हा प्रकार वाढत्या प्रमाणावरच आहे ! "

" माधव, मला क्षमा कर-परंतु वहिनी कांहीं फिरायला जात नाहींत ! "

" मग,-कुठें जात असते ती ? " आश्चर्यानें माधवानें विचारलें.

" मी आज आठ दहा दिवस नित्य त्या सुमारास स्टुडिओंत जातांना त्यांना पाहातों आहे ! "

आपण दिलेल्या माहितीचा माधवाच्या मनावर काय परिणाम होतो हें पाहण्याकरितां वामन किंचित् थांबला.

" काय ?-स्टुडिओंत ! शक्यच नाहीं वामन ! साडे पांच वाजतांच आम्ही सर्वजण कुलुप लावून बाहेर पडतों. नियमितपणाच्या बाबतींत आमच्या कंपनीचा हात धरणार नाहीं कुणी ! "

" बरं किल्ली कुणाच्या ताब्यांत असते ? "

" भालचंद्राच्या ! "

" मग त्यांची लहर लागली स्टुडिओंत जायची तर त्यांना कोण बंदी करणार ? "

" कुणीच ना—हीं म्हणा !–म्हणजे तुझ्या बोलण्याचा अर्थ असा दिसतो कीं भालचंद्र तेथें जात असतो—पण त्याच्या जाण्याचा नि मालतीचा संबंध काय ? "

" हें पहा, तेंच मी सांगू शकत नाहीं—स्त्री पुरुषांचे संबंध कसकसल्या प्रकारचे असतील—"

" चूप, चूप वामन ! तुझ्या बोलण्याचा अर्थ माझ्या लक्षांत आला पण मला नाहीं हें खरं वाटत ! "

" प्रत्यक्ष प्रमाण दाखविलं तर ? "

" अरेरे ! तर–तर माझ्याच हातून मी आपल्या पायावर धोंडा पाडून घेतला म्हणायचा ! छे, वामन पुढील कल्पनाहि मला करवत नाहीं. मालतीच्या प्रेमाकरितां माझा जीव मी ओवाळून टाकला असता ! मालती, मालती ! काय आग पेटविलीस तूं ही ! "

" माधव, पण तिला तिथं टाकायला कारणीभूत तूंच ना ? "

" होय. मीच ! पण मालतीच्या शीलाबद्दल मला पूर्ण खात्री होती ! "

" विस्तवापाशीं ठेवलेलें लोणी वितळल्यास अपराध कुणाचा ? "

" नाहीं नाहीं–मला नाहीं हें खरें वाटत वामन ! माझी खात्री करून देशील या बाबतींत ? "

" हो देईन ! "

" केव्हां ? "

" उद्यांच ! उद्यां रविवार आहे ना—तुमचा स्टुडिओ बंद असतो ना ? तेव्हांच ! सात वाजतां आपण जाऊं. स्टुडिओच्या कोणत्या तरी भागांत तुला तीं दोघेंही आढळतील ! "

" वामन तुझ्या ह्या बोलण्यानें माझ्या अंतःकरणांत पहा रे कशी ही आग उठली आहे ती ! छे, ही कोण निवारणार ? "

" ए,–तूं असा हताश होऊं नकोस. अद्यापिहि या गोष्टी कांहीं इतक्या थराला पोंचल्या नाहींत !––त्या सुधारतां येतील. "

बरीच रात्र झाली. त्या अंधारांत खडकावर ठेंचाळत ठेंचाळत हे दोघे तरुण चालले होते.

*     *     *     *

वामनच्या अपेक्षेप्रमाणें भारत चित्रपट कंपनीचा दरवाजा त्या रविवारच्या संध्याकाळीं उघडाच होता. माधवाला स्टुडिओची पूर्ण माहिती असल्यामुळें त्याला फारसें भटकावें लागलें नाहीं.

" चूप––चूप ! तो पाहिलास त्या खोलींत उजेड दिसत आहे " वामन म्हणाला.

" होय !––अरे तो आमचा रंगपट आहे––आणि आज रंगपटांत असं कुणाचं काम असणार ? "

" गप्प रहा––चल् सावकाश ! आवाज होऊं देऊं नकोस पावलांचा, तूं पुढें चल् तुझ्या मागून मी येतों. " वामनानें माधवाला बळेंच पुढें ढकलिलें.

दोघेही हळुहळु चालले, रंगपटाच्या दरवाजाजवळच एक मोठा गच्चीचा फ्लेट ठेवण्यांत आला होता. त्याच्या आडोशाला दोघेही उभे राहिले. रंगपटांत चारी बाजूंला मोठाले आरसे नटांच्या उपयोगाकरितां ठेवण्यांत आले होते.

पण माधवाला काय दृश्य दिसलें ?

एका भव्य आरशापुढें भालचंद्राच्या खांद्यावर मान टाकून मालती उभी होती. तिचा उजवा हात त्यानें आपल्या डाव्या हातांत धरला होता व तिला सांवरण्यासाठीं आपल्या उजव्या हाताचा विळखा तिच्या नाजुक तनुलतेभोंवतीं घातला होता. हें दृश्य सभोंवारच्या सर्व आरशांमध्यें प्रतिबिंबित झालेलें होतें. माधवाला वाटलें आपलें मस्तक भ्रमण करीत असल्यामुळें हें सारें दिसतें आहे. त्या आरशांत दिसणारीं तीं भालचंद्र मालतीच्या आश्लेषाचीं दृश्यें एखाद्या चवताळलेल्या भुतावळीप्रमाणें आपल्याला सतावून सोडीत आहेत असें त्याला वाटलें.––

" वामन, वामन, मी पडतों रे ! "

माधवाला मूर्च्छा येते कीं काय याची वामनला भीति वाटली. आपलें

इच्छित काम योग्य तऱ्हेनें पार पडलें असें त्याला वाटलें. त्यानें कसाबसा माधवाला घरीं पोंचविला.

*     *     *     *

" काल तूं कुठें होतीस संध्याकाळीं मालती ? "

त्वेषानें माधवाचे डोळे लाल झाले होते.

" आपल्याला काय करायचं त्याच्याशीं ! " शांतपणानें मालतीनें उत्तर दिलें.

" बरोबर आहे ! मी कोण तुझा आतां चवकशी करायला ? "

" असं काय तें संतापायचं, आल्याबरोबर ! प्रथम जेवून घ्या मग पाहूं या ! "

" माले हे लपंडाव चालायचे नाहींत आतां माझ्यापुढें ! काल कुठें होतीस संध्याकाळीं हें मला कळलंच पाहिजे—याशिवाय अन्न ग्रहण करणार नाहीं मी ! " असें म्हणून माधवानें मालतीचा हात आपल्या हातांत गच्च धरला.

" च् च् च् ! किती जोरानें धरला तरी !—सोडा गडे ! "

" मालती कळवळून म्हणाली.

" हा कोडगेपणा आतां नाहीं चालायचा—हा सिनेमाचा स्टुडिओ नाहीं हावभाव करून दाखवायला ! "

" हावभावाचं शिक्षण घ्यायाला आपणच मला लावलंत नाहीं ?— मग आतां कां ? "

" मुख्य प्रश्नाचें उत्तर दे मला ! काल कोठें होतीस तूं ?

" गेलें होतें स्टुडिओंत ! "

" काल रविवारीं स्टुडिओंत तुझं काय काम होतं ? "

" होतं माझं काम—मला तालीम करायची होती पुढच्या चित्रपटांतील कामाची ! "

" तालीम अशी अवेळीं करायचं कारण ? "

" कारण !—एकदां चित्रपटांत काम करण्याचं पत्करल्यावर आपल्या हातून कामं चांगलीं वठावीं म्हणून एखाद्यानं जर असा कसोशीचा प्रयत्न केला तर त्याबद्दल आपल्याला एवढं वाईट वाटण्याचं कारण ? "

" कारण ?—त्या भाल्याच्या खांद्यावर खुशाल तासन्तास मान ठेवून बसलीस शरम नाहीं वाटत तुला ?"

" अस्सं ! एकूण आपण माझ्या पाळतीवर होतां तर ? आणि एकदां दुसऱ्याबरोबर काम करण्याची परवानगी दिल्यावर माझ्यावर एखाद्या चोराप्रमाणें पाळत राखण्याचं आपल्याला काय कारण होतं ?"

" धडधडीत तालमीच्या नांवाखालीं त्याच्या बरोबर प्रणयक्रीडा खेळतेस तरी मी तुझ्या लग्नाच्या नवऱ्यानें तें सारं उघडया डोळ्यांनं पाहावं ना ?"

" आमच्या नुसत्या तालमींतल्या त्या ' पोझ ' वरून ह्या आमच्या प्रणयचेष्टा होत्या असं आपण कसं सिद्ध कराल ? आमचे मनोविकार आपल्याला दिसले ? आणि एकाद्या कृत्यांत पापवासना नसल्यास तीं कृत्यें पापाच्या-अनीतीच्या सदरांत येऊं शकत नाहींत हा आपलाच बुद्धिवाद ना ? आपलाच कोटिक्रम ना ? मग आमच्या नीतिविषयीं, वर्तनाविषयीं साशंक होण्याचं कारण ?"

" म्हणजे ! माझेच दांत माझ्याच घशांत घालायचा बेत आहे तुझा ! ! तेवी कांहीं नाहीं—पुरे झाल्या ह्या प्रणयचेष्टा, उद्यांपासून सिनेमा बंद ! ! !"

" पण गडे, आतां मला त्या कलेची फार गोडी लागली आहे !"

गप्प—एकदम तोंड बंद ! तुझाच नवरा तुला आज्ञा करतो आहे कीं उद्यां पासून सिनेमांतली नोकरी बंद !"

आपणाकडे पाहून मालती गालांतल्या गालांत हंसत आहे असा माधवाला संशय आला.



# निपुत्रिका



" घरांत आहेस कायरे नानू ? "

थेट आंतल्या खोलींत प्रवेश करीत केशवकाकांनीं प्रश्न केला.

वास्तविक पाहिलं असतां मी घरीं नसल्यास घराचा दरवाजा उघडा असणेंच शक्य नाहीं हें त्यांच्या ध्यानीं यावयास पाहिजे होतें, कारण मी एक फटिंग होतों, माझ्या घरांत—नव्हे साऱ्या जगांत सुद्धां—माझं म्हणायला असं कुणीच नव्हतें, व ही माझी परिस्थिति चाळींतील साऱ्या जगाला माहीत होती. इतकं भ्रमिष्ट बनायला केशवकाकांना काय कारण झालें असावें याचा विचार मी करतों आहे तोंच ते अगदीं माझ्याजवळ ठेपलेहि.

मी नुकताच समाज सेवासंघांतून पतित परावर्तनावर व्याख्यान देऊन परतलों होतों, व खाणावळींतून मागविलेला डबा उघडित होतों.

" कायरे नानू ? अद्याप जेवला नाहींस ? कुठें होतास इतका वेळ ? " जड जड शब्दांनीं केशवकाकांनीं विचारलें.

" इथं गिरगांवांत तो समाज सेवासंघ आहे ना ?—त्याचा तो सेक्रेटरी आपला तो आप्पा चिटणीस नव्हे का ?—आज कित्येक दिवस लागला होता माझ्या मागं व्याख्यान द्या म्हणून—शेवटीं आज झालों एकदांचा मुक्त त्याच्या शब्दांतून ! "

" कोणत्या विषयावर बोललास ? "

" पतित परावर्तनावर ! "

" अस्सं—पतितपरावर्तनावर ? म्हणजे तुम्हीही त्याच मताचे आहांत एकूण असं दिसतं ! " हें वाक्य उच्चारतांना केशवकाकांच्या नजरेंत एक विलक्षण चमक मला दिसून आली.

" त्याच मताचे म्हणजे कसें ? "

" म्हणजे,—ज्या स्त्रियांचं पाऊल कांहीं कारणामुळं वांकडं पडलं आहे

अशांना समाजाच्या जुलुमापासून सोडवावयाचं असंच ना ?—अलीकडे तरुणामध्यें या मताचा फार प्रसार झाला आहे ! ”

“ हो माझेंहि मत जवळ जवळ असंच आहे—आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणें तरुण पिढींत जर या मताचा पुरस्कार झाला असेल तर हितावह आहे कीं अनर्थावह ! आतां माझीं मतें बनायला कांहीं सबळ कारणंहि आहेत ? ”

“ कोणतीं, कोणतीं ? ” केशवकाका ह्या विषयावर बोलावयास फारच उत्सुक असलेसे दिसून आले.

“ पण नानू, तूं आपला प्रथम जेवून घे कसा ! मग आपण सावकाशपणें बोलूं ! ”

मलाहि ही कल्पना पसंत पडली.

केशवकाका कसल्या तरी विचारांत गढून गेलेले दिसले; नाहीं तर एवढा पोक्त माणूस, परंतु माझ्याशीं त्यांचें वर्तन एकाद्या समवयस्क मित्राप्रमाणें असे.

माझें जेवण आटोपलेलें पाहतांच केशवकाका म्हणाले, “ हें रे काय नानू, झालं तुझं जेवण ? – आणि हें काय सर्व अन्न तसंच टाकलं आहेस ? ”

“ कसलं हें खाणावळींतलं अन्न ! त्याला काय रुचि आहे—ही पोळी तर सर्व कच्ची ! ”

“ अरेरे असा उपाशीपोटीं उठलास रे ! आज कित्येक वेळां जें मी म्हणत आलों आहें नाना तेंच पुनः एकदां म्हणतों—आतां एकादी गृहिणी घरांत आणून तिच्या ताब्यांत कां करीत नाहींस तुझा संसार ?—अं—तुम्हां तरुणांचं चुकतं तें इथंच ! ”

“ कुठें ? ”

“ म्हणजे आतां तूं काय लहान आहेस ?—आतां शिकणं झालं, सवरणं झालं—वकिली करूं लागलास—चार पैसे मिळवूं लागलास नि लग्न न करण्याचा हा हट्ट कसला ? बोल कां नाहीं लग्न करीत ? ह्या अपेक्षा कुठवर सहन करणार ? ”

वास्तविक केशवकाकांचें म्हणणें अगदीं सयुक्तिक होतें. त्यांच्या एकाही प्रश्नाला मला समर्पक उत्तर देतां आलें नसतें; परंतु आजपर्यंत ह्या इतक्या जिव्हाळ्यानें विचारणारं माणूसच मला भेटलं नाहीं. शिवाय माझ्यासारख्या एकलकोंड्या वृत्तीच्या तरुणाच्या बाबतींत लग्नाचा प्रश्न तितकासा सुलभ नाहीं.

प्रेमकथांतील नायकाप्रमाणें मी अद्याप कुणाच्याहि प्रेमांत सांपडलों नव्हतों, व असं एखादीच्या प्रेमांत सांपडायला माझ्या निकटच्या परिवारांत स्त्रियांना वाव नव्हता, शिवाय रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्या एखाद्या तरुणीच्या प्रेमपाशांत आपण प्रथमदर्शनींच पडलों आहोंत असें समजून इतका भावनावश होणाऱ्या- पैकीं मी स्वतःला समजत नव्हतों, त्यामुळें आतांपर्यंत आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या प्रश्नाविषयीं मी जरी उदासीन नसलें तरी निःशंक होतों. केशवकाकांच्या प्रश्नाला टाळण्यासाठीं मी म्हटलें.

" अरे, हो–आज शेवंती नाहीं कुठें दिसली सकाळपासून ? "

शेवंती ही काकांची एकुलती एक आणि आईबापावांचून पोरकी अशी नात होती. एक वर्षच झालं ही जोडी आमच्या चाळींत येऊन रहायला–पण आमच्या दोन खोल्यावांचून चाळींत दुसरं जगच नाहीं अशा कल्पनेनें आम्हीं राहत होतों. त्यामुळेंच चाळींतल्या स्त्री प्रजेचा डोळा शेवंतीवर अतिशय होता, परंतु त्याकडे ती दुर्लक्ष करी. मी घरीं येतांच ही आजोबा–नातीची जोडी माझ्या खोलींत आसन मांडून बसायची. म्हणूनच नित्याप्रमाणें काकाबरोबर शेवंती नाहींसें पाहून मी विचारलें—" आज शेवंती नाहीं ती कुठें दिसली ? "

" बरं वाटत नाहीं तिच्या जीवाला आज ! झोंपून आहे दुपारपासून. " काय असेल तें असो. परंतु शेवंती आजारी आहे हें ऐकून मला फारसें बरें वाटलें नाहीं. अर्थात् प्रेमाबिमाची भानगड नव्हती, परंतु सहवासामुळें सहानु- भूति हळुहळू उत्पन्न व्हावयास लागली होती. मात्र तिच्याबद्दल हें मला कबूल केलें पाहिजे. शेवंतीच्या आजारावर बाजू येतांच केशवरावांचा चेहरा परत गंभीर बनला.

" त्याचं असें आहे नानू,—अरे, पण तूं जेवून तर घे सावकाश मग सांगतों सर्व ! त्यासाठींच तर आत्तां आलों ! "

आज केशवकाकांच्या मनांत विशेष विचार चालू असावेत याबद्दल माझी पूर्वीच खात्री झाली होती. मी माझें जेवण आटोपलें, व पुढल्या खोलींत आम्हीं बैठक मारली.

मी दिलेला विडा खात केशवकाका बोबडया स्वरांत म्हणाले, " कायरे नानू–तूं कसलं व्याख्यान देऊन आलास म्हणालास ? "

" पतित परावर्तन ! "

" अन् तूं मघा कांहीं तरी कारण सांगणार होतास नाहीं तुझीं मतें बनण्या-संबंधीं ! "

" होय !—माझं मत असं आहे कीं, समाजांत ज्या ज्या स्त्रिया आपण पतित म्हणून समजतों, त्या स्त्रियांना समाजानें जवळ घ्यावयाच्या—पावन करायच्या ! "

" जवळ घ्यायच्या—पावन करायच्या म्हणजे कशा ? आणि नुसतं जवळ घेऊन अशा हतभागी जीवांचें पोषण होणें शक्य आहे काय ? "

" केशवकाका, जवळ घ्यायचं म्हणजे—आतां आपण एक उदाहरणच घेऊं या ! एखादी स्त्री कुणाच्या तरी पाशवी इच्छेला बळी पडली आहे, अशा स्त्रीला मदत न करितां अधिकाधिक पापांत रुतून देणें म्हणजे एका परीनें समाजाचाच अधःपात नाहीं कां होत ? "

" होतो !—पण अशा स्त्रियांना त्या त्या स्थितींतून वर आणण्याचा उपाय कोणता नानू ? "

" उपाय ?-त्यांचा विवाह करून देणें हाच उपाय ? "

" विवाह !—आणि तो असल्या स्त्रियांशीं कोण लावून घेणार ? "

" हें पहा काका, आजच्या तरुण पिढीनेंच ह्या बाबतींत मनोधैर्य दाखविलं पाहिजे, कारण शेंकडा ऐशीं केसिसमध्यें पुरुषांच्या पाशवी शक्तीपुढें स्त्रियांचें सामर्थ्य लुळें पडतें असें मला आमच्या कोर्टांत येणाऱ्या अनेक खटल्यावरून दिसून येतें. "

" पण मी असं म्हणतो नानू—! "

असं म्हणून केशवकाका क्षणभर गप्प झाले.

" काय म्हणतां ? "

" मला वाटतं हीं सारीं व्याख्यानं ऐकावयाला गोड असतात, द्यावयास सुद्धां सोपी असतात, पण समजा एखादा स्वतःवरच प्रसंग असला म्हणजे जो तो आपल्या नाडीला शाबूत–असंच नाहीं कां नानू जगांत पहायला मिळत ? "

" खरं आहे तुमचं म्हणणं कांहीं अंशीं ! परंतु सर्वच व्यक्तींच्या बाबतींत मात्र हा सिद्धान्त लागूं पडणार नाहीं. "

" असं म्हणतोस !—समज उद्यां तुझ्यावरच असा कसोटीचा प्रश्न आला तर सोडवायाला ? "

" आला तर पाहून घेईन काय करायचं तें—त्याचा आतांच कशाला वाद घालीत बसायचा ? "

" मग मला परमेश्वरच भेटला तुझ्या रूपानं म्हणायचा ? "

ह्या त्यांच्या उद्गारांनीं मी चकितच झालों.

" तो कसा केशवकाका ? "

" आतां ओघालाच आलं आहे, तर सांगतों सर्व कांहीं " असं म्हणून थोडा वेळ ते स्तब्ध राहिले.

" नानू ! त्यांनीं बोलावयाला सुरवात केली. त्यांचा आवाज अगदींच उतरला होता.

" नानू ! ह्या जगांतील प्रत्येक मनुष्याच्या अनुभवाची सविस्तर टिपणें जर कुणी मिळविण्याचा प्रयत्न केला, तर मानवी आयुष्यांतील वैचित्र्याचे वेगवेगळाले केवढाले तरी नमुने पाहावयास सांपडणार आहेत ! नानू आज वर्षभर आम्हीं या चाळींत आहों, मुंबई सारख्या बकाली शहरांत, ह्या अठरापकड जातींच्या लोकांनीं भरलेल्या चाळींत कुणाकडून आम्हांला त्रास पोंचणार नाहीं अशी माझी अगदीं कालपर्यंत खात्री होती पण नाहीं–नानू आम्ही हा महिना अखेर दुसरीकडे खोली पहावी अशी आजच आमच्यावर नोटीस बजावली आहे. "

" कुणी ? "

" कुणी म्हणजे मालकांनीं ! "

" आणि ती काय म्हणून ? "

" तेंच तर सांगायला माझी जीभ धजत नाहीं नानू ! मागच्या साऱ्या गोष्टी आठवल्या म्हणजे दुःखाचे एवढे प्रहार सहन करण्याएवढं माझं अंतःकरण कशाचं बनविलें आहे परमेश्वरानें याचें मला नवल वाटतें. आजपर्यंतच्या तुझ्या अनुभवावरून शेवंतीविषयीं काय मत बनलें आहे तुझं नानू ? "

" अत्यंत सुशील आणि प्रेमळ मुलगी आहे ती असें मला वाटतं ? "

" आणि माझंहि तसंच मत आहे, पण व्हायचं तें झालं ! शेवंती लहानपणापासून आईबापावांचून पोरकी असल्यामुळें तिच्या पालनपोषणाचा भार

माझ्यावरच पडला. माझ्या घरीं तरी तिच्याकडे लक्ष देण्यास माझ्यावांचून कोण होतं ? त्यावेळीं विलासपूरांत एका शाळेचा हेड मास्तर होतों मी. माझा बहुतेक वेळ शाळेच्या कामांत जायचा. त्यामुळें त्या पोरीकडे लक्ष द्यायला माझ्या-सारख्या म्हाताऱ्या पुरुषाला फार कठीण जात असे. आमचं घर गांवापासून अंतरावर असल्यामुळें शेवंतीलाही शेजारसोबत मिळूं शकली नाहीं. तिचा सारा वेळ माझ्याकडे अभ्यासानिमित्त जमणाऱ्या मुलांची विचारपूस करण्यांत जायचा. त्यांतल्या त्यांत एका विद्यार्थ्याची—आतां नांव कशाला सांगूं त्याचं ! झालं गेलं !—त्या विद्यार्थ्याची आम्हाला विशेषतः शेवंतीला घरकामांत फारच मदत व्हायची. नानू आतां मी शेवंतीची बाजू घेत नाहीं, परंतु ती मुलगी अत्यंत अल्लड नि बालिश होती. एके दिवशीं असाच मी संध्याकाळीं घरीं आलों तो शेवंती घरांत मला कुठेंहि दिसेना. सारें घर धुंडाळलें. मागील दाराच्या अंगणांत एका झाडाखालीं असलेल्या टप्यावर ती ढोपरांत मान खुपसून स्फुंदत बसली होती.

" काय झालं बेटा शेवंती ?– इथं कां बसलीस ? "

मी तिच्या अंगावर वात्सल्यानें हात फिरविलेला पाहतांच ती अधिकच स्फुंदूं लागली. तिच्या त्या हुंदक्यांतून जे कांहीं अर्धवट शब्द ऐकावयास मिळाले त्यावरून मला एवढेंच कळून चुकलें कीं शेवंतीला माझ्या त्या विद्यार्थ्यानें भ्रष्ट केलें होतें. माझी गैरहजिरी, दोनप्रहरचा एकांतवास व गांवापासून घर फार दूर याचा फायदा घेऊन त्यानें शेवंतीवर अत्याचार केला होता. त्या संकटानें मी हतबुद्धच झालों. दुसऱ्या दिवसापासून तो विद्यार्थी कांहीं शाळेंत आला नाहींच. नाहींतर त्याच्याशींच शेवंतीचें लग्न करून द्यावें व ह्या संकटांतून मोकळें व्हावें असा मी विचार केला होता. आपलेच दांत आणि आपलेच ओंठ ! चव्हाट्यावर गोष्ट आणावी तर आपल्याच मुलीची अब्रू आपण उघड केल्यासारखं होणार ! हळुहळू गांवांत तोंड दाखविण्याची मला लाज वाटूं लागली. शेवंतीला कांहीं दिवस गेले होते ! नानू–नानू ! ! ह्याच्या पुढली हकिकत आपल्याच तोंडानें मी कशी उघड करून सांगूं ? "

एवढा वृद्ध गृहस्थ परंतु शोकावेगानें रडूं लागला.

" नानू, हें काळं तोंड घेऊन आम्हीं गेल्या वर्षी ह्या चाळींत रहायला आलों. म्हटलं इथं आपणाला कुणी ओळखणार नाहीं पण—दैव कुठें स्वस्थ !

कुणी तरी ह्या गोष्टीची वाच्यता केली असणार म्हणूनच आम्हांला ही जागा सोडून जाण्याबद्दल नोटीस आली आहे नानू ! ”

त्यांच्या डोळ्यांतील अश्रूंनीं माझें अंतःकरण भिजलं एवढं खरं.

“ मी कसली मदत करूं, केशवकाका ?--सांगा. ”

“ कसली ?—माझ्या शेवंतीला पुनीत कर, नानू ! गेल्या सबंध वर्षांत मी कित्येकांचे पाय धरले आहेत, एकाही माणसाला माझा द्रव आला नाहीं, कुणी नुसती सहानुभूती दाखविली, कुणी दुसरा वर पाहून देतों असें आश्वासन दिलें, कुणी घरच्या मंडळीची नापसंती दर्शविली, कित्येक कार्यकर्त्यांनाही मी विनंति केली, आर्जव केलें पण कोणीही मला त्या संकटांतून विन्मुक्त करूं शकलें नाहीं—नानू एक प्रश्न विचारूं कां तुला ? शेवंतीच्या पतितत्वाचें मी समर्थन नाहीं करीत पण सर्वच पुरुष विवाहापूर्वी पवित्र असतात काय रे ? पतित पुरुषांचीं लग्नें केव्हां होतच नाहींत ?-बोल नानू घेतोस शेवंतीला पावन करून ?—तुझ्याकडे हा शेवटला शब्द मी टाकला आहे !”

नुकतंच दोन तासापूर्वी मी मोठें रसभरीत भाषण केलं होतं-परंतु केशवकाकांचा तो रोखठोक प्रश्न ऐकून मी थक्क झालों ! एकदमच मला उत्तर देतां येईना. शेवंतीची ती नाजूक व मनमोहक मूर्ति माझ्या अंतःचक्षूंपुढें उभी राहिली. आजपर्यंत माझ्या एकाकी रसहीन जीवितांत सुख निर्माण करण्याकरितां ह्या दोघां जीवांची कोण धडपड चाले, याचें चित्र ठळकपणें माझ्यापुढें उभें राहिलें. मी केलं लग्न शेवंतीशीं तर माझ्या आड येणारं कोणी नव्हतें—शेवटीं मनाचा निश्चय केला—

“ केशवकाका-करतों मी शेवंतीचा स्वीकार मग तर झालं ? ”

माझ्या ‘ होय ’ या एकाच शब्दानें केशवकाकांच्या त्या जीर्ण देहांत सुद्धां नवचैतन्य खेळूं लागलें, जगाची उलथापालथ करण्याचं सामर्थ्य कधीं कधीं अशा लहानशा शब्दांत असतं !

* * *

पांच वर्षें लोटलीं होतीं आमचें लग्न होऊन. शेवंतीच्या प्रेमळ सहवासांत हा एरवीं दीर्घ वाटणारा काळ कसा निघून गेला याचं भानहि राहिलं नाहीं मला. वैवाहिक जीवनाचीं पहिलीं कांहीं वर्षें अतिशय मादक असतात. मात्र दोन

प्रेमी जीवांच्या प्रेमाचा तिसरा भागीदार उत्पन्न झाला म्हणजे हा मादकपणा थोडा विरायला लागतो व संसाराच्या खऱ्या खऱ्या तापत्रयानें होरपळायला सुरवात होते. व अनेक कारणांनीं संसाराचें रम्यत्व कुठल्या कुठें नाहींसें होतें. आमच्याहि बाबतींत अशीच स्थिति झाली, मनासारखा जोडीदार संसाराच्या प्रवासांतच मिळाला कीं, जीवितयात्रा सुखकर व सुकरहि होते अशी मनाची आपली एक भावना बनलेली असते, परंतु ह्या भावनेंतील व्यर्थत्व हळूंहळू पटायला लागतें काळाच्या ओघाबरोबरच !—व होतों त्या स्थितीपेक्षां या स्थितींत कांहींच अधिक सुख नाहीं असें वाटूं लागतें. एकंदरींत कोणतीहि अवस्था समाधानकारक नसतेच म्हणायची ! मी अविवाहित होतों त्यावेळीं त्या आश्रमांतील लहान सहान दुःखें सहन करतांना पाहून केशवकाका हळहळत-पण विवाहितांनाहि वेगळ्या प्रकारचीं दुःखें असतात याची त्यांनीं मला जाणीव करून दिली नाहीं. आतां केशवकाका हयात नाहींत—नाहींतर त्यांना ह्या प्रश्नाचें उत्तर मी विचारिलें असतें.

माझ्या लग्नानंतर दोन वर्षेंच अतिशय सुखाचीं गेलीं. शेवंतीसारखी पत्नी मिळाल्यानें मी स्वतःला खरोखरीच अत्यंत भाग्यवान् समजतों. परंतु काय असेल तें असो अत्यंत सुखाच्या क्षणांतसुद्धां ती वाटेल त्यावेळीं खिन्न दिसायची. आठ आठ दिवस ती माझ्याशीं मोकळेपणानें बोलतहि नसे, ह्या तिच्या वर्तणूकीचा मला कांहींच बोध होईना. कदाचित् पूर्वस्मृति तिला खिन्न करीत असावी असें मला वाटे. पण कांहीं दिवसांनीं तिच्या दुःखाचें बायकी कारण मला कळून चुकलें. एका रविवारीं मी शेवंतीला म्हटलें.

“ शेवंती येतेस कां अंधेरीला ? ”

“ कुणाकडे ? ”

“ वसंताकडे !-आज कित्येक दिवस त्यांनीं आमंत्रण देऊन ठेवलें आहे आपल्याला—जाऊं या आज ! येणार ? ”

“ हं चलायचं ! ”

शेवंती मोठ्या उत्सुकतेनें यावयास तयार झाली.

आम्हीं अंधेरीला पोंचलों त्यावेळीं संध्याकाळ झाली होती. वसंत आपल्या घरापुढील लहानशा बागेंतच खुर्च्या टाकून बसला होता. तें दृश्य कुणाही

संसारी मनुष्याला रमणीयच भासलें असतें. " धन्यस्तदंतरजसा मलिनी भवन्ति " ह्यांतील रमणीयत्व पुत्रवंतालाच पटेल. एका खुर्चीवर वसंत होता. जवळच त्याची पत्नी लीला लेकरीचा पायमोजा विणीत बसली होती. वसंताचा मोठा मुलगा बापाच्या पाठीवर चढून उभा होता. सर्वांत लहान मुलगी आईच्या पायाशीं आपल्या बाहुल्यांचा चिमुकला संसार मांडून बसली. हें सुखमय संसाराचें गोड स्वरूप आम्हीं दुरूनच सडकेवरून पाहिलें. मी शेवंतीला डिवचलें. " शेवंती, जरा समोर तर पहा हें वसंताचें गृहसौख्य ! " दुसऱ्याच क्षणीं पश्चात्ताप झाला. कारण शेवंतीकडे मी पाहिलें तों अश्रूंचे सर तिच्या नेत्रांतून टपाटप खालीं पडत होते.

त्या अश्रूमालिकेनें मला आपल्या भाषेंत शेवंतीचें दुःख निवेदन केलें.

मला अद्याप पिता होण्याचें सद्भाग्य लाभलें नव्हतें, परंतु त्याची उणीव माझ्यापेक्षां शेवंतीलाच सहस्रपटीनें दुःखी करीत होती.

× × × ×

— आणखी असंच एकदां एका शनिवारीं मी नेहमीं पेक्षां जरा लवकर घरीं आलों. तों घरांत चिमण्यांच्या चिवचिवाटासारखा हास्यमिश्रित आवाज माझ्या कानीं आला. बाजूच्या दरवाज्यानें मी घरांत प्रवेश केला. दिवाणखान्यांत बराच स्त्रीसमूह असावा असा मी आवाजावरून तर्क केला परंतु तो कितपत खरा होता ईश्वर जाणे—कारण दोन बायकांचा समूह वीस बायकांचा आवाज काढूं शकतो-शेवंतीच्या मैत्रिणी असाव्यात त्या ! त्यांच्या रंगाचा भंग होऊं नये म्हणून मी माझ्या खोलींत जाऊन वाचीत पडलों.

परंतु वाचन कसलें ?-त्यांच्या संवादांतील अक्षर नि अक्षर माझ्या कानीं पडत होतें.

" बाकी देशसेवा तारेचीच अधिक ठरते हं ! "

" आणि शेवंतीनं तर अद्याप देशसेवेला सुरवातहि केली नाहीं-! "

" तें कसं बाई ? " दुसरा एक आवाज मला ऐकूं आला.

" हात्तेच्या बावळटच आहेस माले, तारेनं या पांच वर्षांत देशासाठीं चार पुत्र निर्माण केले हें काय थोडं देशकार्य झालं ? "

" अं–असं होय ? "

" नाहीं तर शेवंती––आज पांच वर्षांत कांहींच प्रगती नाहीं. "

" अग सुरवातच नाहीं तर प्रगति कुठून ?—पण बाई मातृपदाची सनद घे हो एकदां नाहींतर—! "

" नाहींतर काय ग ? " शेवंतीनें फणकाऱ्यानें विचारल्याचा मला भास झाला.

" नाहींतर—निपुत्रिकेला हिंदु समाजांत काय स्थान असतं माहित आहे का ? "

" हो हो सर्व माहित आहे मला; पुरे झाला चहाटळपणा ? "

शेवंतीचेच शब्द होते ते !

" हो—बाई, तूं आतां लग्न झालीस म्हणून पोक्त ठरलीस !—मुलं झालीं नाहींत म्हणून, नाहींतर आतां तारेसारखी चार मुलांची आई शोभली असतीस ! "

बरं—पुरे ग विमल !—शेवंतीला नाहीं आवडत हा विनोद—ती आतां पूर्वीच्या मोकळ्या मनाची शेवंती नाहीं राहिली. जाऊं दे.—आपण दुसऱ्याच गोष्टी काढूं. "

" विषयाला कलाटणी देण्यासाठीं शेवंतीनें विचारलें, " काय ग सिन्धु जोशीचं लग्न झालं काय ग ? "

" लग्न ? "

" कां ?—त्यांत एवढं आश्चर्य वाटण्याजोगं काय आहे ? "

तिच्याबद्दल तुला कांहींच माहिती नाहींशीं दिसते, शेवंती !—अग तिच्या हातून कुमारिकेला अयोग्य असं वर्तन झालं आहे म्हणतात. तेव्हां तिच्याशीं कोण हरीचा लाल लग्न करायला तयार होईल ? "

" आणि तिचं पाप म्हणे तिकडे अनाथाश्रमांत वाढत आहे ! " त्यांतील एक मुलगी म्हणाली. संवादानें माझे कान अधिकच तीक्ष्ण झाले.

" श–श—! पुरे हा घाणेरडा विषय ! " असें म्हणून शेवंती झटकन् स्वयंपाक घरांत गेली फराळाच्या तयारीसाठीं.

स्मृतीचीं गाडलेलीं भूतंहि कधीं कधीं असें भेडसावितात म्हणायचं ?

\+ + + +

त्या रात्रीं मला उपाशी पोटींच राहावें लागलें.

मी फिरून घरीं आलों तों स्वयंपाक घरांत शुकशुकाट ! अंधारांतच शेवंती पलंगावर उशींत डोकें खुपसून पडली होती.

मी दिव्याचें बटन दाबलें.

तिनें चटकन् भींतिकडे तोंड फिरविलें.

"नको दिवा लावूं—माझं डोकं दुखतं आहे." डोळे मिटूनच ती म्हणाली.

" थोडा मेंथाळ चोळूं ? "

" कांहीं नको ! "

" अंगबिंग तापलंय कां ? " असं म्हणून मी तिच्या कपाळावर हात ठेवला तो सबंध तोंड, व उशीहि भिजलेली मला आढळून आली.

" शेवंती रडतेस ? "

तिनें एक जोराचा हुंदका दिला.

तिचें मस्तक माझ्या मांडीवर घेत मी म्हटलें.

" शेवंती काय झालं बरं असं रडायला ? "

" कांहीं नाहीं ! "

" छे, कांहीं नाहीं कसं ? असं उगाच कोणी रडतं ? " उत्तर नाहीं. बराच वेळ ती मुक रोदन करीत होती. मीहि तिला मनसोक्त रडून दिली.

" आज मला बरं नाहीं गडे,–खाणावळींतून डबा आणायचा आजपासून "

" कां ?—आज मला भूक नाहीं–पण उद्यां तुला बरं वाटेल ! "

" माझ्या हातचं अन्न खाऊं नये गडे आपण ! "

" कां ? "

" मी निपुत्रिका आहे. "

" आणि आज हें काय भलतंच डोक्यांत घेऊन बसली आहेस ?—तुझ्या-प्रमाणं मी सुद्धां नाहीं कां निपुत्रिक ? "

" पण आपण पुरुष आहां !–आप्तांची, मैत्रीणींची, समाजाची मर्मच्छेदी कुत्सित टीका स्त्रियांनाच सहन करावी लागते !—नाहीं–माझ्यानं नाहीं हें सर्व सहन होत ! "

" सारं जग म्हणू दे तसं—आपण —मी त्या मताचा आहे कां ? "

“ नाहीं. ”

“ मग तुझ्या मनाला ही गोष्ट एवढी कां जाचावी ? नि अद्याप तुझं वय गेलं आहे कां ? ”

“ कुणास ठाऊक ?—कदाचित् तशा माणसांना शासन म्हणून देव त्यांना कायदेशीर मुलांचं सुख लाभूं देत नसेल ! ”

“ तशा माणसांना ?—कशा शेवंती ? ”

ती एकदम चमकली.

“ मी—मी—काय म्हणालें—सांगा मी काय म्हटलं ? छे, मी शुद्धीवर नव्हतें—आपण मनावर घेऊं नये. ” पुन्हां ती ओक्साबोक्सी रडूं लागली. मला तिचें दुःख पाहवेना. तिच्या त्या तुटक शब्दांनीं माझी पूर्वस्मृति जागृत झाली. पांच वर्षांपूर्वीचा तो प्रसंग. मी व्याख्यान देऊन आल्यावर घडलेला तो प्रसंग केशवकाकांचें व शेवंतीचें पूर्वचरित्र ह्या सर्वांची मला एकदम आठवण झाली. पण तिच्या पूर्वचरित्राची मला पूर्ण माहिती आहे हें शेवंतीला मी अगर केशवकाकांनीं केव्हांच कळूं दिलें नव्हतें. शेवंतीला आलेल्या प्रसंगाची हकीकत मला माहित होती—परंतु तिनें ज्या मुलाला जन्म दिला त्याची व्यवस्था कशी कोठें केली हें मला माहित नव्हतें. त्या एकदोन क्षणांत अनेक विचार माझ्या मनांत येऊन गेले. किती विचित्र परमेश्वराची करणी ! ज्यावेळीं मातृत्वाची देणगी तिरस्कृत मानली जाते त्यावेळीं ती हटकून देण्यांत व ज्यावेळीं तिच्या प्रीत्यर्थ शेवंतीसारख्या जीवांची तडफड चाललेली असते, त्यावेळीं ती नाकारण्यांत निसर्ग आपली निष्ठुर लहर प्रगट करून मानवाची असहाय्य स्थिती पाहून विकट हास्य करीत असते !

* * * *

सकाळची वेळ.

कोर्टांत जाण्याची माझी कोण गर्दी ! पायांत पायमोजे चढवीत मी बसलों होतों, जवळच शेवंती माझ्या टोपीवर ब्रश फिरवीत उभी होती. एवढ्यांत दोन तरुण मुली दारांशीं उभ्या राहिल्या. शेवंती पुढें झाली. त्यांनीं पिवळ्या रंगाची एक छापील पत्रिका शेवंतीच्या हातीं दिली, ती तिनें मजकडे दिली. पंढरपूरच्या अनाथाश्रमाच्या मदतीकरितां त्या स्वयंसेविका होऊन फिरत होत्या.

त्याच संस्थेचा आजपर्यंतचा त्रोटक इतिहास दिला होता. अधिक वेळ न घेतां मी पांच रुपयांची नोट शेवंतीच्या पुढें केली व त्यांना देण्यास सांगितलें.

त्या निघून जातांच शेवंतीनें मला विचारलें.

" कोण त्या ? "

" मी त्या मुलींना ओळखीत नाहीं-परंतु पंढरपुरला अनाथबालकाश्रम म्हणून एक संस्था आहे ? "

" हुं—"

" कसली आहे संस्था माहीत आहे ? "

" नाहीं—कसली बाई ? "

तिचें तें बेछुट खोटें उत्तर ऐकून तिची कींव करावी किंवा तिच्यावर रागवावें हें मला कळेना.

" त्या संस्थेचं असं आहे. स्वतःच्या अगर दुसऱ्याच्या अपराधानें ज्या स्त्रियांचें पाऊल वाकडें पडतें, व लोकांचा जाच टाळण्यासाठीं ज्या, बालहत्तेचं पापहि माथीं घ्यायला तयार असतात, अशांना बालहत्तेच्या पापापासून निवृत्त करून, तीं मुलें ह्या संस्थेंत संभाळलीं जातात "

शेवंतीनें मनाची चलबिचल न दाखवितां शांत चित्तानें सर्व ऐकून घेतलें. शून्य दृष्टीनें ती कुठेंतरी खिडकी बाहेर पहात होती.

" तूं पाहिली आहेस ती संस्था ? "

मी खडा टाकून पाहिला.

" हो ! " तिनें चटकन् उत्तर दिलें.

" म्हणजे ?—तूं ती संस्था पाहिली आहेस—पण ती कसली आहे याची तुला माहिती नाहीं-हें कसं ? " मी आश्चर्यचकित होऊन विचारलें.

ती फारच चपापली.

" काय ?—काय प्रश्न विचारला आपण ?—मी ती संस्था पाहिली कां ? छे ! मुळींच नाहीं. किती मूर्ख मी ! कांहीं तरीच उत्तर दिलं आपल्याला !—अगदीं खरं नाहीं तें ! !—नाहीं ना समजणार खरं ? सांगा गडे ! "

अगदीं केविलवाण्या मुद्रेनें माझ्याकडे पहात तिनें माझ्या गळ्याभोंवती आपल्या हाताचा विळखा घातला.

" सांगा गडे ! नाहीं ना खरं मानणार !—आणि मी ती नाहींहि पाहिली. "

" नाहीं खरं मानणार ! तूं ती संस्था पाहिलीस हें सर्व खोटें ! "

अशी मी तिची समजूत केली.

—आणि इतके दिवस मला जें उत्तर पाहिजे होतें तें अकस्मात् मिळालें.

* * * *

नाताळची सुट्टी होती. मी कामाच्या निमित्तानें पंढरपूरला गेलों. येतांना अनाथ बालकाश्रम पाहून येण्याचा निश्चय केला. एका सकाळीं आश्रम पहाण्यासाठीं निघालों. माझ्या मित्राकडून मला कळलें होतें कीं कोणी मुलें वाढविण्याची इच्छा दर्शविली कीं त्यांना तीं मिळतात. मी ज्या वेळीं आश्रमाच्या आवारांत शिरलों त्यावेळीं तिकडची निष्पाप लहान प्रजा सूर्यकिरणाचें स्नान घेत होती. त्यांतील एका सहा वर्षांच्या मुलाकडे पाहून तर मी चकित झालों. साऱ्या आयुष्यांत दोन व्यक्तींत इतकें साम्य मी पाहिलें नसेल ! तो मुलगा शेवंतीचीच लहान प्रतिमा होती. मी ऑफिसांत शिरलों. मॅनेजरना माझ्या भेटीचा उद्देश सांगितला; आम्हीं दोघेहि बाहेर आलों. तीं मुलें अद्याप तिथेंच खेळत होतीं.

" हा ! " असं म्हणून त्या गोंडस मुलाला मी उचलून धरलें.

" अरे वा ! अगदीं ठरवून आल्यासारखेच दिसतां ! " मॅनेजर विनोदानें म्हणाले.

" हं—' अंतरकोऽपि हेतु ' म्हणतात तें यालाच ! " प्रथम दर्शनींच ज्याला घेऊंसें वाटलें तीच आपली आवड समजावी नाहीं ? जुने पांच सहा वर्षांचे रिपोर्ट कुतुहलानें चाळले तों शेवंतीची नोंद त्यांत आढळली व त्याच्यापुढें त्या बालकाचा फोटो होता. माझी खात्री झाली. सर्व सवदा मी पटविला.

* * * *

मी घरीं आलों त्या वेळीं शेवंती स्वयंपाक घरांत स्वयंपाकाच्या गडबडींत होती. आज मी येणार हें तिला माहित होतें. दिवाणखान्यांत खुर्चीवर सूर्यकांताला—त्या मुलाला मी बसविलें.

" शेवंती, शेवंती, आज एक पाहुणा आहे बरं का जेवायला अधिक ! " स्वयंपाक घरांत प्रवेश करीत मी म्हटलं.

" कोण आलंय ? "

" येऊन तर पहा-तुझ्या ओळखीचा आहेसा ! "

शेवंती लुगडें झटकित व पदर सावरीतच दिवाणखान्यांत आली " इश्श ! हें कोण बाई ?—कुणाचा हो हा ?—फार गोड आहे ! " त्याला जवळ घेत शेवंती म्हणाली.

" शेवंती तुझा !--नि आतां माझाहि ! "

समोरच असलेल्या कपाटाच्या भव्य आरशांत तिला आपलेंच प्रतिबिंब त्याच्या रूपानें दृष्टीस पडलें.

" सांगा गडे-मला नाहीं हा घोंटाळा उलगडत ! "

" शेवंती, तुला मुलगा हवा आहे ना ? निपुत्रिका म्हणवून घ्यायला नको ना ? "

" मग-असा भाडोत्री माल आणून का पुत्रवती म्हणून मिरवायचं ? "

" कोण म्हणतो भाडोत्री ?--शेवंती हा तुझाच आहे !--सहा वर्षांपूर्वीच्या तूं विलासपूराहून पंढपूरापर्यंत केलेल्या प्रवासाची आठवण कर. "

शेवंती मटकन् खालीं बसली. खुर्चीच्या गादींत तिनें आपलें तोंड लपविलें. " अरे देवा, तुम्हांला सारं माहित आहे तें ? " हुंदके देत देत ती म्हणाली.

" हो--शेवंती मला सारं केशवकाकांनीं सांगितलं होतें. "

" आणि तें कळूनहि आपलें माझ्यावर निस्सीम प्रेम होतं-आहे. आणि किती थोर अंतःकरण आपलं ! "

* * * *

आकाश निवळलं !

त्या रात्रीं आम्हीं श्रियाळ राजाप्रमाणें सपुत्र भोजन केलं.



# अलीकडचा फोटो !

## अविवाहित व जगाची दृष्टि

अविवाहिताकडे जग नेहमीं साशंक दृष्टीनें पहात असतें. अविवाहित व्यक्तीच्या आचार विचाराचं पावित्र्य समाजाला विश्वसनीय वाटत नाहीं, व पटतहि नाहीं. वास्तविक पाहतां शेंकडा नव्वद विवाहांतील व्यक्ती संसारतापानें त्रस्त होत असूनही अविवाहितांचें सुख त्यांना पाहवत नाहीं. आपल्या कळपांत इतरांना ओढून आणायला हे लोक कसे अगदीं टपलेले असतात असा माझा स्वतःचा अनुभव आहे; तरी पण सर्वसाधारण मानवी स्वभावाचें पृथःकरण केलें तर प्रत्येक व्यक्तीला विवाह हें एक गोड बंधन वाटावें यांत नवल नाहीं. अविवाहित राहण्याची प्रवृत्ति झाली तरी तिला कांहीं कारणें असणारच ! शेंकडा नव्याण्णव अविवाहित लोकांना तशा स्थितींत आपलें आयुष्य काढायला कांहीं तरी तशींच कारणें असतात. तीं शोधून काढण्याचा जर कुणी प्रयत्न केला तर अविवाहित व्यक्तीबद्दल समाजाला सहानुभूतीच वाटेल. माझी स्थितिही वरीलप्रमाणेंच होती, मीही एक जगाचा घटक होतों. मलाहि मानवी मन होतें, भावना होत्या, आकांक्षा होत्या, लग्न करून सुखाचा संसार करावा असें मलाहि वाटे, परंतु मी एक नांवाजलेला लेखक नि कवि असल्यामुळें, अनेकदां कादंबऱ्यांत रेखाटलेलें संसाराचें गोड काल्पनिक चित्र व्यावहारिक जगांत मला अनुभवायला सांपडेल कीं नाहीं याबद्दल मला शंका वाटे. लग्न करावयाचें व कसाबसा गृहस्थधर्म पाळण्यासाठीं कसल्याही पोरीसोरीबरोबर संसार करावयाला मी कबूल नव्हतों. खेरीज माझ्या ह्या आवडीविरुद्ध, इच्छेविरुद्ध मला सक्तीनें विवाहबंधनांत पाडावयास लावणारी अशी एकादी कौटुंबिक शक्ति, आईच्या अगर इतर कोणत्याही नात्याच्या रुपानें नव्हती. त्यामुळें माझ्या इच्छेनुरुप, आवडीप्रमाणें माझ्या आचारविचारांशीं समचित्त होईल अशी स्त्री मिळाल्याखेरीज लग्नाच्या भानगडींत मुळींच पडावयाचें नाहीं असा माझा निश्चय होता. अशा परिस्थितींत–एकलकोंड्या जीवनांत–कादंबरी लेखन हाच माझा नित्याचा

व्यवसाय बनला. संपादक वर्ग, इतर लेखक व वाचक हेंच माझं कुटुंब मी समजूं लागलों. प्रतिभासंपन्न लेखकांचे ग्रंथ हीच माझी संपत्ति बनली. माझ्या ह्या व्यवसायांत मी स्वतःला इतकें समरस करून घेतलें कीं, माझ्या ह्या सुखाचा हेवा कुणीही केला असता.

* * *

## ज्ञानसुधेचा नवा अंक

आणि असाच एक दिवस उगवला कीं मला विवाह करून घ्यावासा वाटला. "ज्ञानसुधा" मासिकाचा नवीन वर्षाचा अंक नुकताच माझ्या हातीं आला होता. त्या अंकांत माझी एक लघुकथा प्रसिद्ध झाली होती. ह्या अंकाचें वैशिष्टय म्हणजे प्रत्येक लेखाबरोबर त्या त्या लेखकांचे फोटोही प्रसिद्ध करण्यांत आले होते. माझ्याकडेहि संपादक महाशयांचें 'अगदीं अलिकडचा आपला फोटो' पाठवावा अशा विनंतीचें पत्र आलें. निव्वळ लेखनावरच उदरपोषण करणाऱ्या फटिंग माणसाला केवळ प्रसिद्धीकरतां म्हणा अगर शोकाखातर म्हणा वारंवार वर्षावर्षाच्या क्रमानें फोटो काढविणें मनांत असतें तरी शक्य झालं नसतं. तसं पाहिलं असतां माझ्याकडे जुन्यापैकीं कांहीं फोटो होते; साधारण सोळा सतरा वर्षांचा असतांना, आईवडिलांबरोबर काढलेला एक ग्रुप फोटो मात्र मजजवळ नाहीं म्हणावयास होता. परंतु फोटोच्या प्रसिद्धीवरून माझ्या सध्यांच्या स्वरूपाची कुणाला ओळख पटली असती कीं नाहीं याची शंकाच वाटते; कारण गोपद्माएवढी वीरगुंठी ठेवायचे दिवस आतां राहिले नाहींत. कानांत मोठ्या मुलांनीं बाळ्या घालण्याचेहि दिवस आतां सरले. तेव्हां अशा फोटोच्या प्रकाशनापासून आपलं हसं करून न घेतां फोटो पाठवितां येत नाहीं म्हणून एक दिलगिरीचें पत्र संपादकमहाशयांना पाठवून दिलें. नाहीं तरी मी कुठें एखादा स्त्रियांची भूमिका घेणारा सुंदर नट होतों कीं संपादकांना माझ्या फोटोची तहान लागावी! "ज्ञानसुधे" चा अंक पाहून मी खूषच झालों. नाना तऱ्हेचीं प्रवास वर्णनें, प्रसिद्ध लेखकांच्या लघुकथा, काव्यें, सिनेमांतील प्रसिद्ध ताऱ्यांचे निरनिराळ्या तऱ्हेचे, वेगवेगळ्या शीर्षकाखालीं दिलेले फोटो वगैरे सचित्र लेखनांनीं विखुरलेला तो अंक; नुसतीं चित्रें पाहूनच एखाद्याची तास अर्धातास चांगलीच करमणूक होईल असा तो अंक होता. त्यांतील एका फोटोनें मात्र मला वेडें केलें. संपादकांच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे तो फोटो कु. प्रतिभादेवी पारखी

यांचा ' **अगदीं अलीकडचा फोटो** ' होता. प्रतिभेचे लेख मला अत्यंत आवडत. महाराष्ट्रांत ती एक नांवाजलेली लेखिका होती खरं सांगायचं म्हणजे तिच्यावर मी मूकप्रेम करीत होतों. कोणत्याहि कुमारिकेवर कोणत्याहि तरुणानें मूकप्रेम करायला हरकत नसावी अशी माझी प्रामाणिक समजूत होती. प्रतिभेची व माझी विचारसरणी अगदीं तंतोतंत जुळत होती. तिच्या विचारसरणीवर, तिच्या लिहिण्याच्या गोड पद्धतीवरच मी पुरा मोहून गेलों होतों. आज प्रथमच तिचा फोटो प्रसिद्ध झाला होता. फोटोंतील तो गोंडस चेहरा पाहून आपली सहचारिणी व्हावयास साऱ्या जगांत हीच स्त्री लायक आहे अशी खात्री पटली, व ' मज विरहित वराशीं तीस योजूनि पाहे। तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे ? ' असंच मला राहून राहून वाटूं लागलं. पण एखाद्या कुमारिकेवर प्रेम करणं वेगळं व तिला लग्नाबद्दल प्रश्न टाकणं वेगळं—आणि आपल्या समाजांत तर तें अगदींच अक्षम्य अतएव अशक्य ! आम्हीं हिंदी लोक कितीहि शिकलों, पाश्चात्यांच्या सामाजिक चाली रीतीबद्दल कितीही गुणानुवाद गायिले, व त्या अनुकरण करण्याची कितीहि ऐट दाखविली, तरी एखाद्या कुमारिकेला सरळ प्रपोज करण्याची कांहीं आमच्यांत ताकद नाहीं ! माझ्या कादंबऱ्यांतून मी अनेकदां प्रणयाराधनेचे प्रसंग वर्णन केले होते, परंतु स्वत: माझ्यावर पाळी येतांच ' भारती जडा मुधीही मंदधी बने ' अशीच माझी स्थिति झाली ! माझ्या मित्राला, भास्कराला मी विश्वासांत घ्यायचं ठरविलं.

* * * *

## हँगिंग गार्डनवरील लता वाटिकेंत

" अगदीं शेवटच्या घटकेपर्यंत कुणाला सांगायचं नाहीं बरं, भास्कर !"

" पण काय तें, तर कळूं देशील !—मघापासून मी पाहतों आहे, आडवाटेनें तूं कांहींतरी—बोलावयाचा प्रयत्न करतो आहेस दिवाकर !"

हँगिंग गार्डनवरील लतावेष्टित अशा एका वाटिकेंत आम्हीं दोघेच बोलत बसलों होतों. मीच त्याला आज ह्या एकांत बाजूला मुद्दामच घेऊन आलों; परंतु एखाद्या नवयौवनारूढ तरुणीप्रमाणें मी लज्जेनें चूर झालों. विषयाला सुरवात कशी करावी याचा मला विचार पडला. शेवटीं भास्करानेंच बोलायला सुरवात केली.

" कायरे, दिवाकर ज्ञानसुधेचा अंक पाहिलास ?

" हो पाहिला,—फारच सुंदर निघाला आहे नाहीं ? बाकी इंग्लिश न् अमेरिकन् मासिकांची सर कांहीं आपल्या इकडल्या मासिकांना कधीं यायची नाहीं. "

" कां ? "

" कां म्हणजे ?—त्यांच्या इतकीं विपुल चित्रें, फोटो वगैरे साधनें आपल्याकडे फार कमी. निव्वळ चित्रें काढूनच वाचकांची करमणूक होते त्या मासिकांनीं ! "

आणि ज्ञानसुधेचा अंकही त्याच तोडीचा काढण्याचा प्रयत्न केला आहे संपादकांनीं; बाकी निव्वळ नटनटींचीं चित्रें देऊन अंक भरून काढण्यापेक्षां ह्या अंकांत लेखकांची चित्ररूपानें जी माहिती दिली आहे ती खरोखरच उपयुक्त आहे यांत संशय नाहीं. त्या प्रतिभादेवी पारखीचा फोटो आजच पहिल्यानं प्रकाशित झालेला पाहतों आहे मी. फारच सुंदर पोज नि फिगर आहे तिचा नाहीं ? "

माझ्याच इच्छित विषयाकडे वादविवादाचें तारूं झुकतांना पाहून माझ्या हृदयसागराला आनंदाची भरती आली.

" होय, फारच सुंदर दिसतें आहे ती—भास्कर,—नाहीं ? प्रथम मी तिच्या नांवावरच खूष झालों होतों, आतां तर तिची भ्रभृंगाकृति पाहून मी अगदीं मोहून गेलों आहें भास्कर !—हंसू नकोस, ! ! अन् तिच्या मोहकपणापेक्षां तिच्या सुंदर विचारांची छाप माझ्या अंतःकरणावर पडली आहे !—अशी एखादी माझ्याच विचारांची सहधर्मचारणी जर मला मिळाली तर—भास्कर !—"

" तर, तर तूं लग्न करायला तयार आहेस ?–बोल दिवाकर, "

" हो आहें "

" ओहो ऽ ऽ ऽ' करून भास्कर मिस्किलपणें मनसोक्त हंसू लागला. त्याच्या हंशानें माझ्या कष्टी अंतःकरणालाही आनंद वाटूं लागला " पण तें शक्य आहे भास्कर ? नाहींतर ह्या अलीकडच्या पोरी ? आपण जावं सिरियसली प्रपोज करायला नि ह्या मूर्खांतच काढावयाच्या आपल्याला एखादवेळीं ! मग भीक नको पण कुत्रा आवर अशी स्थिति व्हायची ! "

" अरे वीरा ? ह्या असल्या पोरींच्या वल्गनेला घाबरतोस—होय ?— लग्न होईपर्यंत कोणत्याही कुमारिकेला असल्या प्रसंगांना तोंड दिलेंच पाहिजे; आणि प्रतिभेसारखी उदार मतवादी स्त्री आपल्या मनांत अशा प्रसंगाबद्दल मुळींच विपरीत ग्रह होऊं देणार नाहीं समजा नाहींच तिला तुझं प्रपोझल पसंत पडलं; तरी त्यांत विशेषसं तुझं कोठें बिघडलं आहे ?—"

हे निराशेचे उद्गार भास्कराच्या तोंडून ऐकूनच माझ्या अंतःकरणाचा कोणी लचका काढीत आहे असें मला वाटलें.

" नको भास्कर असं म्हणूं नकोस. माझं खरोखरीच तिच्यावर प्रेम आहे अशी माझी खात्री आहे. तिची प्राप्ति मला झाली नाहीं तर भास्कर, मी आजन्म अविवाहित राहीन. तिच्या संमतीनें माझ्या मनोरथांना पालवीच फुटेल. भास्कर, प्रेमाचा ओलावा नसल्यामुळें माझं जीवन किती शुष्क बनलं आहे. याची तुला कल्पना नाहीं ! बाह्यतः मी अत्यंत सुखी असल्याचें जरी दाखविलें तरी अंतरीचा ठाव कुणाला लागणार आहे कां ? माझ्या लेखनाची खरीखुरी प्रतिभा, तिच्या सानिध्यांतच स्फुरेल अशी माझी खात्री आहे. "

" हें पहा दिवाकर, प्रथम अगदीं सरळ गोष्ट म्हणजे तूं तिला एक पत्र लिहून आपला हेतु कळीव मग पाहूं त्यापुढें काय करितां येईल तें. "

त्याच रात्रीं मध्यरात्रीपर्यंत जागून एक कसें बसें पत्र प्रतिभादेवीच्या पत्त्यावर रवाना केलें.

* * * *

## ' तिच्या ' पत्राची मार्गप्रतिक्षा !

जीव हुरहुरूं लागला. आज बरोबर आठ दिवस झाले पत्राचें उत्तर नाहीं. टपालवाल्याच्या येण्याकडे इतक्या उत्सुकतेनें डोळे लावून मी साऱ्या हयातींत केव्हांच बसलों नव्हतों ! एक डांक चुकली कीं इतर सर्व कामेंधामें सोडून दुसऱ्या डांकेकडे डोळे लावून बसायचें, माझी खोली आमच्या चाळीच्या चवथ्या मजल्यावर होती. पोस्टाचा शिपाई दुरून येतांना पाहून त्याला वर यावयाचे श्रम पडूं नये म्हणून मीच तीन जिने उतरून खालीं जावयाचा तों टपालवाला दोन घरें पुढं गेलेला दिसे. जिन्याजवळच चाळीचा सार्वजनिक नळ

असल्यामुळें मला त्याच बाजूनें दोनतीनदां घिरट्या घालतांना पाहून, नळावर जमलेल्या स्त्रीसमुदायाच्या कपाळास आठ्या पडल्याचा मला भास झाला ? परंतु मी माझ्याच विवंचनेंत दंग. ! बाहेरच्या जगांत काय चाललें आहे याची मी परवाहि केली नाहीं. एकंदरींत मनाच्या खऱ्याखुऱ्या विवंचना व कादंबरींत कल्पिलेल्या काल्पनिक प्रसंगांतील यातना यांत महदंतर असतें. अशी माझी पुरेपुर खात्री झाली.

" दुःखाअंतीं सुख, छायेआड प्रकाश हें तत्त्व कसें असत्य ठरेल ? सकाळपासून मन अत्यंत अस्वस्थ झाल्यामुळें व वरखालीं जाण्यायेण्यांत शरीरही थकल्यामुळें पोटांत थोडेसें अन्न जातांच मला गाढ झोप लागली. एवढ्यांत दाराच्या खडबडीनें मी दचकून जागा झालों " दिवाकर ढवळे " कोणीं तरी पुकारित होता. मी उठून दरवाजा उघडण्याच्या पूर्वींच खिडकींतून एक पत्र भिरकलें गेलें. निळ्या रंगाचें पाकीट होतें तें ! व त्यावर—अहाहा ! मोत्यांच्या पंक्तीनाही लाजवील अशी माझी नांवनिशी दर्शविणारी अक्षरमाला होती ! आपल्या मालकिणीचें गोड स्वरूप दाखविणारें तें हस्ताक्षर पाहून मी तर पुरा वेडा बनलों. स्त्रीचें हस्ताक्षर पाहून तें प्रतिभादेवीकडीलच असेल अशी माझी खात्री झाली. आंतला मजकूर वाचायला माझा जीव हपापला; वाचनाला एकांत पाहिजे, चित्त स्वस्थ हवें. आज शनिवार असल्यामुळें प्रत्येक क्षणीं माझ्या एकांताचा भंग होईल कीं काय अशी मला भीति वाटत होती. कारण मी फटिंग असल्यामुळें शनिवार रविवारीं माझ्या खोलीला सार्वजनिक सभागृहाचें स्वरूप येत असे. आजसुद्धां सभासद येण्यापूर्वींच सावधान चित्तानें पत्र वाचावयाला मिळावें अशी माझी इच्छा ! कोणीं मध्येंच येऊन माझें स्वास्थ्य बिघडवील अशी मला प्रतिक्षणीं भीति वाटत होती. धडधडणाऱ्या अंतःकरणानें पत्र बाहेर काढलें. वाचावयाला मात्र माझी छाती होईना. माझ्या आयुष्याच्या सुखदुःखाचें उत्तर त्यावर अवलंबून होतें. परिक्षेच्या निकालाची तार वाचायला जितकी उत्सुकता वाटते तितकीच ती फोडून वाचायला दृष्टि कचरत असते. भवितव्य जाणण्याची तीव्र जिज्ञासा असूनहि वेडेवांकडें विधान ऐकावयास मन तयार नसतें. माझीही तीच स्थिति झाली. इतका वेळ पत्रासाठीं धडपडत होतों. आतां पत्र हातीं

असतांही तें चटकन् फोडून वाचण्यास मी कचरूं लागलों. शेवटीं धाडस करून वाचायला सुरवात केली.

"प्रिय दिवाकर—"

दार खडाडलें! डोंगरच कोसळल्याचा आवाज होतो कीं काय अशी मला भ्रांति पडली! दरवाजा न उघडण्याचा निश्चय आज मी केला; परंतु गडबडीनें दार लावतांना बाजूची खिडकी तशीच सताड उघडी! वर मान करतांच, माझे चार उपग्रह खिडकींतून मान वांकवून माझ्याकडे पहात होते-मिस्कीलपणें हंसल्यासारखेंहि वाटलें! मी घरांत नाहीं असें सांगावयाची आतां सोयच नव्हती. भुकेल्या माणसानें तोंडाकडे नेलेला घांस कुणीतरी निर्दयतेनें काढून घ्यावा अशी माझी स्थिति झाली. दार उघडावेंच लागलें मला!

साऱ्या दिवसाच्या—विशेषतः शनिवारच्या वेगवेगळ्या कार्यक्रमानंतर शेवटीं रात्रीं अकराच्या सुमारास माझें ग्रहण सुटलें. आतां माझं शांतिसौख्य कोणी हिरावून घेऊं नये म्हणून दोन प्रहरीं केलेली चूक सुधारून दरवाजा व खिडकी घट्ट लावून घेतली. दिवसभर हृदयाशीं बाळगलेलें पत्र बाहेर काढलें. किती गोड होतें तें पत्र!

**शान्तिकुञ्ज**
सान्ताक्रुझ
११-१-३०.

प्रिय दिवाकर,

आपलें पत्र आठ दिवसापूर्वी हातीं आलें. पत्र वाचून त्यामधील मजकुराचा विषय ध्यानीं येतांच आपल्या धाष्टर्याबद्दल मला स्वाभिमान कौतुकच वाटलें, कारण विवाहासारख्या बाबतींत आपली विशेष ओळख. कदाचित् लेखन रुपानें एकमेकांची ओळख असणें संभवनीय आहे,—परंतु तितका परिचय नसून आपण प्रामाणिकपणानें ठरेल, असें मला वाटतें. तरुण मुलींच्या मागें लागून प्रेमाच्या लांब लांब बाता ठोकून शेवटीं त्यांना फशी पाडून दुसऱ्याच मुलीला आपल्या पत्नीपदावर आरूढ करावयाच्या उद्योगापेक्षां आपल्या प्रामाणिक मनोधैर्याची किंमत माझ्यामतें अधिकच आहे. आपल्याला पत्राचें उत्तर वेळींच पाठवितां आलें नाहीं. परंतु मधील विषयाचें महत्त्व पाहतां विचार करण्यासाठीं, आठवड्याचा कालावधि म्हणजे अपुराच आहे असें माझ्याप्रमाणें

आपल्यालाही वाटेल; — आपलें पत्र येईपर्यंत विवाहाची कल्पनाच माझ्या मनांत नव्हती. आपल्याला प्रत्यक्ष पाहण्याचा सुयोग जरी आजपर्यंत आला नाहीं, तरी पण आपल्या लेखनांतून मला आपलें वारंवार दर्शन घडे. आपल्या पत्रावरून विवाह न करण्याच्या बाबतींत माझ्याच सारखें आपलें मत आहेसें दिसतें. विवाह जर सुखाकरतां करावयाचा तर आपल्याला आवडेल, आपल्या विचाराशीं ज्यांचें ऐक्य होईल अशाच अनुरूप मनुष्याशींच विवाह करावा अशी माझी पूर्वीपासूनची इच्छा. ह्या जगांत मी एकटीच असल्यामुळें माझ्या विवाहाचा प्रश्न यापूर्वीच मी सोडवावयास पाहिजे होता. परंतु प्रचलित हिंदु समाजास्थितींत स्वतंत्र वरपरीक्षण करणें किती अवघड आहे हें आपण आपल्या कादंबऱ्यांतून पुष्कळ वेळां दाखविलें. त्यांची आपल्याला पूर्ण जाणीव असेलच. स्त्री-पुरुषांत अधिक संघटन होण्यास मिश्रसमाजांची सद्यःस्थितींत किती आवश्यकता आहे? परंतु जोंपर्यंत आपल्याकडे ही चाल प्रचलित होणार नाहीं तोंपर्यंत कित्येक स्वतंत्र विचारांच्या स्त्री-पुरुषांची कुचंबणा होणार आहे. म्हणूनच आतांपर्यंत या प्रश्नावर विचार करून देण्याचें मी सोडूनच दिलें होतें. परंतु खरोखरच स्त्री कितीही शिकली, तिला नांवलौकिक, संपत्ति कितीही मिळाली, तरी आयुष्यांत असा एक काळ येतो कीं जेव्हां एकलकोंडें जीवन प्रेमाच्या ओलाव्यावांचून रुक्ष वाटूं लागतें. माझ्या सारख्या लहानपणापासून पोरक्या राहिलेल्या स्त्रीचें आतांपर्यंतचें जीवन किती कष्टदायक असेल याची आपणाला कल्पना येईलच; कारण आपणही माझ्याचप्रमाणें अनाथ स्थितींत आयुष्य कंठींत आहां असें आपल्या पत्रांत आपण लिहिलें आहे. 'समानशीले व्यसनेषु सख्यम्' ह्या न्यायानें आपल्याला जरा माझ्या मैत्रीपासून आयुष्यांत फायदा होणार असेल, आपण म्हटल्याप्रमाणें माझ्यामुळें आपल्या स्फूर्तीची ज्योत सतत पेटत राहणार असेल, तर मला तरी एकाकी राहून निष्प्रेम आयुष्य लोटण्यापेक्षां आपल्या संगतींत आपल्या उत्साहानें माझेंहि आयुष्य उत्साहित करून घेण्याची संधि मी दवडूं इच्छित नाहीं. महाराष्ट्रांतील लेखक वर्गांत आपला दर्जा श्रेष्ठ आहे. मलाही सुदैवानें लेखनांचा थोडा बहुत नाद आहे, म्हणूनच आपल्या दैवाची भागिदार होतांना मी आपल्या स्वतःला भाग्यवान समजेन. ह्या बाबतींत विशेष पत्रव्यवहार न करितां आपण जर समक्ष मला वरील

पत्त्यावर माझ्या घरीं येत्या शनिवारीं दुपारीं भेटाल तर प्रत्यक्षच अधिक गोष्टींचा विचार करणें योग्य नाहीं कां?

आपल्या सुखदुःखांत समाविष्ट होऊं इच्छिणारी,
प्रतिभा.

हें पत्र वाचून मला ज्या आनंदाचा अनुभव आला, त्याची कल्पना ज्यांनीं पहिल्या पत्राच्या प्राप्तीचा आनंद मनमुराद लुटला आहे अशानींच करावी!

*　　*　　*　　*

## दर्शनोत्कंठा

तो शनिवार उजाडला! आज माझी कोण धांदल! सकाळपासूनच दोन प्रहरीं जाण्याच्या तयारीस लागलों. आजच्या प्रसंगाला साजेसा पोषाक करावा असें मनांत आलें, पण द्ररिद्राणाम् मनोरथाः! त्यांना किंमत किती असावी? जवळ ठेवणुकीचा एखादा पोषाक असावा याची आवश्यकता मला आज प्रथमतः वाटूं लागली. कवि आणि लेखाला गबाळ म्हणण्याची प्रवृत्ति दिसून येते याचें कारण ते नेहमीं स्वतःविषयीं उदासीन असतात म्हणे! मला भास्करची आठवण पडली. बी. ए. ची डिग्री घेण्यासाठीं त्यानें एक नवीनच सूट शिवून घेतला होता. तो मागून आणला नि एखाद्या आय्. सी. एसला शोभेल अशाच झोकांत जायचें ठरविलें! कारण उघडच आहे, आतां मन्वंतर नवें झालें आहे. कांहीं काल असा होता कीं मुलींनी नटून थटून—उसने दाग-दागिने अंगावर ठेवून विवाहेच्छु प्रत्येक मुलापुढें आपलें प्रदर्शन मांडावयाचें; परंतु आतां मुलीच आपले वर शोधायला सिद्ध झाल्यावर मुलानांहि उसनवारी करून कां होईना पण आपला साजशृंगार साजरा करावयाची आवश्यकता वाटणारच! माझे विचार, माझे लेख लघुकथा प्रतिभेला आवडणं वेगळं!! अलिकडच्या फॅशनच्या युगांत वावरणाऱ्या मुली ह्या!—फटकन् नाक उडवून चालू लागायच्या!—आणि म्हणूनच मी पूर्वींच सर्व बाजूंनीं बंदोबस्त केला. पुष्कळदां मनांत आलं नवीन ओळख आहे, भेटीचा पहिलाच प्रसंग आहे. भास्करला बरोबर घेऊन जावं सोबत म्हणून; परंतु माझ्या या सूचनेवर भास्कर जीव काढून हंसू लागला. "प्रथम भेटीच्या वेळीं असं कुणी कुणाला बरोबर

नेत असतं ? महाराज एकूण आपलं लेखन म्हणजे संवेदना शून्य तर !— आहेस बुवा तल्लख नशीबाचा ! वुइश् यू फॉरच्यून दिवाकर ! ! ” असं म्हणून त्यानें माझीच उलट संभावना केली.

मला त्याचें म्हणणें पटलें. तीनचा ठोका पडला घड्याळांत, अन् माझ्याही हृदयांत ठोके पडायला सुरवात झाली ! शनिवार असल्यामुळें नेहमींचे उपग्रह माझ्या सुखाला ग्रहण लावायला येतात कीं काय याची सारखी भीति वाटत होती. परंतु कर्मधर्मसंयोगानें कुणीही आलें नाहीं, व कुणाच्या येण्यापूर्वीच मी घराबाहेर पडलों, तोंच शेजारच्या खोलींतले गंपूकाका, “ बाहेर चाललास का दिवाकर ? तुझ्याचकडे येत होतों, म्हटलं एखादं वर्तमानपत्र मिळेल वाचायला ! ” विड्यानें लाल झालेली बत्तिशी दाखवीत म्हणाले ! गंपूकाकांना मध्येंच उपस्थित झालेलें पाहून माझी तळपायाची आग मस्तकाला पोहोंचली. त्याचा प्राण घ्यावा कीं काय असें मला वाटलें ! गंपूकाका विधुर होते. विधवा स्त्रियांचा अपशकून लोकांना होतो ह्या आमच्या सामाजिक दुष्ट रूढीविरुद्ध बंड करण्याकरितां मी नेहमीं विधुर पुरुषाचें दर्शन अपशकुनी मानीत असें. आणि गंपूकाका हे विधुर आहेत हें मला पूर्णपणें माहीत होतें. माझें हें वैशिष्ट्य माझ्या परिचयाच्या सर्व माणसांना माहीत होतें; व म्हणूनच विवाहाला अगर वाङ्निश्चयाला निघालेल्या वराला गंपूकाकांचा प्रथमच अपशकून व्हावा याचा मला अत्यंत विषाद वाटला. पण चाळीच्या बाजारांत अशा निषेधित व्यक्तींची समोरासमोर गांठ पडायचीच; अशी मी माझ्या मनाची समजूत केली !

* * * *

## मनोरथांचे धिंडवडे !

लहानशीच, आटोपशीर परंतु सुंदर बाग होती ती ! व त्यांत एक लहानसेंच घर शांतिकुंज हें नांव धारण करून उभें होतें. दुसऱ्या मजल्यावर कु. प्रतिभादेवी पारखी अशी पाटी वाचून मी विद्युत् घंटा दाबली.

दार उघडलें गेलें, व एका मोलकरणीनें मला आंत बसायास सांगून वेत्रासन पुढें केलें. घरांतील एकंदर टापटीप पाहून माझें हृदय आनंदानें उचंबळूं लागलें. कांहीं दिवसांनीं आपल्या विस्कळीत झालेल्या संसारालाही असेंच व्यवस्थित स्वरूप येईल, घराचा प्रत्येक कोंपरान् कोपरा सुंदरतेची ग्वाही देईल,

व आनंदाचें साम्राज्य इथून तिथून पसरेल ह्या विचारांनीं मला थोडीशी धन्यता वाटली. इतक्या नीटस सुंदर जागेची मालकीण—अधिष्ठात्री देवता किती सुंदर हाही विचार माझ्या मनांत आल्याखेरीज राहिला नाहीं. माझ्या भाग्याचा मीच हेवा करू लागलों, इतक्यांत—

"—आपल्याला बराच वेळ बसावं लागलं ?" हे उद्गार काढणारी स्त्री वयानें चांगली पन्नाशीच्या जवळ आलेली असावी. वृद्धत्वाचीं चिन्हें जरी तिच्या मुखावर स्पष्ट दिसत होतीं तरी ती तारुण्यांत चांगलीच सुस्वरूप असावी असें वाटत होतें. आपलें तारुण्य एवढ्या वयांत सुद्धां चांगलेंच जमविलेलें दिसत होतें. पोषाखाच्या बाबतींत एखाद्या तरूणीलाही तिनें मागें टाकलें असतें. इतकी तिची टापटीप व नीटनेटकेपणा होता. प्रतिभेच्या व तिच्यामध्यें बरेंच साम्य असावेसें मला वाटलें; प्रथम तर ती प्रतिभेची आईच असावी असें मला वाटलें, परंतु पत्रांत आपण पोरके असल्याचें तिनें लिहिल्याचें स्मरण मला झालें. मावशी असेल तिची कदाचित अशीही मला शंका आली, आतां कांहीं तरी उत्तर दिलेंच पाहिजे म्हणून मी म्हटलें,

" छे आतांच आलों मी,–शिवाय मला आतां कुठें जाण्याची घाई नाहीं ! आपण प्रतिभाबाईच्या कोण ? "

ती बाई अतिशय कावरी बावरी झाल्याचें मला स्पष्ट दिसलें. बसलेल्या खुर्चीवरून किंचित् पुढें सरकून ती म्हणाली,

" मी ?–मी कोणी नाहीं !–मीच प्रतिभा ! ! "

माझ्या डोळ्यापुढें त्या भर उजेडांत काजवे चमकूं लागले ! माझ्यावर माझ्या दृष्टीवर, माझा विश्वास बसेना. माझी आई आज जिवंत असती तर एवढ्याच वयाची असती !–ती प्रतिभा की सुधारणा ? माझी विचारशक्ति मला सोडून जातेशी वाटली, मस्तक सुन्न झालें !

" आपण दिवाकर ढवळे कां ? तिनेंही अस्वस्थ होऊन मला प्रश्न विचारला. साऱ्या आयुष्यांत माझं नांव सांगायला मी एवढा कचरलों नव्हतों, माझ्या एकाच शब्दावर आतां माझ्या भावी आयुष्याचें सुख अवलंबून होतें. खरं नांव सांगून जन्माचेंच दुःख यातना पत्करूं कीं आपद्धर्म समजून खोटें बोलून पुढलें भावण जीवन टाळूं ! एक–एकच क्षणभर ह्या द्वंद्वाची माझ्या मनांत झटपट सुरूं झाली. शेवटीं निश्चय केला.

"नाहीं—मी दिवाकर नाहीं !—पण त्यांनींच मला आपल्याकडे पाठविलें आहे."

" ते कां आले नाहींत आज ? त्यांनीं अपॉईन्टमेन्ट दिली होती मला ! "

" होय, परंतु आज एका महत्त्वाच्या कामाकरितां त्यांना मुंबई सोडून बाहेरगांवीं जावें लागलें, व पत्रांनीं आपल्याला कळविण्याइतकीही सवड त्यांना झाली नाहीं. "

" ते केव्हां परत येणार आहेत ? "

" मला वाटत नाहीं ते लवकर येतीलसे. बरं येतों. "

कवीला, लेखकाला कोणी कल्पनेंत भरारी मारणारें म्हणा; परंतु माझ्या कल्पनांचा मला व्यवहारांत जो उपयोग आयत्यावेळीं झाला त्याचें महत्त्व मी आजन्म विसरणार नाहीं. स्त्रियांना लग्नानंतर तरी नांव बदलण्याचा प्रसंग येतो, पण माझ्या बाबतींत विश्वकर्म्यानें सर्वच अघटित घडविल्यासारखें दिसतें. मला माझ्या नांवाचा त्याग करून नवें नांव धारण करूनच माझ्या प्राणप्रिय अशा लेखन व्यवसायांत शिरावें लागलें. ज्ञानसुधेचा अंक तर मी डोळ्यासमोर धरीत नाहीं. त्या मासिकाचे संपादकाला पाहिल्यावर—प्रतिभेचा वीस वर्षांपूर्वीचा फोटो अलिकडला म्हणून प्रसिद्ध करणाऱ्या त्या संपादकाला पाहिल्यावर संताप होतो ह्या जातीचा !

आतां विवाहाबद्दल म्हणाल, तर इतके धिंडवडे झाल्यानंतरहि एखादा माणूस विवाहाची इच्छा करील, अशी आशाच नको !

इतिशम्



# फेरीवाला



" मग आमच्यासारख्यांनीं काय करावं असं—आपल्याला वाटतं ? "

" रडत बसावं नोकरीच्या नांवानं ! "

" एवढाच सल्ला घेण्याकरितां कांहीं मी आलों नाहीं आपल्याकडे ! "

" तुमच्या परिस्थितींतल्या तरुणाला असला तोंडाळपणा योग्य नाहीं ! " थोडेसे वरमून रावसाहेब म्हणाले.

" बरोबरच आहे ! आमच्यासारख्या निकृष्ट परिस्थितीखालीं विझालेला-विस्तव कुणीही तुडवावा रावसाहेब !

" हें पहा, तुमचं हें तत्त्वज्ञान ऐकवून दाखवायला कां तुम्ही इथं आला आहांत ? जरा नम्रपणानं घ्यावं ! अहो, नोकरी म्हणजे काय समजतां-नोकरी म्हणजे वेळ पडल्यास जोडेहि खावे लागतात वरिष्ठांचे ! आम्हीं कांहीं सरकारी नोकरींत उगाचचं इतकं वय घालवलं नाहीं ! साहेबानं तोंडावर शिवीगाळ केली तर ती परत करण्याचें आमच्या मनांतसुद्धां येत नसे ! अहो मी तर त्यावेळीं-"

" पण मला कुणाच्या हाताखालीं नोकर राहायचं नाहीं रावसाहेब ! "

" मग एकदम तुम्हाला वरिष्ठाची जागा कोण देणार बुवा ? "

" मला जागा नकोच आहे मुळीं ! मी आपल्याकडे नोकरी मागायला आलों आहे अशी तर आपली समजूत झाली नाहीं ना ? "

" अलबत् !-मी ॲन् एम्प्लॉयमेंट ब्यूरोचा मॅनेजर आहे-माझ्याकडून नोकरीखेरीज आपण काय मिळण्याची अपेक्षा करतां ? "

" Advice ! मला आपली धंद्याच्या बाबतींत नुसती सल्ला हवी आहे. धंदेशिक्षण घेतलेला मी एक कॉमर्स ग्रॅज्युएट आहे, मी काय करावं असं आपल्याला वाटतं ? "

" दुकान घाला. "

" नवशिक्या माणसानं एकदम दुकान घालण्याचं धाडस करावं ? शिवाय दुकान थाटण्यापुरतं भांडवलहि मजपाशीं नाहीं. "

" बरं ! आज कोणत्याहि धंद्यांत किती भांडवल घालण्याची तुमची तयारी आहे ? "

" पांचशें रुपये "

" बस्स ! एवढेच ? "

" होय. माझे स्वतःचे असे एवढेच. माझ्या वडीलांवर शिक्षणाबरोबर धंद्याचाहि बोजा घालावयास मला नको आहे. "

" मग थोडासा माल आणून फेरीवाला बना. "

" फेरीवाला ? "

" होय फेरीवाला ! दचकलांत कां ? त्यांत एवढं आश्चर्य करण्याजोगं काय आहे ? तुम्ही गुजराथी नि मारवाडी व्यापारी क्रोडोपती झालेले पाहिले आहेत—ऐकले आहेत ? आजचे पेढीवाले एकेकाळीं दारोदार पैशापैशाचा माल विकणारे फेरीवाले होते. "

" कबूल आहे-पण ! "

" हं-हा पणच आमच्या दक्षिणी लोकांच्या उन्नतीच्या आड येतो आहे. अहो, प्रामाणिकपणें कोणताही धंदा करण्यांत कमीपणा कां वाटावा ? "

" धंदा करण्यांत कमीपणा नाहीं, परंतु त्या धंद्यानें सामाजिक दर्जांत फरक तर पडणार नाहीं ? "

" तो कसा बुवा ? " आपल्या तोंडांतला लठ्ठ चिरूट दांतांखालीं दाबीत रावसाहेबांनीं विचारलें.

" आपल्या घरीं येणाऱ्या वकील, डॉक्टराला व फेरीवाल्याला आपण सारख्याच योग्यतेचे समजाल ? "

तरुणाच्या ह्या अचानक प्रश्नानें रावसाहेब जरा ओशाळले.

" अलबत्—कां नाहीं समजणार ? आतां तुमच्यासारखे सुशिक्षित तरुण ह्या धंद्यांत पडले तर मी म्हणतों ह्या धंद्यांला एक प्रकारचा मान, महत्त्व येणार आहे; शिवाय कोणत्याही नवीन सुधारणा करतांना अगर समाजाचें मतपरिवर्तन करतांना जे त्या सुधारणेंत पुढाकार घेतील त्यांना समाजाचा रोष, जाच थोडासा

सहन केलाच पाहिजे. ज्यांना सद्यःपरिस्थितीचा चांगलाच बोध झाला आहे अशा समंजस व सुशिक्षित लोकांची सहानुभूति तुमच्यासारख्या तडफदार तरुणाकडे केव्हांहि असणार ! ”

“ आनंद वाटतो आपल्या मताबद्दल रावसाहेब ! आपल्यासारख्या सात आठ माणसांची जरी पूर्ण सहानुभूति मला मिळेल तर माझ्याबरोबर सारा तरुण वर्ग मोठ्या धडाडीनें ह्या धंद्यांत शिरेल; पण एकाच गोष्टीची मला वारंवार शंका येते. ”

“ कोणती ? ”

“ शंका जरा नाजूक स्वरूपाची आहे, पण तेवढीच महत्त्वाची ! आतां असें पहा, रावसाहेब, आपल्या मुलीसाठीं वराची योग्य निवड करतांना ज्याप्रमाणें बॅरिस्टर, डॉक्टर, व वकीलाकडे वधुपित्यांची चटकन् नजर जाईल, तशी ती आमच्यासारख्या फेरीवाल्याच्या जातींत प्रवेश करूं इच्छिणाऱ्या तरुणां-कडे जाईल ? ”

“ हो ! कां जाऊं नये ? शिकलेला, व्यापारांत यशस्वी ठरलेला मुलगा केवळ फेरीवाला आहे म्हणून त्याला नाकारणें हा शुद्ध वेडेपणा आहे. अशी संकुचित दृष्टि जर ठेवली तर महाराष्ट्रीयांची आर्थिक उन्नति केव्हांच व्हावयाची नाहीं. ”

यानंतर दोघेही बराच वेळ गप्प होते.

“ झालं आपलं काम ? ” खुर्चीवरून उठून रावसाहेबांनीं विचारिलें.

“ होय ! ” म्हणून वसंतहि जावयास उठला. उत्साहाची, नवचैतन्याची तेजस्वी प्रभा त्याच्या गौरमुखावर पसरली होती.

“ येतों बरं रावसाहेब ! आज माझ्या मृत जीवनांत उत्साहाचें, स्फूर्तीचें अमृत ओतलं आहे तुम्हीं !--आपल्याबद्दलची कृतज्ञता मी केव्हांही विसरणार नाहीं. ”

“ मात्र एका वर्षानें आपल्या धंद्याची प्रगति सांगायला जरूर या बरं ! ” रावसाहेब वसंताला दरवाजापर्यंत पोहोंचवित म्हणाले.

   

“ नलिनी, अद्याप कसा नाहीं ग तुझा तो फेरीवाला आला ? ”

" येईल ग ! अद्याप वेळ झाली नाहीं यायची ! दहा बारा मिनिटं अवकाश आहे अद्याप ! "

" म्हणजे त्याच्या येण्याजाण्याच्या वेळा अगदीं पक्क्या लक्षांत ठेवल्या आहेस म्हणायच्या ! बाकी खरंच तुझी ती रेशमी साडी बाजारांत कांहीं नाहीं तरी तीस पस्तीस रुपयांखालीं मिळायची नाहीं ! चांगला दहा बारा रुपयांचा फरक पडतोय ! हें मला जरा चमत्कारिकच वाटतं ! तुझा तो फेरीवाला नवशिक्या दिसतो बाई ! अशानें बारा वाजतील व्यापाराचे ! "

" तर ! आपला तोटा करून कां कोणी व्यापार करीत असतो ? अग साधतो एकेकाला व्यापार झालं ! मला तर फार पसंत आहे फेरीवाला तो ! कधीं त्याच्याशीं घासघीस करावी लागत नाहीं किंमतीसाठीं. मालाच्या किंमतीच्या चिठ्या कशा अगदीं व्यवस्थित लावलेल्या ! कोणाशीं अधिक बडबडत नको बसायला नि कांहीं नको ! शिवाय कितीग Decent !"

" हें कांहीं तरीच नलिनी ! जगांत कांहीं आजपर्यंत फेरीवाले झाले नाहींत ? तो तुला स्वस्त देतो कारण त्याला तें परवडतं असं तूंच म्हणालीस ! बरं मग त्यांत तो कांहीं उपकार करीत नाहीं तुझ्यावर ! आणि तूं तरी कशी ग नेभळट ? त्यानं म्हटलेली किंमत द्यावयास तयार झालीस ? हे व्यापारी किनई फार लबाड असतात ! पहा, आतां तूंच घेतलेली साडी मी दहा रुपयांना घेऊन दाखविते कीं नाहीं तें ! "

" नको ग असं करूं मनु ! गयावया करीत नलिनी म्हणाली, पण तिच्या अंत:करणाला पिरगटून हा कळवळा निघालेला पहातांच मनोरमा विस्मितच झाली. ती विचारांत पडली. एका एत्किंचित फेरीवाल्याबद्दल खानदानी घराण्यांतील नलिनीसारख्या आपल्या मैत्रिणीला इतका जिव्हाळा वाटावा याचें तिला नवल वाटलें. कारण नलिनीनें दाखविलेला कळवळा नुसता सहानुभूति-दर्शक नसून त्यांत प्रेमभावनेची किंचित् छटा मनोरमेला दिसून आली. नलिनीला विकसित करावयास निशापति चंद्रच समर्थ असतो; तें काम ताऱ्याच्यानें व्हावयाचें नाहीं ! एखाद्या हलक्या माणसाचं आकर्षण नलिनीला होणें शक्य आहे काय ? या विचारपरंपरेनें ती अधिकच विचारांत पडली. तिला आणखी थोडी चांचणी करावयाची होती.

" हें ग काय नलिनी, मला जर तुझ्यापेक्षां कमी किंमतींत ती साडी मिळवितां आली तर मी तसा प्रयत्न कां करूं नये ? "

" पण तसं करतांना एखाद्याचं अगदींच कांहीं नुकसान करूं नये. ? "

" नुकसान करून घ्यायचं कीं नाहीं हें त्याचं तोच पाहून घेईल. नलिनी तूं कशाला एवढा कैवार घेतेस ? "

पण इतक्यांत घड्याळांत तीनाचे ठोके पडलेले पाहून नलिनी अस्वस्थ झाली. फेरीवाल्याची वेळ होऊन गेली होती, परंतु आशा अमर असते. नलिनीनें त्याला पाहण्यासाठीं खिडकीबाहेर आपलें अर्धे अंग काढलें. एका क्षणांत तिची चर्या उमलत्या फुलाप्रमाणें दिसूं लागली.

" मनु ! मनु ! ! चल खालीं, तिथं पहा फाटकांत कोण शिरतंय तें ! " तिची कोण गडबड उडाली !

मनोरमा येण्याची वाट न पहातांच ती धाडधाड जिना उतरून खालीं पोहोंचली सुद्धां !

तिनें झटकन् जाऊन एक सतरंजी आणली व बाहेरच्या व्हरांड्यावर हांतरली इतक्यांत मनोरमाहि खालीं आली होती.

" या ! केव्हांची आपली वाट पहात आहों आम्ही ! " नलिनी त्याला आदरार्थी हांक मारते आहे हें पाहून तर मनोरमेला अधिक आश्चर्य वाटलें. तिनें क्षणभर नलिनीकडे पाहिलें. नलिनी क्षणभर गोंधळली, पण तिनें आपला शब्द मागें घेतला नाहीं.

" या, वर बसा सतरंजीवर ! "

फेरीवाला वहिवाटीप्रमाणें जमीनीवर अदबीनें बसतांना पाहून नलिनी म्हणाली.

" नाहीं, इथंच बरा आहे. "

पण त्याचें तें शुभ्र धोतर वाईट होईल या कल्पनेनें नलिनीचें हृदय तिळतिळ तुटलें. ह्या गडबडींत नेहमीं येणारा बांगडीवाला दाराशीं केव्हां आला तें नलिनीला कळलेंही नाहीं. आपल्या सारखाच आपला एक समव्यवसायी तिथें बसलेला पाहून त्यानेंही आपलें आसन त्याच्या शेजारींच ठोकलें. तेव्हां कोठें त्याचें अस्तित्व नलिनीच्या लक्षांत आलें.

" चल् ऊठ ! इथं कुठें रे खेटून बसलास ?—आणि तुला कोणी बोलावलं ? "

" फेरीवाल्यांना कुणी बोलावतं कां बाईसाहेब ? आमचा धंदाच तो दारोदार हिंडायचा ? आणि ह्या कापडवाल्याला तुम्ही बोलवायला गेला होता कां ? " बांगडीवाला जरा उद्धटच होता.—पण एवढे शब्द पुटपुटत तो गेला.

मनोरमेला नलिनीच्या स्वभावाचें, तिच्या ह्या वेगवेगळया वागणूकींतलि गूढ चटकन् उकलेना.

" ए ! ती परवां ह्या बाईना दिली तसली रेशमी साडी काढ पाहूं ! "

" मनु ! " डोळ्याच्या भुंवया वर चढवीत नलिनी म्हणाली.

" काय ? "

परंतु नलिनी उघडपणें त्या फेरीवाल्याबद्दल काय बोलणार ? मनोरमेनें फेरीवाल्याला एकेरी नांवानें हांक मारलेली तिला मुळींच पसंत पडली नाहीं. फेरीवाला झाला म्हणून काय झालें ? त्याला कांहीं मान, दर्जा असतोच कीं नाहीं. नेहमींच्या सरावाप्रमाणें मनोरमा बोलून गेली. तिला काय माहीत कीं कांहीं विवक्षित फेरीवाल्यांनाच तेवढं बहुमानार्थी हांक मारायची ! त्यामुळें नलिनीच्या वेगवेगळाल्या भ्रूभंगाचा अर्थ भोळया मनोरमेला कांहींच कळला नाहीं.

" कुठें आहे रे ती साडी !–काढ ना ? " तिनें पुन्हां म्हटलें.

" पहा बाईसाहेब " आपल्या गठ्यांतून एक झुळझुळीत रेशमाची पिस्ताशीं रंगाची साडी फेरीवाल्यानें बाहेर काढली.

" असली Quality बाजारांत कुठेंहि मिळायची नाहीं–खुद्द बेंगलोरहून मागवितों मी ह्या ! "

" पुरे झालं हें तुझं साडी पुराण ! आपल्याच मालाची किती स्तुति करायचो ही ? "

" बाईसाहेब, व्यवहारांत आत्मस्तुति करणें कदाचित् मूर्खपणाचें ठरत असेल, परंतु व्यापारी जगाचा तो एक आत्मा आहे. "

" बरं ! आतां पुरे ही बडबड ! ह्या साडीची नक्की किंमत काय घेणार तें सांगा पाहूं. ! "

" अधिक घेणार नाहीं आपल्यापासून, बाईसाहेब, ह्या बाईना विचारा जी किंमत दिली तेवढीच मी आपल्यापासून घेईन. " नलिनीकडे बोट दाखवित तो म्हणाला.

" दहा रुपयाला ही साडी त्यांनीं घेतली असं त्या म्हणतात. "

चेष्टेच्या नजरेनें नलिनीकडे पहात मनोरमेनें उत्तर दिलें.

फेरीवाल्यानें एक क्षणभरच विचार केला.

" बरं ! ती घेणाऱ्या बाईच जर सांगत आहेत तिची किंमत दहा रुपये, तर मला आतां माझा शब्द परत घेतां येत नाहीं. बाईसाहेब, कितीहि झीज सोसावी लागली तरी खरा व्यापारी आपला शब्द केव्हांही बदलत नसतो, हीच आम्हां व्यापाऱ्याची नीति असते. " असें म्हणून त्यानें खरोखरीच ती रेशमी साडी मनोरमेच्या पुढें ठेवली.

" झालं ना आपलं समाधान ! "

नलिनीकडे अर्थपूर्ण दृष्टीक्षेप करीत, पण मनोरमेला उद्देशून फेरीवाला म्हणाला.

तो गेल्यावर नलिनीच्या गालावर एक बारीकशी चापट देत मनोरमा म्हणाली.

" नलू, यांत बाई कांहीं तरी पाणी मुरतंय बरं ! "

   

" ऐकलंस कायरे दादा ? बाबांचं पत्र आलं आहे आज दुपारीं ! " आपल्या भावाच्या ताटांत भात वाढीत मनोरमा म्हणाली.

" होय का ? काय म्हणतात ते ? "

" रावसाहेब देसायांनीं म्हणे नलिनीसाठीं त्यांच्या एका मित्राच्या मुलांकरितां विचारलं आहे. ! "

" कोण मित्र हे बुवा काकाचे ? "

" सातारचे विनायकराव मंत्री ! "

" हं ! म्हणजे वशाला नलिनी द्यायचा बेत दिसतो देसायांचा ! "

" होय ! असंच दिसतंय ! नलिनीविषयीं माहिती लिहावयास सांगितलं आहे बाबांनीं मला ! "

" असं ! मग काय लिहिणार आहेस ? आपल्या मैत्रीणीचे गुणानुवाद गाण्याची संधि येतांच बायकांची जीभ फार बोलूं लागते, नाहीं का मनु ? "

" एरवींच्या स्थितींत बायकांच्या बोलघेवडेपणावर ओढलेला हा कोरडा कदाचित् मान्य झाला असता मला दादा !—पण आतां—" एवढेंच बोलून मनोरमा क्षणभर स्तब्ध राहिली.

" कां-गप्प कां राहिलीस ? " शरदनें आश्चर्यानें विचारिलें.

" नलिनीबद्दल त्यांत मलाच विचारावयाचं नव्हतं ! " जवळ जवळ स्वगतच मनोरमेनें वरील वाक्य उच्चारिलें.

" कां ? "

" कदाचित् नलिनीला हें स्थळ पसंत पडायचं नाहीं ? "

" कारण ?—वसंतासारखा मुलगा ती नाकारील असं मला वाटत नाहीं ! "

" पण तिनं आपला नवरा पूर्वीच पसंत करून ठेवला आहे अशी मला सूक्ष्म शंका येते--खात्री नाहीं हं ! "

" कोण बुवा तो ? अलिकडे या मुलींना रुक्मिणी सावित्रीचंच वेड लागल्या-सारखं दिसतंय ! "

" थट्टेचा विषय नाहीं हा दादा ! माझी शंका जर खरी असेल, तर नलिनी एक फार मोठी चूक करून बसली आहे ! "

" कसली बुवा ? "

" फेरीवाल्याच्या प्रेमांत सांपडली आहे नलिनी अशी मला दाट शंका येते दादा ! " अगदीं हलक्या शब्दानं मनोरमेनें ही माहिती आपल्या दादाला करून दिली. जणूं ही अतिशय लाजिरवाणी गोष्ट आजुबाजूच्या वातावरणांतील अणूपरमाणूंना कळूं नये असें तिला वाटलें.

" कोण फेरीवाला मुसलमान कीं हिंदू ? "

गळ्यांत अडकलेला भाताचा घांस पाण्याच्या घोटानें खालीं ढकलीत आश्चर्यानें शरदनें विचारिलें.

" हिंदु फेरीवाला !—ज्याच्याकडून मी ती रेशमी साडी घेतली तो ! "

" मग आपला वसंतच कीं काय ? त्यानें हल्लीं रेशमी कापडाचा व्यापार सुरू केला आहे खरा. पण फेरीवाला होऊन व्यापार करतो कां लेकानं दुकान घातलं आहे मला नक्की माहीत नाहीं. अलिकडे वर्ष दीड वर्षांत त्याची गांठ पडली नाहीं "

" अगबाई ! तो तुझ्याबरोबर अमेरिकेला गेला होता तोच वसंत कायरे ?"

" होय, तोच ! तूं त्याला कधीं पाहिला नाहींस वाटतं ?"

" नाहीं ! नुसतं ऐकलं आहे तुझ्या तोंडून त्याच्या विषयीं. अगबाई, दादा, तूं म्हणतोस त्याप्रमाणें तो फेरीवाला म्हणजे तुझे ते वसंतरावच असतील तर नलिनी खरीच भाग्याची म्हणायची ! "

" पाहूं तर या शोध करून ! "

" दादा, तरी मला वाटलंच प्रथमपासून, कीं नलिनीची दृष्टि एकाद्या हलक्या माणसावर जायची नाहीं ! "

" बरं, मैत्रीणीची इतकी कांहीं शिफारस करायला नको. माझा वसंतहि कांहीं कमी नाहीं—प्रकाश पाडूनच चमचमणारं तें रत्न आहे बरं ! "

❀ ❀ ❀

" अरे वा ! काल आठवण काढल्याबरोबर अगदीं आज हांक मारल्यासारखा हजर अं वसंत ! अरे होतास कुठें लेका इतक्या वर्षांत, ये तर खरा आंत ! " असें म्हणत शरदनें वसंताला आंत खेंचलेंच.

" अरे, वेळ कुठें होतो आतांशा चार मित्रांना भेटायला ? "

" लेका, स्वतंत्र धंदा हवा ना तुला, मग आतां कां रडतोस ? आम्ही आपले 'आज्ञाधारक दास' च बरें कीं नाहीं ? ठराविक वेळ काम करावं नि उरल्या वेळाचे आम्ही आमचे मालक ! शिवाय हक्काच्या सुट्या आहेतच ! "

" हें पहा, ह्या तुझ्या सुट्याबिट्यांनीं मला मोह पडेल असं वाटत नाहीं ! सोन्याची झाली तरी शृंखलाच ती ! "

" बरं बुवा राहिलं—पण तुझ्या ह्या स्वैरसंचारांत तुला कितपत यश येत आहे—आलं आहे तें तर सांगशील ? "

" यश !–आणि तें इतक्या अल्पावधींत ! आपल्या महाराष्ट्रीयांमध्यें हा एक मोठा दोष आहे. आज व्यापाराला सुरवात करायाची नि उद्यां त्यावर लक्षाधिश होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगायची ! व्यापारांत चिकाटी हवी ! नफा-तोट्यास वारंवार तोंड देण्याचें सामर्थ्य पाहिजे. ह्या गुणाच्या अभावीं आम्ही लोक एकदोन वर्षांतच हताश होऊन जातों. "

" तसंच केवळ माझं म्हणणं नाहीं. लक्षांनीं नफा मोजण्याचे आजचे दिवस राहिले नाहींत ! नोकरीप्रमाणें व्यापारांतहि Competition आहेच. चढा-ओढीच्या पायीं आपलं स्वतःच नुकसान करून घ्यायलासुद्धां हे व्यापारी बचे पुढें मागें पाहात नाहींत. "

" हें म्हणणं मला सर्वस्वी मान्य नाहीं. केवळ चढाओढीखातर आपलं कोणी नुकसान करून घेईल असं मला वाटत नाहीं. "

" थांब प्रत्यक्षच पहा आतां ! " असें म्हणून शरदनें जवळच असलेलें आपलें भिलोरी कांचेचें कपाट उघडून मधून एक रेशमी पिसताशी रंगाची साडी काढली.

" ही पाहिलीस ? तूं सुद्धां सील्क डिलरच आहेस; सांग तूं ही केवढ्याला विकशील ? "

साडी पाहतांच वसंताच्या चेहेऱ्यावर आश्चर्याची रेषा उमटली, तरी पण त्यानें निर्विकार होऊन, व ती हातानें उलट सुलट पाहून म्हटलें,—

" ही तीस रुपयाला मी विकीन, आणि याची खरेदीच मुळीं पंचवीसाची आहे ! "

" होय ना ! मग हें पहा माझ्या बोलण्याचं प्रत्यंतर ! ही साडी केवढ्याला घेतली हें माझी बहीणच सांगेल. " असें म्हणून शरदनें आपल्या बहिणीला हांक मारली, " मनोरमा ! मनु ! ! "

" काय दादा ? दरवाजाचा पडदा बाजूला सारीत मनोरमेनें विचारलें; परंतु परवांचा फेरीवाला आपल्या भावाच्या शेजारी पाहतांच ती आश्चर्यानें थिजून जाण्याच्या बेतांत आली.

" मनु ! ही साडी तूं केवढयाला घेतलीस ? "

" दहा रुपायाला ! "

" कुणाकडून ? "

" इश्श ! हें काय विचारतोस दादा ? "

" म्हणजे हाच तुझा फेरीवाला मनु ? " असें म्हणून शरदनें वसंताच्या पाठीवर हात फिरवीत विचारिलें.

" माझा कसला ?–नलिनीचा ! तिच्या शब्दाकरितांच त्यानीं ही साडी दहा रुपायाला दिली. "

" म्हणजे हा काय प्रकार ? ही नलिनी कोण ? "

" विनू आण्णांनीं जिची माहिती विचारली होती ती रावसाहेब देसायांची मुलगी, ' आपल्या भाषणाचा वसंतावर काय परिणाम होतो हें पहाण्यासाठींच तिनें मुद्दाम विनूअण्णाचें नांव घेतलें. आपल्या वडिलांना आपण स्वतः व शरदही विनूअण्णा ह्या नांवानें संबोधितो, मग आपल्याच वडिलांनीं नलिनीविषयीं चौकशी केली आहे कीं काय हें समजून घेण्याकरितां वसंत अधीर झाला.

" कारे बाबानीं चवकशी चालविली आहे नलिनीची ?"

अधीर होऊन वसंतानें शरदला प्रश्न विचारलाच.

" अरे वा ! फार दिवसांची नलिनीची नि तुझी ओळख आहे अशाच तऱ्हेनें अगदीं बालतो आहेस आज ! हें पत्र वाचा म्हणजे कळेल सर्व ! " असें म्हणून शरदनें आपल्या टेबलाच्या खणांतून एक पत्र वसंताच्या हातीं दिलें.

" अरे हें मनुताईचं दिसतयं ! " वरचा पत्ता वाचीत त्यानें म्हटलें.

" पण तुझ्याच संबंधीं आहे. "

पत्र वाचीत असतांना वसंताचें गौरमुख क्रमाक्रमानें लालसर होत असलेलें पाहून शरद आणि मनु मिस्किलपणें हंसत होती.

" कां राजश्री, बापानें पसंत केलेल्या मुलीशीं लग्न करावयाचें नाहीं अशा नवमताचे आपण आहां का ? "

वसंत काय उत्तर देणार ?

  

" नले, मोठी दैववान पोरगी आहेस तूं अं ! "

" कशी बाबा ? लहानपणापासून आईच्या मायेवाचून वाढलें म्हणून ? "

" पण आईची आठवण तरी पडून दिली कां मी तुला ! आणि आतां नवऱ्याकडे गेलीस कीं ह्या ह्मातार्‍या बापालासुद्धां विसरशील ! "

" नाहीं बाबा ! असं होऊं नये म्हणूनच मी आजन्म विवाह करणार नाहीं. "

" वेडी कुठली ! बाबासाठीं कुणी अविवाहित राहतं ? आतां पहा कसा फक्कडसा नवरा मिळाला आहे तुला म्हणूनच मी तुला दैववान् म्हटलं ! "

" पण बाबा मला न आवडणाऱ्या पुरुषाशीं लग्न करण्याचा तुमचा अट्टाहास कां ? "

" म्हणजे ! त्या मंत्र्यांच्या वसंतरावाला तूं ओळखतेस ? "

" कुठला मंत्री ? "

" ते सातारचे कॉंट्रॉक्टर मंत्री त्यांचा मुलगा वसंत ! अमेरिकेहून व्यापारी शिक्षण घेऊन आला आहे दोन वर्षांपूर्वी ! त्याला तूं ओळखतेस ? "

" नाहीं. "

" मग इतकं उत्तम स्थळ हातचं जाऊं द्यावयाचं ? म्हणजे लोक तुला नि मलाहि मूर्खांत काढायचे ! हें पहा त्यांचं आतांच पत्र आलं आहे कीं जावईबुवा तुला पाहायला येणार आहेत एक दोन दिवसांत. बाकी सर्व नक्की झालें आहे. तुला पाहून येण्याचा हट्ट जावईबुवांचा नसून त्यांच्या वडिलांचा आहे. हो, नवीन पद्धतीप्रमाणें मुलानें एकदां तरी मुलीला पाहणें बरें ! नलिनी, बघ ! एवढा पुरुषासारखा पुरुष, त्यांत उच्चशिक्षण घेतलेला पण आपल्या बापावर त्याचा किती विश्वास !—लग्नाच्या बाबतींतसुद्धां ! ह्यालाच मी सुशिक्षित म्हणतों, नलिनी, आम्ही वडील मंडळी तुमचं अनहित करूं असं कां तुला वाटतं ? जा, बाळ नाहीं म्हणूं नकोस. मी त्यांना शब्द देऊन चुकलों आहे. शिवाय जांवईबुवांना पाहिल्यावर तुझीहि खात्री होईल माझी निवड किती उत्तम आहे ! "

इतक्यांत बाहेरून कुणी फेरीवाला आला आहे व तो साहेबांची गांठ घेऊं इच्छितो असें दरवाज्यावरच्या नोकरानें येऊन सांगितलें.

फेरीवाला आज रावसाहेबांच्या फाटकांत शिरत होता, पण दोन वर्षांपूर्वी तो जेव्हां प्रथम ह्या घरांत शिरला त्यावेळची व आतांची परिस्थिति अगदीं भिन्न होती. त्यावेळीं तो बेकार तरुण म्हणून रावसाहेबांच्या मदतीची याचना करावयास आला होता. पण आज तो एक याचक म्हणूनच आला होता, परंतु आजची याचना भिन्न स्वरूपाची होती. मध्यंतरींच्या काळांत त्याच्या परिस्थितींत बरेंच स्थित्यंतर घडून आलें होतें. फेरीवाल्याच्या धंद्यांत त्यानें चांगलेंच यश मिळविलें, व आतां मोठ्या थाटांत एकादी रेशमी कापडाची ' फर्म ' काढावी असा त्याचा विचार होता. परंतु ह्या दोन वर्षांच्या अल्पावधींत त्यानें लक्ष्मीला तर वश करून घेतलेंच होतें. परंतु नलिनीच्या मुग्ध सौंदर्यानें व गोड वागणुकीनें तो पहिल्यापासूनच आकर्षित झाला होता. फेरीवाला म्हणून त्याला घरीं नेहमीं येण्याजाण्यास मज्जाव नव्हताच ! नलिनीच्या नि त्याच्या सहवासाचें रूपांतर प्रेमांत झालें व आतां नलिनी कायदेशीरपणें आपली पत्नी व्हावी म्हणून रावसाहेबांकडे तिला मागणी घालावयास आला होता. त्यांतून शरदकडे वाचलेल्या पत्रानंतर त्याला वडीलांचेंहि त्याच अर्थाचें पत्र आलें होतें. स्वतः जाऊन नलिनीला पाहून आपली पसंती कळविल्याबद्दल वडिलांनीं त्याला लिहिलें होतें.

रावसाहेब बाहेर आले तेव्हां फेरीवाला ओटीच्या दगडी पायऱ्यावर आपला गट्ठा बाजूला ठेवून बसला होता. ज्या धंद्यानें आपल्याला अप्रतिम यश दिलें, त्या धंद्याला शोभेल अशा सरंजामांत आपण नलिनीची मागणी घालण्यासाठीं जावें असें वसंतानें ठरविलें. शिवाय रावसाहेबांनीं पहिल्या भेटींत प्रदर्शित केलेल्या सामाजिक मतांच्या बाबतींत किती अर्थ आहे हेंही त्याला अजमावयाचें होतें.

रावसाहेब बाहेर येतांच फेरीवाल्यानें त्यांना उत्थापन दिलें. आपल्या ऑफिसमध्यें बोलावून रावसाहेब आपल्याशीं बोलतील अशी फेरीवाल्याची कल्पना होती पण ती व्यर्थ ठरली. एवढेंच नाहीं तर त्याला पायरीवरच बसवून रावसाहेब एका आराम खुर्चीवर पसरले.

" कसं कायरे बुवा तुझा धंदा चालतो ? "

प्रथम भेटींत ' तुह्मी ' नें सुरवात झालेल्या संवादाला आज " तूं " ह्या एकेरी शब्दप्रयोगानें सुरवात झाली. एकंदर फेरीवाल्यापेक्षां बेकारांचा दर्जा अधिक म्हणावयाचा !

रावसाहेब पुन्हां म्हणाले,—

" बरं झालं आलास, Lucky दिसतोस बुवा मोठा ! मलाहि बरीच खरेदी करावी लागेल कापडाची ! थांब, ह्या पोरीलाच हांक मारतों ! तिचंच कार्य आहे, तिच्या आवडीनं होऊं दे खरेदी ! " असें म्हणून रावसाहेबांनीं मोठ्यानें हांक मारली.

" नलिनी ! नलू ! !"

" काय बाबा ? " नलिनीची चर्या अतिशय उतरलेली पाहून फेरीवाल्याच्या अतःकरणांत कालवाकालव झाली. तिनेंही आपले मनोविकार शक्य तों आवरून विचारलें.

" काय काम आहे बाबा ? "

" ह्याच्याकडल्या किती साड्या अन् ब्लाऊजला कापड हवं आहे तुला ?

" मला मुळींच नको—आहे माझ्यापाशीं भरपूर !—"

" तसं नाहीं ग—तुझ्या लग्नांत तुला देण्यासाठीं ! "

" काय—यांचच लग्न आहे ? वा मग तर ह्यांनीं खूप माल घेतला पाहिजे आमच्याकडून ! नेहमीं तीन चार साड्या खरेदी केल्यावांचून मला कधीं जाऊं दिलं नाहीं बाईसाहेब आपण ! नि आतां वीस पंचवीस घेतल्यावांचून हालणार नाहीं मी आज ! "

फेरीवाल्याच्या मानभावीपणाचा नलिनीला संताप आला.

"चांगलं घर मिळालं आहे का बाईसाहेबांना ?" फेरीवाल्यानें आपली टकळी पुन्हां सुरू केली.

" हो, हो तर ! फार मोठा व्यापारी आहे ! पण तुला कशाला ह्या पंचायती ? त्याच्या दुकानावर तुझ्यासारखे कितीतरी फेरीवाले ठेवतां येतील !—अमेरिकेहून शिकून आले आहेत. "

" अस्सं ! "

" मला नाहींच त्याच्याशीं नि त्याच्या दुकानाशीं लग्न करायचं बाबा ! " रागानें फेरीवाल्याचें अस्तित्व विसरून नलिनी म्हणाली.

" त्यांच्यासारख्या थोर व्यापाऱ्यांशी नाहीं लग्न करायचं तर याच्यासारख्या एखाद्या फेरीवाल्याचं गाठोडं कां वाहायाचं आहे डोकीवर तुला ? " रावसाहेब डोळ्यावरचा चष्मा कपाळावर ठेवीत म्हणाले.

" हो, वाहीन जा ! " असें म्हणून नलिनी फणकाऱ्यानें आंत गेली.

ही संधि आपल्यास बोलावयास योग्य आहे असं समजून फेरीवाला रावसाहेबाच्या अगदीं जवळ गेला.

" रावसाहेब, आज मी आपल्याकडे विक्री करावयास आलों नाहीं. मला एक आपल्यापुढें याचना करावयाची आहे. रावसाहेब, दोन वर्षांपूर्वी नवचैतन्याचें अमृत पाजून, निराशेनें मृतप्राय बनलेल्या ह्या शरीराला आपणच नवजीवन लाभून दिलेंत. आज ह्या दोन वर्षांत केवळ फेरीवाल्याच्या धंद्यावर मला एक मोठी फर्म काढण्याचें सामर्थ्य आलें आहे. "

" उत्तम ! "

" पण ती काढण्यापूर्वी मला आपल्या आयुष्यांतील एका महत्त्वाच्या प्रश्नाचा निकाल लावावयाचा आहे. वास्तविक हा प्रश्न मी या पूर्वीच आपल्याला विचारावयास पाहिजे होता. परंतु दुपारची भ्रांत पडणाऱ्यानें तारांच्या मागें कशाला लागावं असं कदाचित् तुह्मीं ह्मटलं असतं ! रावसाहेब, आमच्या धंद्याच्या सामाजिक दर्जाबद्दल आपलें मत कायमच आहे ना ? "

" माझीं मतं इतकीं भुसभुशीत पायावर उभारलेलीं आहेत असं आपल्याला वाटतं कीं काय ? " भुंवया चढवीत रावसाहेब म्हणाले.

" नाहीं तसं वाटत नाहीं म्हणूनच मला माझं काम अर्धे अधिक झाल्यासारखं वाटतं ! "

" पुढचे शब्द वसंताच्या ओंठावर आले. वादळाला खरी सुरवात होण्याची हीच वेळ असें त्याला वाटलें. रावसाहेबांच्या कसोटीचीहि हीच वेळ होती. आपली खुर्ची रावसाहेबांनीं व्यवस्थित केली व ते आतां ताठ होऊन बसले. त्यांच्या अधिकच सन्निध जाऊन वसंतानें बोलण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याच्या हालचालीकडे लक्ष न देतां रावसाहेब तोंडांतील चिरूटाच्या धुराचे लोट सोडीत म्हणाले—

" महिन्याला किती प्राप्ती आहे तुमची ? "

" आहे साधारण ! कमींत कमी सात आठशें ! "

" अबब ! एखाद्या प्रॉव्हिन्शियल सर्व्हिस मधला माणूसहि हेवा करील तुमचा ! "

" होय रावसाहेब ! आपल्या उत्तेजनानेंच मला हें वैभव दाखविलें. त्या वैभवाला साजेल अशा सहचारिणीच्या मी शोधांत आहे ! "

" अहो, तुमच्या सारख्याला सहचारिणीच आपोआप शोधीत येतील ! "

" नाहीं. पण रावसाहेब, माझी सहचारिणी शोधीतच मी ह्या घराकडे आलों आहे. "

" म्हणजे ? मी नाहीं समजलों. "

" त्यांत समजणं कांहीं कठीण नाहीं ! रावसाहेब, आपल्या कन्येला मी मागणी घालावयास आलों आहे. "

पंचमाच्या सुरांत रावसाहेब गर्जून म्हणाले.

" काय ! माझ्या मुलीला ? नलिनीला मागणी एखाद्या दारोदार फिरणाऱ्या फेरीवाल्यानें घालावी ? शुद्धीवर आहेस तूं ? गाढवा, मघांच तुझ्यासमोर सांगितलं मी कीं तिचं लग्न जमलं आहे, चल् चालता हो ! आतांच्या आतां चालता हो ! नलिनीच्या कानीं जर हें पडलं तर प्राण नाहीं ठेवायाची ती चल ! उचल तें गाठोडं ! थोडासा पैसा हातीं खेळतांच आकाशाच्या चंद्राला हात पोंचविण्याची महत्त्वाकांक्षा ! "

" पण महाराज आपलीं मतं ! "

" चुलींत घाल माझीं मतं ! माझी मुलगी म्हणजे वाटेवर पडली आहे फेरीवाल्याला द्यायला असं तुला वाटलं ? हरामखोर ! उपकाराचं चांगलं प्रायश्चित दिलंस ! होतोस कां नाहीं चालता—कां देऊं गचांडी ? " क्रोधानें रावसाहेब बेभान झाले होते.

आणखी आपली शोभा होऊं नये म्हणून वसंतानें आपलें विसकटलेलें गांठोडें बांधून नोकराच्या डोईवर दिलें, व तो मोठ्या कष्टानें पायऱ्या उतरूं लागला. आपल्या मालकाला संताप येईल असेंच ह्या फेरीवाल्यानें कांहीं तरी केलें असलें पाहिजे असें समजून रावसाहेबांच्या नोकरानें वसंताचा कोट पकडला.

इतक्यांत पोर्चमध्यें एक मोटार येऊन थडकल्यामुळें त्याला वसंताला सोडून द्यावें लागलें; व तो अदबीनें मोटारचें दार उघडूं लागला.

" अहोहो ! विनायकराव ! आणि न सांगतां ! "

ओटीच्या पायऱ्या उतरीत रावसाहेब आपल्या भावी व्याह्यांना सामोरे गेले. परंतु विनायकरावांचें त्यांच्याकडे लक्षच नव्हतें. वसंताला पायऱ्या उतरतांना व नोकरानें त्याला पकडलेलें विनायकरावानें मोटारींतूनच पाहिलें होतें.

" वसंत ! तूं येथें ? मी आतांच तुझ्या घरीं सामान टाकून आलों ! "

" म्हणजे ? हे वसंतराव ? विनायकराव तुमचे चिरंजीव नि आमचे जामात हेच ? " कमालीच्या आश्चर्यानें रावसाहेबांनीं विचारलें.

"म्हणजे हा इथं काय करीत होता ? रावसाहेब, आपल्या ह्या नोकरानें ह्याला कां धरलं होतं ? "

परंतु रावसाहेबांनीं आतां वसंताच्या पायावर मस्तक ठेवलें होतें. वसंताचे नेत्रांतही अश्रू चमकूं लागले. तो म्हणाला.

" कांहीं नाहीं बाबा ! ही माझी सारी रोमान्सची आवड ! ! "



# बोलका चित्रपट

" Nothing but the infinite pity is sufficient for the infinite pathos of human life. "

—J. Shoathouse.

" तुझे पाय माझे राहियेले चित्तीं ।
ते मज दाविती वर्म देवा ॥
आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार ।
जाणसी विचार चालविता ॥ "

बिहाग रागांत गायिलेल्या या करुणरसपर अभंगाच्या तंद्रीनें मी ट्रॅम पकडण्याचें विसरलों. भिकाऱ्यानें हातांतील एकतारी खालीं ठेवली.

" महाराज ! आंधळ्याला एकच पैसा द्या ! ! देव तुमचं कल्याण करील ! आंधळ्याचा आशिर्वाद घ्या !—"

मी हात चटकन् खिशांत घातला.

एक आण्याचें नाणें वृद्ध भिक्षुकाच्या वाटींत पडलें.

वृद्धानें कान टंवकारिलें—आवाज ऐकला—वाटींत हातानें चाचपून पाहिलें वक्राकृति आणा हातीं लागला. त्या अंधःदृष्टींत सुद्धां आनंदाचें तेज चमकलेलें मला दिसलें.

मला वाटलें, वृद्धाला आण्याचें नाणें साऱ्या हयातींत प्रथमच मिळालें असावें. सुकलेले ओंठ थरारले व चुटपुटले, " परमेश्वरा, ह्या महात्म्याला सुखांत ठेव !

मी महात्मा !' कल्पना मला अतिरम्य वाटली.

वाटीच्या बाहेर जमिनीवर एक पैसा पडला होता, तो वृद्ध भिक्षुकाचाच आहे असें समजून मी तो उचलून वाटींत टाकला. वृद्धाच्या तोंडून धन्योद्गार

ऐकण्यासाठीं मी हपापलों—पण निराशा ! मीच मूर्ख ! ! वृद्ध भिक्षुकाला मघाचा महात्मा तो मीच याची कल्पना कशी व्हावी ? मी पाहिलें तो वाटींत बरोबर सोळा पैसे जमले होते.

  

" बस्स ! आमचा हिंदुस्थान देश भिकारी व्हायला कारण—अत्यंत महत्त्वाचं कारण म्हणजे हे भिकारी लोकच ! आणि त्यांच्या ह्या फुकटखाऊ धंद्याला तुम्ही चांगले सुशिक्षित लोक उत्तेजन देतां—मोठं आश्चर्य आहे ? "

" पण मी असं विचारतों, कीं भिकाऱ्यांची ही एवढी संख्या वाढायला तरी कारणीभूत कोण आहे ? सध्यांची आर्थिक परिस्थितीच ना ? '

" अरे जा, हें सब झूट आहे ! ज्या झाल्या त्या गोष्टींचा राष्ट्रीय आर्थिक परिस्थितींशी बादरायण संबंध जोडायचा ही संवयच तुम्हां अलिकडच्या पंडित बहाद्दरांना जडली आहे, पोरांना खेळणीं विकत घेऊन देतां आली नाहींत—लाव संबंध राष्ट्राशीं ! बायकोला नथ करून देण्याची ऐपत नसली कीं त्याचं खापर मार राष्ट्रीय आर्थिक परिस्थितीवर ! लेकांच्या मनगटांत कष्ट करून कमाई वाढविण्याची ताकद नाहीं, आणि चोरांना, ट्रेड—डिप्रेशन ! बायकॉट ! !—नॅशनल अवेकनिंग ! ! ! या लांब लांब बाता ठोकून आपला कमीपणा लपवूं पाहतां दुसरं काय ? ह्या मागच्या चळवळीपासून तर ह्या बायकांनीं तुमच्या सारख्यांना बायका म्हणण्याचीहि सोय राहूं दिली नाहीं. "

" पण मी म्हणतों ताराकान्त, काम करा, काम करा आणि पैसा मिळवा, अशा गप्पा तुमच्यासारखे लोक मारतात; पण निकामी लोकांना काम मिळवून देण्याची तुम्हीं काय सोय केली आहे आजपर्यंत ? - सांगा ! "

" कशी करतां येईल ?—आमच्या सारख्यांच्या मानेवर जर रिट्रेंचमेंटची तलवार—सफाईदार फिरणार आहे, तर यांची सोय कोण—कशी करणार ? मूर्खच आहां, वीणारव ! "

" तुमच्यासारख्या धडधाकट सर्वमान्य भिकाऱ्यांची ही गोष्ट, मग ह्या बापड्या विकलांग अंध वृद्धाला नोकरी कोण देणार ?—अन् अशी सोय जोंपर्यंत करण्यांत येत नाहीं तोंपर्यंत त्यांनीं दरोडेखोरी व भिक्षान्देहि यापैकीं

श्रेयस्कर अशा दुसऱ्या मार्गाचें जर अवलंबन केलं, तर त्यांत त्यांना दोष देण्यांत कोणता अर्थ ?—बिचारा आंधळा !"

"आंधळा ! सब झूठ; हें सारं ढोंग असतं यांचं—सारे चोर असतात ! वीणारव, तुमच्यासारखीं भोळीभाबडी माणसंच यांच्या ढोंगांनीं फसतात. आंधळे नाहींत न् कांहीं नाहीं—फार लबाड असतात भिकारी हे ! मुळींच त्यांच्यावर दया दाखवितां उपयोगी नाहीं !"

"पण सर्वच सारखे नसतात, ताराकान्त !"

"सोडा हो ती गोष्ट !—सारे बेटे एकाच माळेचे मणी !!—आतां हाच भिकारी पहाना !—हा चांगला राजबिंडा भिकारी दिसतो आहे. जरा वृद्धत्वानं खंगला आहे इतकंच; पण हा कांहीं पिढीजाद भिकारी नव्हे."

"नुसत्या अनुमानावरून सिद्धान्त ठोकण्याची ही तुमची रीत फार घातक आहे, ताराकान्त !"

"घातक आहे !—माझी रीत घातक आहे !!—पहा, पहा वीणारव, तुमच्या त्या अंध धृतराष्ट्राकडे पहा—माझी तर खात्री आहे, कीं तो चांगल्या कुळांतला आहे—पहा लेकाचा थोडेसे पैसे जमतांच लागला आपला गाशा गुंडाळायला ! आतां तुम्हीच सांगा, वीणारव, याचं हें निव्वळ ढोंग आहे कीं नाहीं ? त्यानं खात्रीनं आपलं भाषणं ऐकलं आहे, आणि म्हणूनच स्वारी गडबडीनं जागा बदलायच्या मार्गाला लागली आहे."

आतांपर्यंत आमच्या बाजूला उभ्या असलेल्या एका पारशी गृहस्थानें मध्येंच तोंड खुपसलें.

"ए तो बराबर छे, मिस्तर ! ए लोक लई खराब असते, ए सामनेका भिकारी हाय, ते तर अंधा नयी, केम के ए हमेशा सिनेमा देखाडवाया ज्याते."

मी समोर पाहिलें—तों तो मघांचा अंध वृद्ध केव्हांच निघून गेला होता. मी मनाशीं विचार केला—"माझा धर्म खराच अनाठायीं होता कां ?"

  

तीच रात्र, साडेनवाचा सुमार, मी हांक ऐकली.

"वीणारव, अहो वीणारव ! आहां कां घरांत ?"

आवाज ताराकांताचा होता. मी खिडकींतून पाहिलें. तीच स्वारी.

" या वर या. खालूनच काय ओरडतां ? "

एकेक पायरी सोडीतच स्वारी वर आली, व जवळच असलेल्या वेत्रासनावर अधिष्ठित झाली.

" अरे वीणा ! आतां बसायला न् बोलायला मला सवड नाहीं येतोस का या ' इंपीरियल फिल्म ' च्या सोनेरी जाळ्याला ? अगदीं सेंट परसेंट ऑल सिंगिंग–ऑल टॉकिंग पिक्चर आहे बुवा ! "

" मुख्य फीचर्स कुणाच्या आहेत ? "

" जगदीश गोरे व मिस् कमलाक्षी ह्या दोघां जोडीचं प्रेक्षणीय काम आहे म्हणतात. चलतोस का ? चल लवकर तर ! आपल्याला उशीर होईल नाहीं तर; चल आटप ! उद्यां आहे शनिवार—हा चित्रपट कांहीं पुन्हां पहायला सांपडायचा नाहीं ! "

" मला आतां पैसे खर्च करायला सवड नाहीं, ताराकान्त ! हा महिन्याचा शेवटला आठवडा आहे हें विसरूं नको. "

" मला वाटलंच, अशी तूं कांहीं तरी सबब सांगणार म्हणून; पण पैसे खर्चून जाणाऱ्यापैकीं सद्गृहस्थ मी नव्हे—हा पहा फ्री पास ! "

मीहि आढेवेढे न घेतां कबूल झालों. फुकट सिनेमा पाहण्याची अलभ्य संधि कोण दवडणार ? "

  

थिएटर चिक्कार होतें. जगदीश गोरे ह्या नवीन सिनेमा ताऱ्यानें चलत् चित्रपट सृष्टींत महाराष्ट्राचा ' रोमान् माहारो ' ही पदवी अगदीं थोड्या अवधींत मिळविली होती. सौंदर्याची जोपासना व आवाजाची उत्तम देणगी ह्या दोन गोष्टींनीं त्यानें एक दोन चित्रपटांतच हिंदी जनतेला डोलायाला लावलें होतें.

तेजस्वी तारा एका क्षणीं चमकावा व दुसऱ्या क्षणीं आपल्या नजरेसमोर तटकन् तुटावा, त्याप्रमाणें जितक्या त्वरेनें जगदीश दोन दिवस जगांत चमकला तितक्याच त्वरेनें आपल्या चमकेचा चटका लावून तो ह्या जगाला सोडून गेला होता.

टर्रर ! टर्रर ! ! टर्रर ! ! !

पडदे सरकले गेले; चमचमणारे असंख्य दिवे पहांटेच्या तारकांप्रमाणें एका-मागून एक लुप्त झाले; सर्वत्र अंधार पडला. रडणारीं मुलें गप्प राहिलीं. कबुतराप्रमाणें कुजकुजणाऱ्या रमणीचें कूजित बंद पडलें. ऐसपैस रेलणार पुरुषांचे जीव मुठींत धरल्याप्रमाणें ताठ बसले. जाहिराती पडद्यावर सरकू लागल्या, स्टुडे-बेकर The best and the cheapest in the world. " K. C. Marrot the only dealers in water-proofs " अशा एक ना पन्नास जाहिराती प्रेक्षकांच्या सहनशक्तीला ताण देत होत्या.

एकदांचा मुख्य चित्रपट सुरू झाला. एका अंध राजपुत्राच्या प्रेमाच्या सोनेरी जाळ्यांत सांपडलेली एक राजकन्या आपल्या एकनिष्ठेनें व उज्ज्वल प्रेमानें राजपुत्राची एका विवक्षित प्रसंगीं गेलेली दृष्टि परत आणते, असें त्या चित्रपटाचें सुंदर कथानक होतें.

अंध राजपुत्रानें – जगदीशनें गातच प्रवेश केला.

" तुझे पाय माझे राहिलेले चित्तीं ।
ते मज दाविती वर्म देवा ॥
आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार ।
जाणसी विचार चालविता ॥ "

एकाच लकेरीनें माझी मति कुंठित झाली. सकाळचाच तो अभंग त्याच रागांत, थेट त्याच पद्धतीवर गायिलेला तो तुकोबाचा अभंग ऐकून मी हतबुद्ध झालों. त्याच ताना, तीच लकब ! ! छे, मी ऐकण्यांत तर चुकत नव्हतों ?— त्यांत विशेष थक्क होण्यासारखी गोष्ट म्हणजे जगदीशच्या आवाजांतहि तोच नाद ! सकाळचा तो अंध भिक्षु व जगदीश एकाच गुरूचे तर शिष्य नव्हत ? मग ताराकान्तानें म्हटल्याप्रमाणें तो खरा भिकारी नसून कदाचित—

पण इतक्यांत प्रेक्षकांतून एक करुण–अति करुण शब्द मला स्पष्ट ऐकूं आला, " जगू—जगू ! "

पण गायनाच्या व आजूबाजूच्या एकंदर अस्थिर वातावरणांत तो विरून गेला. देवाला आळविण्याची जगदीशची ती भूमिका अंतःकरणाला पीळ

पाडण्यासारखीच होती. त्या प्रसंगाला साजेशा बिहाग रागांत गायिलेल्या, तुकाराम महाराजांच्या त्या अंतःस्फूर्त अशा प्रेमळ अभंगानें सर्वत्र शांतता पसरली.

चित्रपट पुरा झाला. दिवे परत हीरक-मण्याप्रमाणें लखलखूं लागले. उजेड चक्क पडला पण एका माणसाला मात्र अंधेरी आली. तिसऱ्या वर्गाच्या प्रेक्षकांत एकच गर्दी उडाली. एक मनुष्य मूर्च्छना येऊन पडला होता.

" इथं कोणी डॉक्टर आहे कां ? " प्रेक्षकांतून पृच्छा झाली. मी डॉक्टरच होतों. गर्दीतून वाट काढीत मी धांवतच गेलों. ताराकान्त माझ्या मागून येत होता. त्याची रुंदी अधिक असल्यामुळें प्रेक्षकांतून वाट काढीत येणें त्याला जरा जड गेलें.

त्या माणसाला—त्या मूर्च्छित माणसाला पाहतांच मला मूर्च्छना येण्याची पाळी आली. मी जागा होतों काय ? कां झोंपेंतच सारा सिनेमा ! स्वतःला चिमटा काढून शुद्धि—बेशुद्धि ओळखून काढण्याचा सर्वमान्य प्रयोग स्वतःच्या हातावर करूं लागलों. बाजूनें कोणीसें बोललें, " डॉक्टरसाहेब, तुमचीच नाडी काय तपासतां ? "

मी चांगलाच शुद्धीवर आलों. मूर्च्छित व्यक्ति दुसरी कोणी नसून तो सकाळचाच-मला महात्मा पदाला पोंचविणारा भिकारी होता. अंध भिकारी उघड्या डोळ्यांनीं सिनेमा पाहतो अं ! एकच क्षण त्याच्या वंचनेविषयीं मला संताप आला. थोडेसे उपचार करतांच वृद्ध शुद्धीवर आला. त्याचे सकाळीं मिटलेले डोळे आतां सताड उघडे होते, पण त्याच्या प्रत्येक प्रक्षेपणांत करुणरस भरलेला होता. त्याची लबाडी उघड करण्याची माझी छाती झाली नाहीं. कदाचित् दिवान्ध असेल तो असें मला वाटलें. पण सिनेमाकरितां भिक्षान्देहि ! ताराकान्त म्हणाला तेंच खरें, आम्हींच ह्या भिकाऱ्यांना परान्नपुष्ट बनवीत आहोंत !

मुंबईसारख्या बकाल शहरांत जो पहावा तो आपल्या कामांत गुंतलेला ! कोणाची विचारपूस कोण करतो ? वृद्ध शुद्धीवर येतांच मघांची गर्दी हळूहळूं नाहींशी झाली. अधिकारीवर्ग वृद्धाला बाहेर जाण्याची घाई करूं लागला. पण अंगांत चालण्याची तरी ताकद होती कुठें ? त्याच्या डोळ्यांतून सारखा अश्रु-वर्षाव चालला होता. कां कुणास ठाऊक, पण मला त्याची सर्व हकीकत

विचारावी अशी तीव्र इच्छा झाली. माझ्या खांद्यावर त्याचा हात ठेवून मी त्याला सांवरून हळूहळू बाहेर नेण्याची खटपट करूं लागलों.

एवढ्या वेळांत ताराकान्त माझ्याजवळ येऊन ठेपला होता. त्याचें भिकाऱ्याकडे लक्ष जातांच तो ओरडला.

" वीणारव ! "

" हं, सारं समजलों, ताराकान्त !—अगदींच मनुष्य धर्माला पारखे होऊं नका ! "

अधिक प्रश्नोत्तरें करण्याची ती वेळ नव्हती.

* * * *

ती सबंद रात्र आम्ही जागत बसलों होतों. मी आणि ताराकान्त माझ्या खोलींत म्हातारा हताश स्थितींत पडला होता.

" आतां बरं वाटतं ना जरा आपल्याला ? थोडी गरम कॉफी घेतां ? अन् आतां कॉफी पिऊन स्वस्थ झोंपावयाचं बरं–मुळींच बोलायचं नाहीं ! "

" नाहीं कसं ! मी आज बोलणार ! मनसोक्त बोलणार ! ! आजच्या सारखा आनन्द आज मी कित्येक दिवसांत भोगला नव्हता.

बाळांनो, माझ्यासाठीं किती कष्ट करतां हे ! देव तुमचं सदा कल्याणच करील ! अनाथ अपंगांच्या सेवेचं फळ तुम्हांला कधीं मिळाल्याशिवाय राहणार नाहीं " कांहीं वेळ म्हातारा स्वस्थ पडून राहिला. आम्ही तिष्ठत बसलोंच होतों.

" बाळांनो, ह्या बोलक्या चित्रपटाची कल्पना कुणी काढली ? " म्हातारा आतां खणखणीत बोलत होता.

" कां !— "

" नाहीं, पण अगोदर सांगा; मी जाईन–त्या माणसाच्या चरणावर ह्या जीर्ण देहाचं विसर्जन करीन. मला–माझ्यासारख्या हतभागी जीवांना तर तो प्रत्यक्ष परमेश्वरच वाटतो. त्या माणसानं त्या सिनेमा सृष्टीच्या परमेष्ठीनं प्रत्यक्ष मृत्यूलाहि जिंकलं आहे. "

" कसं !— "

" कसं ?—म्हणून काय विचारतां आज मी माझ्या जगूला साक्षात् बोलतांना–हंसतांना–गातांना पाहिलं, माझ्या पुत्रवियोगानं पोळलेल्या वृद्ध व भग्न हृदयाला किती आनंद झाला याची तुम्हांला कल्पना तरी आहे का बाळानों ?—माझं दुःख समजायाला पुत्राच्या मृत्यूनं विदीर्ण झालेलं पितृहृदयच पाहिजे ! इतरांना त्याची अंशतःहि जाणीव व्हायची नाहीं. जगू–जगू–! ! " म्हातारा रडूं लागला. आम्हीही त्याला रडूं दिलें.

" जगू लहान होता तेव्हांच त्याची आई मला सोडून गेली. जगूच्या आधारानं मी जगलों. त्याच्या बालचेष्टांनीं मी माझ्या पत्नीचं दुःख विसरायचा प्रयत्न केला. माझं सारं चित्त जगूला कसं सुखी करावं याकडे लागलं. जगूला माझ्या आटोक्यांत असलेलं सर्व सुख द्यायला मी कमी केलं नाहीं. जगू मॅट्रिक झाला. पण माझी नोकरी संपुष्टांत आली. रिट्रेंचमेंटच्या आघातानं आम्हां अर्धपोटी रहाणाऱ्यांना विनपोटीं बनविलं. त्यांतून मी वृद्ध ! वृद्धाला जगण्याचा काय हक्क ? असलेल्या पैशावर वर्ष सहा महिने आम्ही जेमतेम निभावलों.

जगू एके दिवशीं हळूंच मला म्हणाला, " तात्या, आतां तुमच्यानं काम होत नाहीं— मी कुठं तरी नोकरी धरूं कां ? कुठंही मला पन्नाससाठ रुपये मिळतील. आपल्या दोघांचा चरितार्थ उत्तम चालेल. आपल्याला ह्या वयांत कष्ट करायला लावून पुढील अभ्यासक्रम गांठण्याची मला इच्छा नाहीं. "

जगूच्या ह्या उद्गारांनीं मी धन्य झालों. मुलांची अशी वृत्ति सध्यांच्या काळीं कोठून दिसून यायला !

जगूला मी मूक संमति दिली.

दोन महिने गेले—चार महिने—वर्ष लोटलं;—जगूची खात्री झाली कीं नोकरी धंदा मिळणं म्हणजे ह्या धंदेवाईक जगांत तितकंसं सोपं नाहीं. मला माझ्या तारुण्यांत गाण्याचा नाद होता. जगूमध्यें तो जन्मतःच आला होता. तो सुंदर गात असे; त्यांत त्याला आवाजाची ईश्वरी देणगी मिळाली होती. माझ्या नादानं मी त्याला नादी बनविलं. गायनाचा जगू पुरा नादी बनला. उठतां, बसतां, हिंडता, फिरतां जगू गायचा ! अनुकरण शक्ति त्याला छान होती. कुणाहि प्रसिद्ध गायकाच्या ताना तो जशाच्या तसा गायचा;

किंबहुना मुळापेक्षां सरस वठवायचा. त्याच्या गायनानं मी व गाण्याच्या तंद्रीनं तो आपली निःसहाय्य स्थिति विसरत असूं.

" तात्या ! " एक दिवस जगू मोठ्या लडिवाळपणें म्हणाला.

" तात्या ! एक गोष्ट तुम्हाला विचारूं कां ?—तुम्ही रागावणार तर नाहीं ? —तात्या, सांगा ना—? "

मी गहिंवरलों. जिवापाड–जतन केलेल्या फुलाच्या रोपावर कुणी आपल्याच हातीं आंधण ओतील ?—मी जगूला जवळ घेतलं, त्याला धीर दिला.

" तात्या, त्या इम्पीरियल फिल्म कंपनींत बोलक्या चित्रपटासाठीं गाणाऱ्या नटाची गरज आहे. नोकरी चालून आलेली आहे. जाऊं तात्या, जाऊं ?—जाऊं ?—सांगा ना ! पगार खूप मिळेल. मग तुम्ही न् मी तात्या अत्यंत सुखांत राहूं ! "

सिनेमांतील नटाची नोकरी ! मी विचारांत पडलों. तिकडल्या वातावरणाविषयीं मला फारसा आदर नव्हता. माझ्या स्तब्धतेचा चाणाक्ष जगूनें केव्हांच कयास बांधला क्षणभरच—एक क्षणभरच त्याच्या गोंडस चेहेऱ्यावर निराशेची एक सूक्ष्म छटा मारली.

" तात्या, कुठंहि प्रामाणिकपणं नोकरी करायला काय हरकत आहे ? शिवाय इतर ठिकाणीं नोकरी शोधण्यांत मी मुळींच कसूर केली नाहीं हें तुम्ही पाहिलंच आहे. "

" मला सुदैवानं त्याच्या इच्छेला मान देण्याची बुद्धि झाली. मुलानो, त्याच सिनेमांतील नोकरीनं माझ्या बाळाला आज अमर केलं आहे. मी माझ्या मृतजगूला हंसतांना, बोलतांना, खेळतांना, बागडतांना, गातांना जशाचा तसाच पहात आहे—पाहूं शकतों. बोलक्या चित्रपटाच्या या विजयी मोहिमेनं प्रत्यक्ष मृत्यूलाहि नामोहरम केल्यानं, माझ्यासारख्या जीर्ण जीवांचा उद्धार करण्याचाहि तो विसरून गेला आहे. ताराकान्त, वीणारव ? ज्या मेंदूतून ह्या बोलक्या चित्रपटांची कल्पना उदय पावली त्यांना मी माझा परमेश्वर कां मानूं नये ? सिनेमांतील नटाचा धंदाच श्रेष्ट, अशी माझी आतां ठाम समजूत होऊन बसली आहे. जगूला नोकरी लागून एक वर्ष लोटलं नाहीं तो निष्ठुर कालानं माझी म्हाताऱ्याची काठी हिरावून नेली. मी बेभान झालों. दैव कुणाच्या

सुखदुःखाची, सोई—अपसोईची कदर करीत नसतं. ह्या अफाट जगांत माझ्यासारख्या क्षुद्र प्राण्याला कोण सांवरणार?—कुणाच्या सहानुभूतीची मी अपेक्षा करणार? जरा जर्जरित झालेल्या दुःखी जीवाच्या पोटाची खांच भरणं परत प्राप्त झालं. जवळ कपर्दिक उरली नाहीं. कोरडी सहानुभूति दाखविणारे म्हणाले, "तात्या, जगूचा सहा महिन्यांचा पगार कंपनीकडे आहे तो मागा, तुम्हांला जन्मभर पुरेल! उगाच शरीराचे हाल कां करतां?"

जगूच्या पैशावर त्याच्या मागं मी जीव जगवूं? कल्पनाच असह्य वाटली. तो पैसा मिळवितांना जगूच्या रक्ताचं पाणी झालं होतं-त्या पाण्यावर माझा हा सुकलेला जीर्ण जीवनवृक्ष जगवूं? मी कष्ट करण्याचा निश्चय केला. जगूसारख्या तरुण, उमेदी जीवाला नोकरी मिळण्याची मारामार पडली-माझ्यासारख्या जीर्णदेही माणसाकडून जग कोणत्या कामाची अपेक्षा करणार? हिंदुस्थान देशांत तरी सर्वमान्य होणारा भिक्षेचा मार्ग मी पत्करला. मला भिक्षा मागतांना पाहून जगूला सूख वाटलं. पिढीजात भिकारी मी नसल्यामुळें धंदा साधेना. ट्रॅमचं जंक्शन म्हणजे भिकाऱ्यांचं न्यूयॉर्क! तिथंच बसण्याची सनद घेतली. चारपांच पैसे मिळाले कीं पोट भरत असे. जीव जगण्यापुरताच मी खाऊं लागलों. खाण्यासाठीं जगायची आतां माझी इच्छा राहिली नव्हती. रस्त्यावरून ओळखीचे चेहरे जातांना पाहून माझा जीव कासावीस होऊं लागला. बाळानो, माझ्या छातींत अशा वेळीं कसे गोळे उठत याचं वर्णन कसं करूं!

"उघड्या डोळ्यांनीं माझ्या विपदा जग पहात होतं. मी बंद डोळे करून जगाआड होण्याचा प्रयत्न केला. दृष्टिआड सृष्टि! अंधाची भूमिका घेतली. कुणाला तरी बोलतांना ऐकलं, कीं इम्पीरियल फिल्म कंपनीचे चित्रपट लागले आहेत. मनानं उचल खाल्ली. जगूच्या आठवणीनं हृदय भरून आलं-जिवन्त पाहण्याची संधि! पण भिकारी आणि सिनेमा!!-कसं जुळणार? हवं तें करून चित्रपट पहायचे असा निश्चय केला. सिनेमाला जाण्याइतके पैसे मिळतांच मी इम्पीरियल कंपनीचे चित्रपट पहाण्यासाठीं आंधळ्याचा डोळस होऊन रात्रीं जात असे.

"सर्वच चित्रपटांत जगू कुठला दिसायला? जितक्या आशेनं मी जायचा

तितक्याच निराशेनं बाहेर यायचा थिएटरच्या! तरी पण जगूला पाहण्याच्या वेळ्या आशेनं मी दररोज हिंदी चित्रपट पहाण्याचा क्रम ठेवला. दररोज चार आणे बाजूला ठेवून उरतील त्या पैशांत मी पोटाची खळगी कशीबशी भरीत असे. आंधळ्या भिकाऱ्याला सिनेमा थिएटरांत डोळस झालेला कुणी पाहील ही कल्पनाहि मला शिवत नसे. पुत्रप्रेमानं मी खरोखरच अंध बनलों होतों.

या माझ्या खडतर तपश्चर्येचं फळ, वीणारव, माझ्या परमेश्वरानं मला आज दिलं, आज मी माझ्या जगदीशाला पूर्ववत् गातांना, बोलतांना पाहिलं, त्याला मी लहानपणीं शिकविलेला तुकोबाचा प्रेमळ अभंग माझ्या आवडीच्या बिहाग रागांत आळवितांना पाहून मी हर्षातिशयानं वेडा झालों. जगूला कवटाळण्यास हात पसरले, हांका मारल्या-मी बेभान झालों! आणि माझ्या जागीं कोणीहि व्यक्ति असती तर तिला आपलं प्रेमाचं माणूस-मृत्यूनं आपल्यापासून हिरावून नेलेलं माणूस-आपल्यापुढं अकस्मात् आलं असतां जें काय वाटलं असतं-जें काय झालं असतं तेंच मला झालं! जगूचं पूर्ण काम पहाण्याचंहि माझ्या दैवी नव्हतं! मी मागल्या साऱ्या आठवणींनीं स्वतःला विसरलों-पुढें काय ?-अंधार! सर्वत्र अंधार!! पुढं काय झालं हें मला आठवत नाहीं.

"आम्हां अंधा तुझ्या पायाचा आधार ।
जाणसी विचार चालविता ॥"

एवढेच जगूचे स्वर अद्याप कानांत गुणगुणतात —

वीणारव! ताराकान्त! ऐका—ऐका!! लावा माझ्या कानांना कान!

म्हातारा परत मूर्च्छित झाला.

  

तात्याच्या परमेश्वराच्या—इम्पीरियल फिल्म कंपनीच्या प्रत्येक चित्रपटाला तीन व्यक्ती नियमानें जात असतात.

तात्या मी व ताराकान्त!



# फुलमाळीण

"हे पहा चार वाजले!" घड्याळाचे ठोके मोजीत पद्मा म्हणाली,—"आतां इतक्यांत ती आमची राधा माळीण येईल पहा!"

आपल्या फार दिवसांनीं भेटावयास आलेल्या बालमैत्रीणीला-इंदूला धीर देत पद्मा म्हणाली.

"अग पण नाहीं एक दिवस वेणी घातली म्हणून काय झालं?"

माझ्या राधा माळीणीच्या हातची वेणी एक वेळ घातलीस तर बाई, रोज वेणी घालण्याचा नियमच करशील तूं इंदू!"

"ओ हो हो!-- मग तर अवश्य वेणी घेतल्यावांचून जातां कामा नये!" असें म्हणून घरीं जायला निघालेली इंदू पुन्हां आरामखुर्चीवर लवंडली.

"शिवाय राधी किती सुंदर दिसते म्हणून सांगू! खरंच, इंदू आपलं कृत्रिमतेनं आणलेलं सौंदर्य म्हणजे पडद्यावर चितारलेला फुलांचा बगीचा! नुसत्या चढत्यापढत्या रंगाची चढाओढ! मार्दव नाहीं त्यांत नि रसहि नाहीं; राधीच्या नाजूक सौंदर्याची बिचारीला दादहि नाहीं."

"ती पहा तुझी सौंदर्यदेवताच उगवल्यासारखी वाटते!"

कंपाऊंडांत शिरणाऱ्या माळणीकडे बोट दाखवित इंदू म्हणाली.

राधा माळणीनें नेहमींप्रमाणें आपलें पायऱ्यावरील स्थान काबीज केलें, व पुढें टोपली ठेवून ती एकेक वेण्या पद्माला दाखवूं लागली. त्यांतील एक टपोऱ्या मोगऱ्यांची व आबोलीची वेणी उचलून पद्मा म्हणाली.

"काय घेणार ग याचं?"

"चार आणे!"

"हें ग काय राधे! फार बाई तुझ्या वेण्या महाग!"

"महाग! एवढ्या वेणीचे मी चार आणे मागितले तर महाग कसलं बाईसाहेब! आपण चार आणे कुठें खर्चत नाहीं! सायबांच्या हाटेलांत गेलांत तर

बटलराच्या बशींत च्यार सहा आण्यांची मोड ठेवायाला चुकत नाहीं तुम्ही लोक !—मग ह्या वेणीवर मी कांहीं थोडी तरी मेहनत घेतली आहे ना ? ”

“ बरीच कीं ग चुरचुरीत आहे तुझी राधा ! ” इंदूनें राधेच्या ज्ञानाची मौज वाटून उद्गार काढले.

“ तुला ग कसं हें माहीत राधे ? ”

एक क्षणभरच राधेला उत्तर देतां आलें नाहीं. पण दुसऱ्याच क्षणीं ती म्हणाली.

“ आमच्या शेजारीं एक किरिस्ताव राहतो तो त्या कसल्याशा हाटेलांत बटलरचें काम करतो. त्यानंच हें सारं सांगितलं ! ” पद्माचें समाधान झालें, ह्या उत्तरानें.

“ तुझी राधा बरीच Civilized पण दिसते हो ! ” इंदूनें राधेबद्दल आपलें मत दिलें.

“ म्हणजे काय ? ” इंग्लीश शब्दाचा अर्थ न कळल्यामुळें राधेनें विचारलें.

“ म्हणजे सुधारलेली ! ”

“ अस्सं ! बाई, सगळं जग सुधारायला लागलं नि आमची माळ्याची जात तेवढी कशी मागासलेली राहील ? देवावरच्या निर्माल्याबरोबर उकीरड्या-वरील कचराहि नदी वाहून नेते आपल्या प्रवाहांत ! ”

“ उखाणे नि म्हणी बऱ्याच पाठ येतात कीं ग तुला !—बरं तें राहूंदे. ह्या पाहुण्याबाईंना उशीर होतो घरीं जायला—सांग बरं ह्या वेणीचं काय घेणार नक्की ? ”

गांभीर्याचा आव आणून राधा म्हणाली.

“ नक्कीच सांगितली चार आणे किंमत ! दोन आणे तर घरांत पडते, बाकीचे दोन आणे पोटापाण्याला नको ? ”

“ ह्या दोन आण्यावरच जसं कांहीं तुझं पोट अडून राहिलं आहे ! तुझा नवरा मिळवितो त्याचं काय करतेस ? तुमच्या लोकांत हें बरं असतं बाई. दोघेही नवरा बायकोनं कमवायचं ! कोणी कुणावर अवलंबून राह-यला नको ! ”

नवऱ्याचें नांव काढतांच राधेचें तोंड गोरेंमोरें झालें. तिच्या चेहऱ्यांत पडलेला फरक इंदूच्या नजरेंतून सुटला नाहीं.

ती म्हणाली,—" कां ग, राधा !—मारतो वाटतं तुझा नवरा तुला ?"

" हाणमार केली असली तरी त्यांच्या पायाला मी अश्शी घट्ट धरून राहिलें असतें. !"

" मग ? "

" टाकलेली आहे मी बाई ! " आपल्या पदराच्या टोंकानें डोळे टिपीत राधेनें उत्तर दिलें.

तशीच अश्रूंनीं डबडबलेल्या डोळ्यांनीं ती जमिनीकडे टक लावून पाहत बसली.

" घ्या बाई, तुम्हांला वाटेल तेवढी किंमत द्या त्या वेणीची ! अद्याप ह्या खपवायला हव्यात ! "

तिच्याशी अधिक थट्टा विनोद करण्याचा अगर किंमतीसाठीं हुजत घालण्याच्या मनस्थितींत ती नाही असें पाहतांच पद्मानें ती वेणी चार आणे देऊन खरेदी केली.

अंगण ओलांडित असलेल्या माळणीच्या पाठमोऱ्या मूर्तीकडे पाहून इंदू म्हणाली—" पदू, ह्या येत्या कॉन्फरन्सच्या बैठकींत टाकलेल्या बायकांच्या स्थितीचा विचार करण्याबद्दल एखादा ठराव मांडला पाहिजे बाई ! हा टाकलेल्या बायकांचा वर्ग दिवसें दिवस वाढतच चालला आहे; स्त्रीशिक्षणाचा प्रश्न, विधवा विवाहाचा प्रश्न, कुमार स्त्रियांचा प्रश्न अद्याप पूर्णपणें सुटला नाहीं तो हा एक अत्यंत विचारनीय असा नवीनच प्रश्न स्त्रीसमाजाला भेडसावित आहे. "

थोडा वेळ दोघीही स्तब्ध बसल्या.

" मला वाटतं इंदु, ह्या सर्वाला कारण स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य ! "

" मला नाहीं असं वाटत ! हा आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न खालच्या कामगार व इतर वर्गापेक्षां आपल्या सारख्या सुधारलेल्या व मध्यम वर्गांतील स्त्रियांनाच अधिक जाचण्यासारखा आहे. तूंच पहा आतां, ती माळीण—नवऱ्यानें टाकल्याबद्दलच तिला काय वाईट वाटतं असेल तें ! परंतु

त्याबरोबर पोटाची विवंचना तिला फारशी करावयास नको. आपल्या पोटापुरतें मिळविण्याची धमक तिच्यांत आहे. त्याच्या उलट आपली स्थिति पहा. तूं आज एका बड्या शिक्षणाधिकाऱ्याची बायको आहेस, परंतु तुझं स्वतःचं उत्पन्न दाखीव! ह्या वेणीचा चार आण्याचा खर्च आपल्या खात्यांत लिहून पतिराजापुढें सादर करावा लागेल. ही चार आण्यासारखी क्षुल्लक रक्कमहि तुझ्या मालकीची नाहीं. उद्यां तुझ्या यजमानानं म्हटलं पद्मे, तुझ्या मैत्रिणींना चार चार आण्यांची वेणी देणं आपल्याला परवडणार नाहीं. तर तुला सरळ आपली इच्छा दाबून ठेवावी लागेल; पण राधेनें वेणीमागें कमावलेली पै न पै तिच्या मालकीची आहे!"

"खरं आहे तुझं म्हणणं इंदू! अधिक सुधारणा वास्तविक श्रीमंत व मध्यम वर्गांतील स्त्रियांमध्येंच झाली पाहिजे." पद्मेनें आपली संमति दिली.

"—आणि ती न झाली तर ह्या वर्गांतील टाकलेल्या स्त्रियांचें जीवन कामगारांच्या स्त्रियांपेक्षांहि कष्टमय होईल, शिवाय नवऱ्यानें टाकल्यावर, त्याच्याशीं पटत नसल्यास घटस्फोटाचा मार्ग तरी त्यांना उघडा आहे."

आणखी बराच वेळ बोलत बसल्या असत्या पण घड्याळांत पांचाचे ठोके पडलेले ऐकून इंदू घरीं जावयास उठली.

  

"राधे, आज अगदीं सगळीं घरं उरकून आल्यासारखी दिसतेस माझ्या घरीं!"

"कशावरून?"

"सगळ्या वेण्या संपलेल्या दिसतात!"

"बरोबर आहे तुमचं म्हणणं,–पण तुमच्यासाठीं मुद्दाम बांधलेली वेणी ही पहा कशी लपून ठेवली आहे!" असें म्हणून टोपलीच्या तळाला बदामीच्या पानाखालीं झांकलेली एक सुंदर वेणी काढून फुलमाळणीनें पद्मेच्या हातीं दिली.

"आज त्या डॉक्टर राण्याकडे हळदीकुंकवासाठीं वेण्या मागितल्या होत्या त्या नेऊन दिल्या नि ही तुमच्याकरितां बांधली," ती म्हणाली.

"राधे, तूं किती ग सुंदर वेण्या बांधतेस! कुणाकडे ही कला शिकलीस तूं?" वेणीची बांधणी उलटून पालटून पाहात पद्मा म्हणाली.

" माळणींना कांहीं ही कला दुसरीकडून शिकावी लागते ? आमच्या पिढ्यान् पिढ्या आम्हीं करीत आलों आहोंत हें काम ? "

" तुझा नवरा पण माळ्याचाच धंदा करतो काय ग ? "

" कुणास ठाऊक ? "

" कां ? "

" पण बाईसाहेब, आपल्याला काय करायच्या त्या गोष्टी कळून ? "

आतां पद्मेला आठवण झाली त्या दिवसाची. राधेनें आपल्याला नवऱ्यानें टाकल्याचें सांगितलें होतें.

तिनें चटकन् विचारलें.

" राधे, एक प्रश्न विचारूं कां ? राग नाहीं ना येणार ?"

" विचारा कीं ! " गालाला खळी पाडीत राधा म्हणाली.

" तूं इतकी रूपवान आहेस राधे, नि तुझ्या नवऱ्यानें तुला टाकण्याचं कारण काय ? "

" मी शिकलेली नाहीं–मला पदवी नाहीं नि नवऱ्याच्या बरोबर फिरण्याइतकी माझ्यांत योग्यताहि नाहीं, "

ह्या उत्तरानें पद्मा अगदी गारच झाली.

" म्हणजे तुझा नवरा असा कोण आहे ?

" विलायतेहून शिक्षकाचं काम शिकून आले आहेत असं लोक म्हणतात ! "

" म्हणजे ! ! " आश्चर्यामागून आश्चर्याचे धक्के पद्मेला वरून मिळत होते.

" म्हणजे – राधे,—राधाबाई, तुम्ही माळी जातीच्या नव्हेत तर ? "

" तें कां ? त्या जातींत इतके शिकलेले लोक नाहीं म्हणतां ? "

" नाहींत—अद्याप मी ऐकले नाहींत ! राधाबाई तुम्ही एक गूढ आहांत. या अशा माझ्याजवळ बसा नि तुमची सारी कहाणी मला एकदां ऐकवा. " राधा माळणीचा हात ओढीतच पद्मेनें तिला आपल्या जवळ एका बांकावर बसविलेंच, पण राधेच्या डोळयाला आतां धार लागली होती अश्रूंची ! तिला पद्मानें मनमुराद रडूं दिलें.

" पुरे आतां, राधाबाई !–सांगा बरं तुमची हकीकत; पाहुं या मला कांहीं मदत करतां आली तर तुम्हाला ! "

" बाई—पद्माताई ना तुमचं नांव ?—हो, मी तुम्हाला ताईच म्हणेन ! ताई, मला मदत कसली करणार तुम्ही ? पैशाची म्हणाल तर मी आज पोटा-पुरतं मिळवितें. माझा धनी आणून द्याल तुम्ही ?—माझं किती प्रेम आहे त्यांच्यावर ! "

टेलिग्राफच्या तारांवरून पावसाच्या पाण्याचे थेंब ज्याप्रमाणें एकामागून एक सरकतात, त्याप्रमाणेंच तिच्या पापण्यावरून अश्रूंचे थेंब चमकत होते.

" तें कसं सांगूं मी राधाबाई ? पण मला येवढं माहीत आहे कीं जो मनुष्य तुमच्या सारख्या प्रेमळ पत्नीला सोडूं शकतो तो दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीच्या सान्निध्यांत फार दिवस राहूं शकणार नाहीं ! पण भलतीच आशा मी कशी देऊं बाई तुम्हाला ?—पण सांग गडे तुमची हकीकत आतां !

राधेनें एकवेळ आपलें पाण्यानें भरलेलें नाक शिंकरलें, व पदराच्या शेवटानें लाल होईतों स्वच्छ फुसलें; आसपास तिनें एकदां डोकावून पाहिलें.

" इथं कुणी येणार नाहीं ना ताई ? "

" नाहीं—कोऽणी येणार नाहीं; घरची पुरुष मंडळी चार दिवस बाहेरगांवीं गेली आहे घरांत मी एकटीच आहे. "

राधेच्या जीवाला आतां धीर आला.

" ताई, सुधारणा करावयाची ती आमच्या सारख्या टाकलेल्या बायकांत करण्याऐवजीं शिकलेल्या मुलींत करा, असं माझं तुम्हाला हात जोडून सांगणें आहे. " असें म्हणून राधेनें खरोखरीच आपले दोन हात अगदीं कोपरापासून पद्मेपुढें जोडले.

" ताई, काय सांगूं—मी फारशी शिकलेली नाहीं. मला कांहीं सुधारणा कशांत कराव्या, कशांत करूं नयेत याची माहिती नाहीं – पण मला एक असं वाटतं कीं आईबापांनीं आतां आपल्या मुलांमुलींची लग्नं स्वतः करून देण्याचं सोडावं, म्हणजे माझ्यासारख्या स्त्रियांना अशा कष्टमय स्थितींत आयुष्य कंठावं लागणार नाहीं. ताई, माझ्या सुंदरपणामुळेंच हुंड्याची रक्कम न पटवितां मला चांगला बी. ए. पर्यंत शिकलेला पति मिळाला. माझ्या मावस भावाच्या घरीं

मी लहानपणापासून वाढलेली. त्याच्याच वर्गात माझे पति होते, त्यांना सुद्धां त्यांच्या वृद्ध वडिलाखेरीज जवळचं असं कोणीच माणूस नसल्यामुळें, माझ्या लग्नाला हुंड्याबिंड्यांचा प्रश्न आड येऊं शकला नाहीं. ताई, लग्नानंतर माझ्या इतका जगांत कुणाचाहि संसार सुखाचा नसेल असें मला वाटूं लागलें. वकिलीचा अभ्यास करावा अशी तिकडली फार इच्छा. परंतु गरिबांच्या इच्छेचा व सिद्धीचा कधीं मेळ बसला आहे? त्यांनीं एका शाळेंत शिक्षकाची नोकरी धरली. तीहि कायम नाहीं. केव्हां सुटेल याचा नेम नाहीं; तरी पण अशा अनिश्चित स्थितींत सुद्धां आमचा संसार अत्यंत सुखाचा होता. आपल्या मुलाची कमाई खाण्यास मामंजी फार दिवस जगले नाहींत; ताई लग्नानंतरच्या त्या चार वर्षांच्या सुखदायक स्मृतीमुळेंच मला आतां मनाच्या ह्या परिस्थितींत दिवस काढणें शक्य झालें आहे. तुमची सुखाची व्याख्या काय असेल मला माहीत नाहीं, पण त्या चार वर्षांत आमच्याकडे पैसा नव्हता, जमीन ना जुमला, तरी आम्हीं ते दिवस एकमेकांच्या सहवासांत कसे काढले असतील, याची आठवण झाली म्हणजे, तुम्ही सुशिक्षित लोक ज्याला दिव्य प्रेम म्हणून ओरडतां त्या प्रेमाची प्राप्ति आमच्यासारख्या लोकदृष्टीनें विषम असलेल्या पतिपत्नीला झाली होती असें म्हटल्यावांचून माझ्यानं राहवत नाहीं.

ताई, तो दिवस मला पक्का स्मरतो. आपली मध्यम स्थितींतल्या लोकांची पैशाच्या अभावीं किती भयंकर स्थिति होते ग? अपुरी मिळकत; ह्या महिन्याचे पैसे दुसऱ्या महिन्याला दिसावयाचे नाहींत. लोकांपुढें हात पसरायचे नाहींत, आणि आपल्या असह्य स्थितीची जाणीव इतरांना होऊं द्यायची नाहीं. हें त्यांचं ब्रीद! कुणाचं कर्ज काढायचं नाहीं, कीं उधारीनं जिन्नस घ्यायचा नाहीं. हा त्यांचा बाणा!—

"आमच्याकडे पण बाई अस्संच ग!" तिला दुजोरा दिल्यावांचून पद्मेच्यानें राहवलें नाहीं.

"ताई, अशा स्थितींत हातांत जितका पैसा असायचा तोच आपला. त्यांतूनच मीठ भाकरी खायची असाच आमचा दोघांचा निर्धार! पण त्या वेळीं पोटांतली आग प्रेमजलानें निभवितां तरी यायची! त्या दिवशीं असेंच झालें. घरांतलें सर्व धान्य संपलें होतें. सार भातच खावून राहिलों आम्हीं त्या

दिवशीं! सकाळीं शिजविलेल्या भातापैकीं थोडासा भात संध्याकाळसाठीं मी राखून ठेवला. वास्तविक एकाचेंहि पुरें पोट भरलें नसतें त्यानें...तिकडून म्हणायचें झालें.

" हें काय ?–चिमणीचंहि पोट भरणार नाहीं ह्या भातानं ! "

त्यांचं म्हणणं खरं होतं पण काम करून थकून भागून घरीं आल्यावर त्यांची उपासमार होऊं नये-त्यांनींच तो सर्व खावा म्हणून मी एक युक्ति अमलांत आणण्याचा विचार केला. " आज मला मथुराबाईंनीं बोलावलं आहे संध्याकाळीं पुराणाला जायला, मला यायला कदाचित् उशीर झाला तर जेवून घ्यायचं आपण ! त्यांच्याकडेच मी फराळ करणार आहें. "

" बरं ! " ते म्हणाले; पण त्यांच्या बोलण्यांत एक प्रकारची खोंच दिसून आली मला.

संध्याकाळीं ते घरीं येतांच मला म्हणाले.

" अद्याप गेली नाहींस तूं ?–मग जेवूनच जा. मलाही आतां रघुनाथ बरोबर बाहेर जायचं आहे आमच्या एका मित्राकडे जेवायला. " स्वारीनें खरोखरीच कपडे चढविले. एवढ्यांत मथुराबाई नि त्यांचे यजमान रघुनाथराव ही जोडी पायऱ्या चढतांना दिसली. पायऱ्या चढतांनाच रघुनाथराव गर्जले, " कां बुवा आमच्यावर घुस्सा केला आहे नवरा बायकोनं ! म्हटलं तुम्हीं भेटत नाहीं कित्येक दिवसांत तर आपण तरी भेटून यावं ! "

" म्हणजे ! ही आतां तुमच्याकडे यायचं ठरलं होतं ना ? " माझ्याकडे पहात स्वारी म्हणाली.

"—आणि आतां जेवायला मित्राकडे जायचा बेत हें नाहींका तुमच्या कडून ठरवून आले ? " त्यांच्याकडे दृष्टि रोंखीत मी म्हटलें.

" अरेच्या ! हें काय प्रकरण आहे बुवा ! " तीं दोघंहि उद्गारलीं.

ताई, एवढयाशा भाताचा घांस आपल्या माणसाच्या पोटांत जावा म्हणून दोन प्रेमी जीवांची कोण धडपड ! ताई, तुमची सुशिक्षितांची नि सुधारकांची प्रेमाची व्याख्या याहून निराळी आहे काय ग ?

त्या प्रसंगाच्या स्मृतीनें राधा पुन्हां एकदां रडूं लागली.

ताई, ह्यानंतर त्यांना लवकरच विलायतेला जाण्याची संधि मिळाली.

असेच ते एके दिवशीं शाळेंतून मोठ्या गडबडीनं घरीं आले.

" आज एवढ्या गडबडीनं यायचं ? " मी विचारलें.

" फार मोठ्या आनंदाची गोष्ट आहे सांगायची तुला ! "

" कसली ? "

" ती घडून येणं बरंचसं तुझ्यावर अवलंबून आहे. राधी ! " राधी हें नांव त्याचं लाडकं होतं. त्याच नांवानं ते मला पुष्कळदां संबोधित.

" सांगा गडे काय तें ! माझ्या कडून होणार असेल तर वाटेल ते कष्ट करून मी तें करीन. "

" खरंच ? अगदीं मनापासून बोलते आहेस हें ! "

" खरंच नाहींतर काय ?—पहा तरी एकदां परीक्षा घेऊन ! " गंभीरतेचा आव आणून मी म्हणालें.

" राधी, विलायतेला जाऊन शिक्षण शास्त्रांतील उच्च पदवी घेऊन येण्याची संधि मला आली आहे. "

" ती कशी ? "

" एक शिष्यवृत्ति मिळण्याची मला खात्री आहे. घरांतला एक पैसा खर्च करायला नको, एवढी मोठी शिष्यवृत्ति आहे ती, शिवाय शिकून आल्यावर नोकरी कायम, आणि पगारांत वाढ होणार ती वेगळीच !

दारिद्र्याची आंच आम्हांला इतकी लागली होती, गरिबींतील दारूण प्रसंग आम्ही इतके अनुभवले होते कीं दोन पैसे अधिक मिळण्याच्या त्या सुखद आशेनं मी तेव्हांच आनंदसागरांत पोहूं लागलें.

" फार चांगली आहे संधि ! जावं गडे ! ! "

" जा म्हणणं सोपं आहे ! पण तुझ्या पोटापाण्याची व्यवस्था ? "

" उं त्याची चिंता करू नये. मी आपलं पाहून घेईन. हे दोन चार दागिने आहेत उरलेले ते मला उपयोगी पडतील. "

त्यांनाही ह्या कल्पनेनें बरें वाटलें. शेवटीं जाण्याचा निश्चय ठरला. ते येईपर्यंत एक वर्षभर मी आपल्या मावस भावाकडेच राहयचं असं ठरलं. त्याप्रमाणें माझी रवानगी प्रथम करण्यांत आली व ते मुंबईला निघून आले. पण तीच घडी आमचा कायमचा विरह घडून आणील असं मला वाटलं नाहीं.

ताई, विरहाचा काल प्रेमाची वृद्धि करतो म्हणतात. मलाहि त्याचा अनुभव आला. सान्या ह्यातींत मला आपलं असं कोणी नसल्यानें प्रेमाचीं सारीं स्वरूपं पतिप्रेमांतच एकवटलीं होतीं; त्यांच्यावर माझं निस्सीम प्रेम होतं. ताई मी अतिशय भाविक वृत्तीची आहे. देव दिसत नाहीं म्हणूनच भक्तांकडून त्याची निस्सीम सेवा होते, हें तत्त्व मला त्यांच्या विरहानें प्रत्ययास आणून दिलं. दर आठवड्यास मला प्रथम प्रथम नियमानें पत्र येई. एका पत्राचीं आठवडाभर पारायणं आटोपलीं नाहींत तोंच दुसरें हातीं येई. तीं सारीं पत्रं ताई, मी एखाद्या पोथीप्रमाणं नित्यनियमानें अजूनहि वाचतें—त्यांची पूजाहि करतें—तुम्हाला खरं वाटेल हें ? ताई, ताई—वेडी झालें आहे मी त्यांच्या दर्शनाला ! त्यांना मी नको असेन, पण त्यांच्या घराचं अंगण झाडून काढण्यांत समाधान मानीन मी ! हळूहळू पत्रांची संख्या कमी होऊं लागली. दर आठवड्याला येणारीं पत्रं आतां महिन्यांमहिन्यांनीं दृष्टीस पडूं लागलीं. मन हुरहुरायला लागलं ! कां बरं पत्राला विलंब ? परीक्षा जवळ आली असेल ! अभ्यासाच्या धांदलींत असेल स्वारी असं मला वाटायला लागलं—माझी समजूत मी तशी करून घेतली. उगाच आपण अधीरपणानं त्यांना पत्र लिहून अभ्यासावरून त्यांचं चित्त काढूं नये असं मला वाटलं पण महिना गेला—दोन महिने गेले—चार संपले. परिक्षा होऊन गेल्या तरी पत्र नाहीं. ताई, मला अत्यंत काळजी वाटूं लागली. मी भाऊला चवकशी करायला सांगितलें. त्यानें कॉलेजच्या पत्त्यावर एक पत्र लिहिलें. कांहीं दिवसांनीं त्याचें उत्तर आलें. परिक्षेंत ते पास झाले होते, व त्यांनीं तो देश केव्हांच सोडला होता. ह्या एकाच पत्रानें ताई, मला ह्या माणसांनीं गजबजलेल्या जगांत एकाकीपणाच्या जीवनांत आणून सोडलं ! अफाट वाळवंटांत आपल्या हातांतून निसटलेल्या साखरेचा कण कसा शोधणार ? त्यांचा शोध करण्यांत भाऊनें आपली शिकस्त केली. पण मुद्दामच जगाआड होऊं इच्छिणाऱ्या माणसाचा शोध करणं तितकसं सोपं नाहीं. माझ्या मनांत येऊं नयेत असे अमंगल विचार येत. पण मनाला बांध कोण घालणार ? अमर्याद समुद्राला वाळूचा बांध घातल्याप्रमाणेंच होतं तें !

भाउकडला गरिबीचा घांस पण तोहि आतां गळ्याखालीं उतरायला त्रास होऊं लागला. विचार, विचार ! सारा दिवसभर एकच उद्योग, विचार !

विचारानें वेडं होण्याची पाळी आली. भाऊ कामावर गेल्यावर साऱ्या घरांत बोलाचालायला कोणी नाहीं. आपल्या गरिबीमुळें भाऊनें लग्न केलें नव्हतें. बिचाऱ्याचं एकलकोंडं जीवन पाहून मला वाईट वाटे, पण आतां त्याच परिस्थितींत परमेश्वरानं मला आणून सोडलं होतं. मनाला कांहीं तरी विरंगुळा पाहिजे होता. शेजारीं एक माळीण होती. वृद्ध झाली होती ती. तिच्याकडून वेण्या बांधायला मी शिकलें, व तिला बांधून देऊं लागलें. तिच्या कामाला हातभार लावण्याचें श्रेयहि त्यामुळें मला मिळालं, व मनाला दुसरा व्यवसाय मिळाला.

एके दिवशीं भाऊ घरीं आला तो कित्येक वेळ स्वस्थ बसून राहिला. कसलें तरी वर्तमानपत्र वाचण्यांत तो गढून गेला होता. आतांशा त्याचं वर्तनहि माझ्याशीं नीटसं नव्हतं. माझा आधार नाहींसा झालेला पाहतांच त्याच्यावर माझी सर्वस्वी जबाबदारी पडत होती. त्यामुळें त्याची स्थिति केंविलवाणी झाली होती.

" भाऊ, आज चहा नाहीं का घ्यायचा ? आल्यापासून तें वर्तमानपत्र वाचीत पडला आहेस ! "

" नाहीं ! एक बातमी शोधित होतों. "

" कसली ? " उतावीळपणें मी विचारिलें,

" बापू मुंबईत आहे म्हणे ! "

" त्यांना भाऊ नेहमीं बापू ह्या नांवानेंच हांक मारी.

" कोणी सांगितलें ? "

" आज ऑफीसांत एक मुंबईचे गृहस्थ आले होते ते सांगत होते ! "

" मग चल कीं रे भाऊ—आजच निघूं आपण ! त्यांना केव्हां पाहीनसं झालं आहे. "

" ताई, पण ते तुला पाहायला कोठें कबूल आहेत ? "

" कां ?—मी त्यांचा काय गुन्हा केला आहे ? "

" राधाताई, त्यांची अशिक्षित बायको होण्याचा गुन्हा तूं केला आहेस ! "

" म्हणजे ! मी नाहीं समजलें. "

"राधाताई, बापूनें विलायतेहून आल्याबरोबर एका चांगल्या बी. ए. झालेल्या मुलीशीं लग्न केलं आहे!"

विजांसहित जगांतील सारे डोंगर आंगावर एकदम कोसळले असते तरी मी ते सहन करूं शकलें असतें; पण ताई, ह्या बातमीनें शरीरांतील उरला सुरला जीवंतपणा पार गेला. प्रेताचं जीवन जगतें आहे मी आतां! शिकलेली बायको हवी होती त्यांना, मला शिकवितां नसतं कां आलं? पण त्यांना अशिक्षित बायको कामाला राबवायला पाहिजे. आपल्या दासीसारखी ती वागली पाहिजे, यांच्या खुशामती पाळायाला, त्यांच्या हांकेस प्रत्युत्तर देण्याकरितांच केवळ त्यांना माझ्यासारखी अशिक्षित पत्नी पाहिजे असते. शिकलेल्या बायकांच्या हातून गुलामगिरी नाहीं व्हायची! सुशिक्षित बायको त्यांना फिरायला, हिंडायला सभेंत जायला, भाषणं करायला पाहिजे असते! प्रेमासंबंधीं म्हणाल तर पुरुषांचं प्रेम नि वेश्येचं प्रेम सारखंच! आल्या गेल्यावर प्रेम करणं जसं वेश्येला साधतं तसं ह्या अनेक लग्नं करणाऱ्या पुरुषाचं आहे. ताई, आमचं एकमेकांवर किती प्रेम होतं. याचं तुला उदाहरण सांगितलंच. विलायतला जाणं जर मध्येंच आलं नसतं तर त्यांचा नि माझा संसार आयुष्याच्या अंतापर्यंत सुरळीत चालला असता! सुशिक्षित स्त्री पाहिली म्हणजे ताई मला संताप येतो, देहभान नाहींसं होतं!–तूं नाहीं ना ताई, सुशिक्षित?"

पद्मेनें बेछूट नाहीं म्हणून म्हटलें.

सुशिक्षित स्त्रियांनीं दुसऱ्या एका स्त्रीच्या संसारावर निखारे टाकण्यापूर्वी विचार करायला हवा. स्वार्थानें अंध होऊन एका गाईच्या तोंडांतला घांस काढून आपण तो गिळीत बसायचा हा नीचपणा साधायला कां हें शिक्षण मदत करतें? ताई, मी जगाच्या दृष्टीनं अशिक्षित आहें, पण एखाद्या बाईला तिच्या नवऱ्यानं तिला मारहाण केली, दुरुत्तरं केलीं कीं डोळ्यांत टचकन पाणी उभं राहतं! स्त्रीजातीबद्दल स्त्रियांनाच कींव येणार नाहीं तर कोणाला—? ह्या सुशिक्षित अविवाहित मुली, म्हणजे, ताई, विवाहित स्त्रियांना एक नवीनच शत्रू उत्पन्न झाल्यासारखा वाटतो. नवऱ्याची गुलामगिरी, आर्थिक परावलंबन, ह्यांच्या जोडीला हा एक नवा शत्रू. स्त्रियांची सुधारणा तुम्हीं कशी कराल? कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ असंच हें भावी चित्र

दर्शवितं ! ताई मला ह्या वादाशीं कांहीं कर्तव्य नाहीं, त्यांचं दर्शन झालं तर, त्यांच्या नजरेआड सुद्धां त्यांची सेवा करण्यांत मी समाधान मानीन. प्रेमाचे इतर मार्ग मला माहीत नाहीं. ताई, तुम्ही ह्या मुंबईत राहणाऱ्या, मी माझ्या भावाला सोडून ह्या अफाट मुंबईत एकाकी जीवन लोटते आहे. माळणीचा पेशा पत्करला पोट भरण्यासाठीं—कारण तेवढीच कला मला माहीत होती. ह्या पेशांमुळें चांगल्या लोकांच्या पायरीपर्यंत तरी मला स्थान मिळालं ! पाहूं या मला त्यांचा शोध लावतां आला तर ! ताई, त्यांची माझी दृष्टिभेट घडवून द्याल ? एका स्त्रीला तिचं हरवलेलं धन मिळवून देण्याचं पुण्य नाहीं तुमच्या पदरांत पडेल ! तुम्हीही एक स्त्रीच आहांत !

राधेचा शोक आतां अनावर झाला होता.

" अग पण नांव तरी सांग त्यांचं, म्हणजे शोधायला बरं पडेल ! "

" नांव कसं घेऊं ताई ? मी जुन्या मताची बायको ! नवऱ्याचं नांव घेतलं कीं त्याचं आयुष्य कमी होतं असं म्हणतात. ही कल्पनाही आमच्या भोळ्या मनाला सहन होत नाहीं. ताई एक कागद द्या, लिहून दाखवितें. "

पद्मा कागद आणण्यासाठीं उठली, तोंच दारांत मोटार थांबल्याचा आवाज झाला, व दुसऱ्याच क्षणीं दोन चार स्त्रिया पायऱ्या चढूं लागल्या.

" हें ग काय कमल, न कळवतां अगदीं दारांत उभ्या ? "

पद्मेच्या मैत्रीणींच्या अकस्मात् आगमनानें राधेचा प्रश्न तसाच राहिला. राधा उठली. " बरं, ताई, पुन्हां केव्हां तरी येईन मी. " असें म्हणून ती आपली फुलांची परडी घेऊन निघाली.

❦ ❦ ❦ ❦

" ताई ! अहो ताई ! ! " दारांतून डोकावित राधा माळीण ओरडत होती. तिच्या प्रश्नाला कोणीच उत्तर दिलें नाहीं. सर्व घरांत शुकशुकाट राधा वर चढली, व पुढल्याच बैठकीच्या खोलींत तिनें डोकावून पाहिलें. आसपास कोणी नव्हतें. पुन्हां एकदां तिनें जोरानें हांक मारली. मागल्या अंगणांत दूरवर एक नोकर कपडे वाळत घालीत होता. पण त्याचें लक्ष नव्हतें माळणीकडे. राधा दोन पावलें पुढें आली. भिंतीजवळ असलेल्या एका टेबलावर ठेवलेल्या चांदीच्या फोटो फ्रेमकडे तिची नजर जातांच ती आपलं देहभान विसरली. त्यांत तिच्या

पतीचा फोटो होता. " हा इथं कसा ? बरं ताईची नि त्यांची ओळख आहे ? कदाचित् ताईच्या पतीची नि त्यांची मैत्रीहि असेल ! देवाला नि दैवाला आपण उगाच दोष दिला. ताईची नि आपली गांठ घालण्यांत कांहींतरी परमेश्वरी सूत्र आहे खास ! घ्यावा कां आपण फोटो—कां ताईला विचारून घ्यावा ? पण उद्यांपर्यंत थांबायचं ? ताई तर बाहेर गेलेली दिसते ! आपल्याला जेवढी गरज —ह्या फोटोची आहे तितकी ती ताईला भासणार नाहीं—देवाच्या निर्माल्य-प्राप्तीसाठींच भक्तांची कोण चढाओढ चालते ! जगांतील कोणत्याही स्त्रीपेक्षां माझाच हक्क ह्या फोटोवर अधिक आहे. राधेनें एकदां पुन्हां आसपास डोकावून पाहिलें व त्या चांदीच्या फ्रेममधून तो फोटो काढण्याचा प्रयत्न केला. इतक्यांत कुणाचीशी चाहूल लागली. तिनें पुढचा मागचा विचार न करतां झटकन् त्या फ्रेमसहीत तो फोटो आपल्या चोळीच्या कप्यांत ठेवून दिला, व तशीच ती आल्या पावलीं परतली." कृपाघना, ह्या चोरीच्या कृत्याबद्दल मला क्षमा कर." आकाशाकडे पहात हात जोडून ती पुटपुटली.

आणि त्याच दिवशीं रात्रीं—

घरांतील सर्व नोकरांना आपल्यापुढें ओळीनें उभे करून बापूसाहेब विचारीत होते.

" ही इकडली चांदीची फोटोफ्रेम कुणी नेली तें जर तुम्ही सांगणार नाहीं तर देतों साऱ्यांना पोलीसच्या ताब्यांत ! आज फ्रेम गेली, उद्यां एखादा दागिना नाहींसा होईल ! अशी अंदाधुंदी ह्या घरांत चालायची नाहीं समजलांत ! कबूल करा, नाहींतर फटके खावे लागतील चाबकाचे !

" आज मी तर इतं नव्हताच ! आमास्नी काय ठावं ? " एकजण बोलला.

" पांडू कुठं गेला होता ? " गर्जना करून ते म्हणाले.

" मी इतच व्हता !—पण मला कशाला व्होवी ती तुमची फरेमबिरेम ! ती राधा माळीण मातर आली व्हती ! " पांडूनें उत्तर दिलें.

" केव्हां आली होती ? "

" दुपारीं ! "

" किती वाजतां ? "

" ते काय नाय बा ठावं ! "

" कुठं होती ती ? "

" बायसायबानां साद घालीत हतवर आली होती, अन् मी जसा हत आलां तशी बिगी बिगी गेली निगूनशान् ! "

" तिनं कांहीं नेतांना पाहिलंस ? "

पांडू विचारांत पडल्यासारखा दिसला.

" जातांना तिनं हत कायसं घातलं खरं ! " आपल्या छातीकडे हात दाखवित पांडू म्हणाला.

" म्हणजे तुमचं म्हणणं राधीनें फ्रेम चोरली ? " पद्मा मध्येंच म्हणाली.

" वाटेल त्या हलक्या सलक्या आयाबायांना घराची पायरी चढूं दिली कीं हें असंच व्हायचं ! तुम्हां बायकांना पोंच नाहीं कुठल्या गोष्टीचा तो असा ! " आपल्या पत्नीवर सारा दोष लादण्याच्या इराद्यानें बापूसाहेब म्हणाले.

" थांबा, आतांच पोलीस ठाण्यावर प्रथम वर्दी देऊन तिलाच पकडायला लावतों " असें म्हणून बापूसाहेब उठलेही.

" नाहीं ! असलं कांहीं मी करूं देणार नाहीं आपल्याला ! मीच जाईन तिच्या घरीं उद्यां आणि पाहीन खरोखर तिनंच ती फ्रेम चोरली कीं काय ! गरीब झालं म्हणून उगाच एखाद्यावर संशय घेऊं नये. "

❀ ❀ ❀

" कोण, ताई ? "

" होय, मीच ! "

" हें काय ताईसाहेब, माझ्या घरापर्यंत आज कां येऊंसं वाटलं ? " आपल्या दारांत पद्मेला अकस्मात् उभे राहतांना पाहून राधेनें विचारलें.

" राधाबाई,—तुमच्याकडे कांहीं महत्त्वाचं काम आहे ! "

" काय ? "

" काल दुपारीं तुम्ही माझ्या घरीं आला होतात काय ? "

" होय ! "

" मग मला कशा नाहीं भेटलांत ? "

" मी पुष्कळ हांका मारल्या तुम्हाला ताई, पण कोणी उत्तर दिलं नाहीं ! " आतां राधाबाईचा आवाज किंचित् कातर झाला होता.

" तुमच्यावर एक गंभीर आरोप आहे राधाबाई ! खरा न ठरो बाई ! "

" खरा आहे तो—ताई ! "

एखाद्या आरोपीला सोडवावयासाठीं वकिलांनीं जय्यत तयारी करावी आणि त्यानेंच आपला गुन्हा अकस्मात् रोख ठोक कबूल करावा तशीच स्थिति झाली.

अगदीं निर्विकार मुद्रेनें राधेनें पुन्हां म्हटलें,

" खरा आहे आरोप—ताई ! पण मालकानें आपल्या मालकीची वस्तू घेतली म्हणून कोणी त्याला चोर समजत नाहीं. "

" म्हणजे ! ती फ्रेम तुमची ? "

तिला धादांत खोटें बोलतांना पाहून पद्मेला राग आला.

" प्रेमाचा हा मूर्तिमंत पुतळा मी हस्तगत केला असतां तुमच्या त्या चांदी सोन्याच्या फ्रेमीना हो काय आग लावायची ! " असें म्हणून तिनें आपल्या चोळीच्या कप्यांत-अगदीं हृदयाशीं बाळगिलेला आपल्या पतिचा-बापूसाहेबांचा फोटो बाहेर काढला व पद्मेपुढें धरला. ती आतां क्रोधानें लाल झाली होती. जवळच्याच एका पेटींत ठेवलेली चांदीची फ्रेम तिनें बाहेर काढली. पद्मेला शब्द बोलायला तिनें फुरसत दिली नाहीं. क्रोधाचं रूपांतर अश्रूवर्षावांत झालं.

" ताई, अपराधी आहे मी तुमची ! ही पहा तुमची फ्रेम ती चोरण्याचा माझा केव्हांही उद्देश नव्हता ! ताई—माझी शुद्ध भावना ओळखून मला क्षमा कराल ना ? तुम्हांला सारं माहित आहे. स्त्रीहृदयच स्त्रीहृदयाला ओळखतं ! "

राधेनं आपला दर्जा विसरून आपली मान पद्मेच्या खांद्यावर टाकली, व ती स्फुंदून रडूं लागली. पद्मेनेंहि तिला विरोध केला नाहीं.

" ताई, ते तुमच्याकडे येतात कां ? त्यांची माझी एकदां भेट करवाल ?"

" कोण माझ्याकडे येतात ? "

" ज्यांचा फोटो मी चोरून आणला ते ! "

" ते ! ते माझे—नाहीं तुमचे पति ? छे, तें तर त्यांचंच घर आहे ! " आंवढा गिळीत पद्मानें उत्तर दिलें.

" म्हणजे ! मी नाहीं समजलें ! "

" आणखी काय स्पष्ट सांगू ?–राधाबाई, तुमच्या नि माझ्या हृदयांतील परमेश्वर एकच ! अरेरे, राधाताई, तुमची नि माझी गांठ तीन चार वर्षांपूर्वी पडती तर ! "

पद्मेलाही आतां आपल्या मनावर ताबा ठेवतां आला नाहीं. आपल्या पतीनें इतक्या वर्षांत आपल्या पहिल्या लग्नाची चुणुकही आपल्याला दाखविली नाहीं; किती फसवी जात ही पुरुषांची ! ज्या सुधारणा आपण प्रामुख्यानें घडवून आणण्याच्या प्रयत्नाला लागणार होतों, त्याचं काय ? तोंड तरी आहे आपल्याला जगापुढें बोलायला ! ह्या सर्व विचारानें तिचें मस्तक सुन्न झालें. दोघीही कितीवेळ तरी मूक रुदन करीत होत्या.

" ताई, माझ्या सुखाचा ठेवा परत देण्याबद्दल आतां तुमच्यापाशीं मी कोणत्या तोंडानें याचना करूं ? तुमच्या हृदयाचा लचकाच मागितल्यावर तुम्ही कशा जगणार ताई ? "

" तुम्हीं नाहीं कां जगूं शकला राधाताई ? "

" माझ्या जगण्या मरण्यांनं जगाचं नुकसान व्हायचं नाहीं कांहीं, पण ताई, तुम्हीं जगलांत तर माझ्या सारख्या स्त्रीयाचं विश्रांति स्थान व्हाल ! ताई, मी नाद सोडला आतां संसाराचा ! ह्या धंद्यावर मला वाईटबरं आपलं पोट भरतां येतं ! "

" नाहीं, राधाताई, तुमचे मी अक्षम्य अपराध केले आहेत. तरी तुमचं अंतःकरण किती थोर ! तुमच्या मनाला आजपर्यंत झालेल्या क्लेशाला सर्वस्वी मी जबाबदार आहें. काळजी करूं नका राधाबाई आतां ! " राधाबाईच्या पाठीवर वात्सल्यानें हात फिरवीत पद्मा म्हणाली.

" बरं मी येतें आतां. " असें म्हणून ती जायला उठली.

" चोर पकडायला आलें नि शेवटीं मीच चोर ठरलें ! क्षमा कर देवा, ह्या अपराधाबद्दल ! "

त्या सुशिक्षित स्त्रीलाहि परमेश्वराच्या क्षमेची याचना करावीशी वाटली. अपराध होताच तसा घोर !

❦ ❦ ❦

त्याच दिवशीं रात्रीं—

बराच वेळ झाला. बापूसाहेब आपल्या पत्नीची वाट पहात खोलींत आराम खुर्चीवर पडले होते. त्यांना फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. पद्मा आली, पण नेहमीं प्रमाणें बापूसाहेबांशीं न बोलतां तिनें कपाटांतून एक पुस्तक काढलें व ती कोचावर वाचित बसली. आजचा नूर कांहीं भलताच आहे हें ओळखून त्यांनीं तिच्या शेजारीच आसन मांडलें.

" पद्मा, गेली होतीस कां त्या तुझ्या माळणीकडे ?–सांपडला कां चोर ? " त्यांनीं बोलावयास सुरवात केली.

" सांपडला ! आणि आणला ही आहे त्याला इथं ! "

" म्हणजे ! कुठें आहे पाहूं—चला प्रथम त्याचचि व्यवस्था करूं; ह्या गोष्टी वेळच्या वेळींच करायला हव्यात ! " असें म्हणून त्यांनीं पद्मेचा हात धरला.

" हा इथंच आहे चोर ! दुसरं कुठं जायचं कारण नाहीं ! "

" कुठें आहे ? "

" मी चोरी केली आहे ती ! "

" ओहो हो ! कुठल्या तरी नाटकाची तालीम चालली आहे ही ! "

" होय ! जग ही रंगभूमीच आहे. " अतिशय गंभीरपणानें दिलेल्या त्या पद्मेच्या उत्तरामुळें बापूसाहेबांचा थट्टेचा ओघ थांबला.

" पद्मा, सांग ना सारं आतां ! "

" काय सांगू ? मीच चोरी केली ! "

" कसली ? "

" फोटोची "

" कुणाचा फोटो ? "

" आपला. "

" मग तो तुझा नाहीं का ? तूं चोर कशी ? "

" मग तो तसाच तिच्याही मालकीचा आहे ! "

" आपल्याला नाहीं बुवा हे कोडं सुटत ! "

" त्या फोटोंतली व्यक्ति तिच्या मालकीची आहे. "

" कशी ? " भुवयांना जास्तींत जास्त ताण देत बापूसाहेब म्हणाले.

" तिच्या पतीचा फोटो आहे तो ! "

" काय ?—पद्मा तूं शुद्धीवर आहेस ? याचा अर्थ काय होतो तुला माहीत आहे ? "—

" होय, पूर्ण माहीत आहे—आणि तुम्हाला जर माहीत नसेल तर मी फोड करून सांगतें. राधा माळीण तुमची विवाहित पत्नी आहे. "

" काय ! ती माळीण माझी पत्नी ? "

" होय तुमची विवाहित पत्नी आहे ती ! माळणीचा पेशा तुमच्या अधमपणामुळें पत्करावा लागला.

" कुभांड आहे हें माझ्यावर ! पद्मा, तुझ्यामाझ्यांत कलह उत्पन्न करण्याकरितां कुणीतरी कल्पित कथा रचली आहे ही ! "

" कुणी तरी रचली नाहीं,—खुद्द तिनेंच मला हें सारं सांगितलं ! पुरुषापेक्षां स्त्री अधिक पापभीरू असते. धादांत खोटं बोलण्याचं काम स्त्रीच्यानं होणार नाहीं; म्हणूनच पुरुषाच्या शब्दावर अढळ विश्वास ठेवून स्त्रीजात आजपर्यंत फसत आली आहे ! "

" तिनं काय सांगितलं तुला ? "

"—कीं विलायतेला जाण्यापूर्वी तुमचं तिच्यावर प्रेम होतं. तुम्हीं येईपर्यंत बापडीनें किती कष्टांत दिवस काढले, अन्नपाणी वर्ज करून तुमची मार्गप्रतीक्षा कशी केली, केवळ तुमच्यासाठीं भावाचा आश्रय सोडून नानातऱ्हेच्या मोहांनीं भरलेल्या ह्या मुंबईत राहण्याचं धाडस तिला कसं करावं लागलं त्या सर्व गोष्टी तिनें मला सांगितल्या. आणि तो प्रसंग आठवतो कां आपल्याला ? एक घांस दोघांनीं खावून दोघेहि अर्धपोटीं राहण्यापेक्षां तो एकाच्याच कुणाच्या तरी मुखीं पडावा म्हणून तुम्हीं दोघांनीं केलेली ती योजना तुमच्या मित्राच्या व त्याच्या पत्नीच्या आगमनानें फिसकटली. बापू हें सारं खोटंच ? "

आतां रडण्याची पाळी बापूसाहेबांवर आली.

" पुरे, पुरे, पद्मा ! नाहीं ऐकवत पुढें ! " पद्माच्या तोंडावर हात धरीत ते म्हणाले,—" पद्मा, तुझा मी सर्वस्वी अपराधी आहे—मला क्षमा कर. तुझ्याशीं मी भयंकर—भयंकर प्रतारणा केली आहे. क्षमा केली असं म्हटल्या-

खेरीज तुझे पाय सोडणार नाहीं!" एक गुढगा टेंकून एक हात तिच्या पायावर व एक हात आपल्या छातीवर ठेवून कंकणाच्या ऐटींत ते म्हणाले.

"तें सर्व खरं आहे पद्मा! पण तुझ्यावरील प्रेमामुळें माझ्या पहिल्या लग्नाची हकीकत तुला कळविणं मला इष्ट वाटलं नाहीं."

"पण आपल्या प्रथम पत्नीच्या संसाराची चिता धाडधाड जळत असतांना इतक्या स्वस्थ चित्तानं तुमच्यानं माझ्याबरोबर संसार तरी कसा करवला? कां साऱ्याच पुरुषाचीं मनं पाषाणाचीं बनवलेलीं आहेत?"

"पद्मा, नको, मेलेल्याला मारण्यांत काय अर्थ आहे?"

"मग उद्यांपासून तिच्याबरोबर पूर्ववत् संसार करायचा!"

"आपण तिघंहि करूं."

"उं हुं! माझ्याच्यानं तें व्हायचं नाहीं; तसं दोघीपैकीं एकीच्या स्वातंत्र्यावर घाला येणारच! आजपर्यंत त्यांच्या डोळयाआड झालेला आपला संसार, त्यांच्या डोळ्यादेखत होतांना पाहून त्यांच्या जीवांत कांहींच कालवाकालव होणार नाहीं? आजपर्यंत अज्ञानानं केलेल्या ह्या पापाचं क्षालन मला करायलाच हवं! उद्यां राधाताईला तुमच्या स्वाधीन केल्यानंतर मी हें घर सोडणार?"

"काय भलताच हट्ट हा पद्मा! तुझ्यावांचून मी कसा राहूं?"

"तुमच्यावांचून राधाताई कशी राहिली आज पावेतों? आपण कितीही आर्जव केलेत तरी माझं कर्तव्य आतां त्या घरांपुरतं मर्यादित नाहीं. मी आपल्याशीं घटस्फोट करीत नाहीं. आपल्याला केव्हांही माझं दार उघडंच आहे!–पण मी आपल्यापासून–आपल्यावरील प्रेमाच्या मोहापासून दूर दूर जाणार! बी. ए. पर्यंत शिक्षण घेतलं आहे मी. कुठेंहि नोकरी मिळवून पोट भरीन माझं! माझं कार्य आतां फार व्यापक स्वरूपाचं आहे. टाकलेल्या स्त्रियांकरितां मी एक संघ काढीन, त्यांच्या कांटेरी जीवनांत फुलांची लागवड करतां आली तर पाहीन. बापू, तुम्हां सुशिक्षित लोकांना आपल्या विचाराच्या, आपल्या मनासारख्या बायका जर हव्या असतात, तर आपलीं मतं पूर्ण बनण्यापूर्वी ह्याच्या त्याच्या सांगण्यानुसार तुम्हीं लग्नाची घाई कां करतां? टाकलेल्या स्त्रियांची सेवा हेंच माझं कार्यक्षेत्र आहे आतां! मी स्वतःलाहि टाकलेली समजते."

" नाहीं, पद्मा असं म्हणू नकोस ! मीच टाकलेला नवरा आहे. तूं तर माझ्या डोळ्यांत अंजन घालून चाललीसच पण राधा माझा स्वीकार करील ? "

त्या शोकाच्या आवेगांत दोघांनींही आपले उष्ण अश्रू एकमेकांच्या गालांवर ढाळले.

  

" हा पाहिलास तुझ्या पद्मातार्इचा फोटो आला आहे ह्या वर्तमानपत्रांत !" क्रॉनिकलचा अंक राधेला दाखवीत बापूसाहेब म्हणाले.

" पाहूं-पाहूं-कशासाठीं आला आहे ! "

" शेवटीं सुशिक्षित मुलीनंच जिंकलं. राधी ! नवऱ्यानं टाकल्यावर मुळुंमुळुं रडत नाहीं बसली तुझ्यासारखी ! "

तर मी रडत बसलें होतें वाटतं इतकीं वर्षं ? "

" नाहींतर तो माळणीचा धंदा करीत होतीस—तुझ्यासारख्या शंभर माळणींनीं गुंफलेले हार गळ्यांत घालून घेण्याइतक्या योग्यतेला पद्मा पोंचली आहे आज ! पहा, अखिल भारतीय महिला परिषदेची ती अध्यक्ष झाली आहे, "

" अगदीं खरंच ! पाहुं दे तरी डोळे भरून माझ्या पद्मातार्इला !— चला गडे दोन दिवस जाऊं या आपण त्यांच्याकडे ! लाडीकपणानें राधा म्हणाली.

" पाहिलंस राधे, लबाड नवऱ्याला टाकून देण्याची रीत आतां सुशिक्षित स्त्रियांनीं पाडली पाहिजे नि प्रेमासारखं आपलं स्वतंत्र तेज दाखविलं पाहिजे तरच माझ्यासारख्या दुहेरी संसार थाटू इच्छिणाऱ्या नवऱ्यांची वाढत्या सांथीला आळा बसेल. "

" इश्श ! कांहीं तरीच बोलायचं ! ! "

आणि असे वादविवाद त्या दोघांत नेहमी होत.



# सूर्यास्त



मांडीवर असलेलें तें लठ्ठ पुस्तक गरंगळत धाडकन् जमिनीवर कोसळलें. तें सांवरून धरण्याची शक्तिही तिच्या क्षीण हातांत नव्हती. ती एक वृद्धा होती.— पण कालापेक्षां प्रतिकूल परिस्थितीनेंच तिच्या वृद्धत्वाला अधिक मदत केली होती असें म्हटल्यास हरकत नाहीं. अकालीं प्राप्त झालेल्या वार्धक्यानें तिची मूळची सुंदर देहयष्टि आज जरी विकृत झालेली दिसून येत होती, तरी आपल्या यौवन कालांत तिनें आपल्या सौंदर्याची बरीच जोपासना केल्याचीं स्पष्ट चिन्हें तिच्या एकंदर अवयवाच्या रेखींवपणावरून व प्रमाणशीलतेवरून दृष्टीस पडत होतीं.

ती कुणाच्याकडे जायची नाहीं कीं यायची नाहीं, पण सारा गांव मात्र तिच्या एकलकोंडेपणाबद्दल हळहळे, व तिच्या एका हांकेला तिच्यापुढें हजर होई. एवढी छाप तिनें आपल्या प्रेमळ स्वभावामुळें गांवकऱ्यांवर बसविली होती. चार कुटुंबांना पुरून उरेल एवढ्या मोठ्या घरांत तिचें एकाकी जीवन घालवितांना तिला असह्य वाटे; पण म्हणून तिनें कुणालाही आपल्याजवळ ओढलें नाहीं. तरी पण दिवसाचे कांहीं तास सोडून दिल्यास गांवांतील स्त्रियांचा, मुलांचा गराडा तिच्याभोंवतीं पडलेला असावयाचा !

तिच्या जीवनाविषयीं कुणालाच विशेष माहिती नव्हती, व तिच्याबद्दल आदर असलेल्या लोकांकडून तिला याबद्दल विचारण्याचें धैर्यच झालें नाहीं. एकदां असेंच जगाच्या रितीप्रमाणें कुणीतरी तिला त्यासंबंधीं विचारण्याचें धाडस केलें. “ आजीबाई तुमच्या सासर माहेरचं कुणीच नाहीं काय हो ! ”

—पण दुसऱ्याच क्षणीं विचारणाऱ्यास पश्चात्तापांत पडण्याची पाळी आली; कारण त्या प्रश्नानें आजीबाई ज्या आजारी पडल्या त्या आठ दिवस बिछान्याला खिळलेल्या !

—पण तिच्यांत एक विशेष असे. रात्रीचे साडे आठ वाजले कीं ती नेहमीं बागेच्या फाटकापाशीं जाऊन एका विवक्षित दिशेकडे पाहत राहायची ! अगदीं अमावस्येच्या गुडुप अंधारांत सुद्धां तिला तसें पाहतांना कित्येकांनीं पाहिलें आहे.

लोकांना वाटायचें आहे म्हातारपणाची एक विलक्षण लहर!—परंतु भर तारूण्याच्या तिशींत सुद्धां तिला त्याच स्थितींत उभे राहतांना पाहणाऱ्या कांहीं व्यक्ती त्या गांवांत होत्या. पण तिच्या त्या विचित्र वर्तनाचा थांग मात्र कुणालाच लावतां आला नाहीं. म्हातारी सधवा होती, कीं विधवा होती अगर कुमारिका होती याचा पत्ता कुणासच नव्हता. ती एक त्या गांवांतील गूढ होतें.

वेळ संध्याकाळची होती.

आज म्हातारीच्या मनस्थितींत कांहीं तरी बिघाड झाल्याचें स्पष्ट दिसत होतें. ती आपल्या घरापुढील अंगणांत एक खुर्ची टाकून बसली होती. संध्यासमयीं उल्हासित झालेलें आजुबाजूचें वातावरण तिच्यावर कांहींच परिणाम करूं शकलें नाहीं. गांवांतील बालगोपाल मंडळी नित्याप्रमानें तिच्याकडे खाऊ मिळेल ह्या आशेनें आली, परंतु आजीबाईचे डोळे पाण्यानें भरलेले पाहून तशीच परतली. गावांतील चार दोन माळणी आजीसाठीं ताजी भाजी घेऊन आल्या, पण ती कोनाड्यांत नेऊन ठेवण्याबद्दल आजीबाईनीं नुसत्या नजरेच्या खुणेनें सांगितलें. त्यांचीहि दृष्टि तिच्या चेहेऱ्याकडे जातांच त्यांनींहि तिथें थोडा वेळ बसण्याचा आपला विचार रहित केला,

त्याचें असें झालें—

आज दोन प्रहरीं ती आपली रद्दीची पेटी स्वच्छ करीत असतां तिला आज कित्येक वर्षे हरवलेलें आपलें गीतारहस्याचें पुस्तक अवचित् सांपडलें. त्या पुस्तकानें तिच्या पूर्वायुष्यांतील कित्येक बहारीचे प्रसंग पाहिले होते, म्हणून त्या पुस्तकाच्या दर्शनानें तिची पूर्वस्मृति जागृत झाली. ती तें घेऊन आपल्या घरापुढील अंगणांत खुर्ची घेऊन बसली, व आपल्या गतकालचें सिंहावलोकन करूं लागली. पुष्कळदां प्रत्यक्ष सुखापेक्षां त्याच्या आठवणींतच अधिक स्वारस्य असतें !

पुस्तक तेंच ! त्याच्या आयुष्यांत कांहीं फारसा फरक घडून आलेला नाहीं !! रंग, बायंडिंग मात्र किंचित् जुनें पुराणें झालेलें दिसत होतें—आपणहि आज वृद्ध झालों आहोंत—पण काळानें आपल्या जीवितांत किती घडामोडी घडवून आणलेल्या आहेत ! सोसाट्याच्या वाऱ्यानें झाडाचीं पानें टपाटप गळावीं त्याप्रमाणें वृद्धेच्या डोळ्यांतून अश्रूंचे सर गळूं लागले. वृद्धावस्थेंत तरळ झालेली

दृष्टि अश्रूंच्या पाण्यानें अधिकच तरारलेली दिसली. पुस्तकानें करून दिलेल्या पूर्वाश्रमीच्या नुसत्या आठवणीनें, एखादें प्रिय माणूस फार वर्षांनीं अकस्मात् भेटल्यास जी मनाची अनिर्वचनीय स्थिति होई तशीच स्थिति तिची झाली. तिनें त्या पुस्तकासच आपल्या हृदयाशीं घट्ट कवटाळिलें. आपल्या प्रियेच्या अंगावरून वाहणाऱ्या वाऱ्याच्या स्पर्शानेंच स्वतःला धन्य मानून घेणाऱ्या यक्षाप्रमाणें तिची स्थिति झाली होती. तिनें तें पुस्तक एकदां नाहीं दहादां आपल्या दोन्हीं हातांत धरून हृदयाशीं भिडविलें, परंतु जरेनें क्षीण झालेल्या त्या हातांत तो ग्रंथराज सांवरून धरण्याची शक्ति नव्हती. मांडीवर असलेलें तें लठ्ठ पुस्तक गरंगळत धाडकन् जमिनीवर कोसळलें; व त्यांत असलेलीं कागदाची लहानसान चिटोरीं पत्रें अस्ताव्यस्त पसरलीं.

पण एका पिंवळ्या रंगाच्या पाकीटाकडे तिची दृष्टि वेधली, त्यावरील चीरपरिचित अक्षर पाहतांच तिचे अश्रू कोठल्या कोठें पळाले. आपल्या पदरानें तिनें झटकन् डोळे पुसले, व तें पाकीट घारीची झडप घालून उचललें, पोष्टांतून आलें होतें तें! तण अद्याप जसेंच्या तसेंच! आपल्या नांवाचें पाकीट आपण इतके दिवस न फोडतांच तें ह्या पुस्तकांत कसें राहून गेलं याचें तिला अत्यंत नवल वाटलें. तिनें तें मोठ्या चपळाईनें फोडलें. परंतु तसें करतांना तिचे हात भलत्याच वेगानें कांपत होते. आपल्या वाचनांत कोणाच्या येण्यानें अडथळा तर होणार नाहीं ना. ह्या समजूतीनें तिनें रस्त्यावर आसपास कोणी आहे कीं काय हें पाहिलें, व पत्र वाचावयास सुरवात केली.

शांतिसदन
माटुंगा.

प्रिय शान्ता,

'शान्ता' ह्या लाडक्या एकेरी नांवानें तुला हांक मारण्याचा हक्क मी अद्याप घालविला नाहीं असं मी समजूं कां? प्रणयीजनांतील कलहाला इतकें भयंकर शासन असेल अशी माझी कल्पनाहि नव्हती. शान्ता, लाडके, इतक्या क्षुल्लकशा मतभेदाबद्दल मला कायमचा दूर लोटण्या इतकें तुझें अंतःकरण कठोर असूं शकेल? मतभेद कुणांत नसतात? जितक्या व्यक्ती तितक्या प्रकृति!— शिवाय माझ्या म्हणण्याचा साधक बाधक विचार न करतां इतका विपर्यास तूं करावयाचा नव्हता. शांता! माझ्या जीवनाचा आधार तूंच, हें मी एकदां

नाहीं हजार वेळां तुला सांगितलें आहे. लहानपणापासून आईबापाच्या प्रेमाला पारखा झालेला तरुणपणीं चुलत्याच्या कठोर शिस्तीखालीं वागलेल्या मला प्रेमाचें सात्विक व आनंदमय रूप तूंच पटवून दिलेंस. तो प्रसंग तुला आठवतो कां ? काकूंच्याकडे तूं आली होतीस. माझे नि काकांचें दिवसें दिवस पटेनासें होऊं लागलेलें पाहून ते माझ्यांत कांहींतरी व्यंग शोधावयाचेच ! माझ्या चुलत भावाशीं–शामशीं तुझा विवाह व्हावा असें काकांना वाटे, पण माझ्याकडे असलेला तुझा नैसर्गिक ओढा पाहून त्यांनीं तुझ्यासमोर माझी निंदा करावी,— आणि त्या दिवशीं तर तूं खडसून सांगितलेस, " काका, दुनियेंतील व्यसनं सारीं जरी दिवाकरांना लागलेलीं असलीं तरी मला ते प्रिय आहेत, मान्य आहेत. " शांता, हा प्रसंग तुला आठवतो ना ? माझ्या स्वभावाची इतकी खात्री असतांना, आतांच्या तुझ्या या ह्या सहानुभूतिशून्य अशा वर्तनाचा अर्थ मी कसा लावूं ?—तेव्हांपासून मला काकांचा आश्रय सोडावा लागला—पण तुझ्या प्रेमसामर्थ्यावरच मी आतांपर्यंत स्वतंत्र राहूं शकलों. शांते ! अशी मला धिक्कारूं नकोस ! तुझ्या प्रेमळ सहवासांत माझ्या आयुष्यांत संकटांचे जरी डोंगर कोसळले तरी मला ते पुष्पांच्या नाजूक वृष्टीप्रमाणेंच वाटतील. शांता ! अशी निष्ठूर होऊं नकोस ! माझ्या मित्रांशीं बोलूं नकोस असें सांगण्याचें कारण तुझ्यावरील माझा अविश्वास नसून हेच मित्र म्हणविणारे लोक केव्हां केव्हां आपल्या संबंधीं गैरसमज पसरविण्यास कारणीभूत होतात—आपले हितशत्रू बनतात, म्हणूनच त्यांच्यापासून चार हात दूर रहा असें सांगण्याचा माझा हेतु होता. पण विवाहानंतर मी तुला एखाद्या अशिक्षित पत्नीप्रमाणें वागवीन–माझ्याच विचारानें चालवीन, तुझ्या मतांना किंमत देणार नाहीं अशी व्यर्थ शंका ह्या क्षुल्लकशा कारणानें आली. शांता ! बंधन, बंधन म्हणून लग्नासंबंधीं तुम्ही सुशिक्षित स्त्रिया जी ओरड करतां त्या बंधनांत शिरण्याची तुमची इच्छा नसते–तें बंधन इतकें कठोर आहे काय ? पत्नी प्रमाणेंच पतीलाही आपल्या पत्नीचें बंधन नसतें असें तुम्हांस वाटतें काय ? बंधनं हीं परस्परांनीं मानायचीं असतात. तीं एकमेकांवर बळेंच लादून चालत नाहींत.— आणि बंधनावांचून जगांत काय आहे ? पण इतर सर्व बंधनांपेक्षां वैवाहिक बंधन अत्यंत पवित्र व लोभनीय असेंच आहे. शांता ! त्या दिवशीं आपल्या मैत्रिणीबरोबर उत्तर हिंदुस्थानच्या प्रवासास गेलीस, त्यावेळीं वास्तविक तूं

कुठेंहि जाण्यास स्वतंत्रच होतीस. मग आठ दिवसांकरितां माझ्या पासून दूर जातांना माझ्या परवानगीची जरूर तुला कां वाटली ? तूं तशी गेली असतीस तर मला कोणत्याही तऱ्हेनें तुला कायदेशीर अडथळा करतां येणें शक्य नव्हतें. मग तें बंधन माझ्या इच्छेचें बंधन तूं आपण होऊनच पत्करलेंस ना ?

जाऊं दे ! शांता, मागच्या साऱ्या गोष्टी आपण विसरूं या. मला तूं पुन्हां प्रसन्नमुखानं तुझ्या सन्निध स्थान देशील ना ? ह्या प्रेमयुद्धांत मी सर्वस्वी पराजित झालों असें मी कबूल करतों. मग तर तुझ्या मनासारखं होईल ना ? कठोर वृक्षाच्या अंतरंगाचा ठाव काढणाऱ्या पण कोमल कमलपुष्पाच्या एक सूक्ष्म तंतूलाहि धक्का न लावणाऱ्या भृंग्यासारखी पुरुषांची जात असते. हें मी तुला शांता, साऱ्या पुरुष वर्गाच्या वतीनें सांगतों आहे. माझ्या अहेतुक बोलण्यानें तुझ्या कोमल भावनांना धक्का बसला याबद्दल मी तुझी सहस्रदां क्षमा मागतों. शांता, पुरुषांना स्त्रीच्या नाजूक पण तितक्याच बळकट अशा बंधनांत राहावयास आवडतं. मी वाटेल तिथं बेछट भटकलों तरी माझ्या वागण्यानं शांताला काय वाटेल ही हुरहुर मला वाटावी असंच मला वाटतं !—बायकोपासून आपलें व्यसन लपविण्याची बुद्धि पुरुषांत कां उत्पन्न होते ? आपल्या पत्नीच्या मनाला दुःख होऊं नये, तिच्या दृष्टीनें आपण निर्व्यसनी दिसावें म्हणूनच ना ? हें एक नैतिक बंधनच नव्हे काय ?

शांता, किती लिहूं ? माझं हृदय कसं उघड करून तुला दाखविलं असतां माझ्या सात्त्विक प्रेमाबद्दल तुझी खात्री होईल ? ' क्षमा केली ' एवढ्या दोनच शब्दांची तुझ्याकडे मी याचना करतों. तुझ्या शब्दावरून मी शेंकडों कोसावरून गरूडाच्या वेगानें तुझ्यापुढें सादर होईन. शांता, ह्या प्रेम विरहाच्या संवेदनांच्या तारा तुझ्या मनावर आघात नाहींत कां करीत ? तुझ्या ह्या पांच महिन्यांच्या विरहानं माझं पन्नास वर्षांचं आयुष्य घटत चाललं आहे असं मला वाटलें !

शांता, तुझ्या प्रेमळ पत्राची वाट पाहूं ?

सर्वस्वी तुझाच
दिवाकर.

पत्रावर तीस वर्षांपूर्वीची तारीख होती.
पत्रांचा शेवट वृद्धेनें कसाबसा वाचला.

अरेरे ! किती आपण दुर्दैवी ! ! किती भयंकर गैरसमज ! ! ! दिवाकर, तुम्ही काय म्हणाला असाल माझ्यासंबंधानं !

तीस पस्तीस वर्षांपूर्वीचे प्रसंग वृद्धेच्या नजरेपुढून एखाद्या चित्रपटाप्रमाणें सरकू लागले.

सबंध जगांत आपण नि आपली मावशी, दिवाकरांच्या चुलत्याच्या घरीं आपण आपल्या मावशी बरोबर जेव्हां प्रथम पाऊल टाकलें, त्यावेळीं एका फोटोनें आपण इतके आकर्षिलें गेलों कीं मावशी किती वेळ तरी आपल्यामागें उभी राहून आपल्याकडे कौतुकानें पाहत असल्याचें आपल्याला कळलेंही नाहीं.

" शांतु, दिवाकरला माळ घालण्याचा विचार आहे कीं काय ? " मावशीच्या ह्या प्रश्नानें आपण किती किती लाजलों !-पण किती गोड होतें तें बोलणें! तेव्हांपासून आपण दिवाकरकडे एका विविक्षित दृष्टीनें पाहूं लागलों—पण आपल्या प्रेमाचं प्रत्युत्तर आपल्या मनासारखं मिळेल का ही हुरहुर आपल्याला लागली, पण आपणाला एखाद्या कादंबरीच्या नायिकेप्रमाणें शेवटच्या प्रकरणापर्यंत थांबावं लागलं नाहीं.

दिवाकरांचें येणें आपल्या घरीं वाढलें. कांहींना कांहीं निमित्तानें ते मावशीकडे यायचे. आपल्या घरांतही कोणीं पुरुष माणूस नसल्यामुळें मावशींना त्यांचा बराच उपयोग व्हायचा !

एके दिवशीं आपण लवकरच कॉलेजमधून आलों होतों. पण मावशींना त्याचा पत्ताहि नव्हता. दिवाकरांशीं बोलत ती बसली होती. त्यांची इंजिनिअरींगची परीक्षा नुकतीच आली होती. त्या दोघांच्या बोलण्यांत आपल्या नांवाचा उल्लेख होतांच आपण आडून ऐकूं लागलों अशी मावशी सांगत होती.

" दिवाकर, मोठी पंचाईत उत्पन्न झाली आहे. तुमच्या काकूंनीं तुमच्या शामसुंदरसाठीं शांतीची मागणी घातली आहे. "

पण एवढ्या वाक्यानें दिवाकरांचें तोंड खर्कन् उतरलेलें आपण चक्क पाहिलें. मावशीच्या खोलींत असलेल्या आरशांतून मला सर्व दिसे. मावशी पुढें म्हणाली—

घर चांगलं आहे दिवाकरपंत !-पण मुलगा कांहीं मला तितकासा पसंत नाहीं. माझं एक मत जरी सोडून दिलं तरी शांतीला कांहीं तुमचा शाम पसंत पडायचा नाहीं अशी माझी खात्री आहे. "

" मग नाहीं म्हणून सांगा चक्क ! " दिवाकरांनीं मोठ्या उत्साहानें उत्तर दिलें. त्यांच्या तोंडावरील मलुलता आतां कोठच्या कोठें नाहींशी झाली होती.

" नाहीं म्हणणं तितकसं सोपं नाहीं, दिवाकर ! त्यांचं मी देणं आहे थोडंसं ! "

" असं कितीसं देणं आहे मावशी ? "

माझ्याप्रमाणें दिवाकरहि मावशीला ' मावशी ' ह्या नांवानेंच संबोधित.

" आहे तीन एक हजार ! "

" ऊं ! कांहीं विशेष नाहीं. "

" तुमच्या दृष्टीनें नसेल कदाचित् विशेष, पण आमच्या घरांत कमावतं पुरुष माणूस कोणी नाहीं हें तुम्हीं पाहात आहांच ! शिवाय शांतूचं शिक्षण अद्याप एक वर्षभर व्हायचं. आज जर मी तुमच्या काकांना नकार दिला तर त्यांच्याकडे गहाण ठेवलेलं हें त्यांच्या तावडींतून सुटायची आशाच नको. आमच्या माणसांनीं हा व्यवहार केला. व्यवहार करणारीं माणसं निघून गेलीं पण मागं राहिलेल्या आमच्यासारख्या बायकांना हें निस्तारतां पुरे वाट होते ! " आपल्या पतीच्या आठवणीनें मावशीच्या डोळ्यांत अश्रू चमकावयास लागले. विषय बदलण्यासाठीं दिवाकर म्हणाले.

" तें जाऊं द्या मावशी ! आतां आपल्यापुढें जी परिस्थिति उत्पन्न झाली आहे तिचा प्रथम आपण विचार करूं. समजा, मीच तुमचें तेवढें कर्ज काकांना देऊन टाकलें तर ! "

" अगबाई तुम्हीं ! म्हणजे आमचें कर्ज कांहीं फिटलं नाहींच ! तुमचं ऋण राहणारच किनई ! "

" होय, पण त्या ऋणाच्या मोबदल्यांत मीही शांताची मागणी करीन अशी भीति वाटते कीं काय मावशी तुम्हांला ? "

मावशीनें एक सुस्कारा सोडला.

" कुठें आहे एवढं शांतीचं भाग्य थोर ! "

" पण मी म्हणतों मावशी. शांताची मागणी ज्याला घालतां येईल त्याचंच भाग्य थोर ! "

" थट्टा करूं नका दिवाकरपंत ! "

" तुम्हांला थट्टा वाटते ही मावशी ? थट्टा वाटत असेल तर मी खरोखरीच

तुमच्या शांतीची मागणी घालतों. शांतासारखी सुशिक्षित, सुविनित व सुंदर पत्नी मिळणें ही कांहीं लहानसान भाग्याची गोष्ट नाहीं. मात्र काकांच्या संपत्ति-पैकीं मला एक कपर्दिकहि मिळावयाची नाहीं अं मावशी ! ”

किती थोर आणि उदार अंतःकरण त्याचं !

पुढील संवाद ऐकण्यास आपण थांबलों नाहीं. त्या दिवसासारखा निर्भेळ आनंद आपल्या साऱ्या आयुष्यांत आपण क्वचितच उपभोगिला असेल !

एखाद्या कल्पित कथेप्रमाणें आपल्या वाङ्‌निश्चयांत अनेक अडथळे येतील अशी जी भीति अलिकडल्या अविवाहित मुलींना वाटत असते, तशापैकीं कांहींच अडथळे न येतां आपला वाङ्‌निश्चय मावशीनें किती कौतुकानें घडवून आणला !

— परंतु कांट्यानीं भरलेल्या ह्या जगाच्या आवारांत गुलाबांचीं फुलें हाताला क्वचितच लागावयाचीं ! एकापेक्षां अधिक माणसांचा आधार मला लाभूं नये. अशीच ईश्वरी इच्छा होती, असें दिसतें. कारण लहानपणीं आईवडिलावाचून अनाथ झालेल्या मला मावशीनें सनाथ केलें, व आतां दिवाकरांचा कायदेशीर आश्रय मिळण्याचें ठरतांच आपल्या विवाहापूर्वींच मावशीनें हा मृत्युलोक सोडला.

जगाच्या दृष्टीनें वाईट दिसेल म्हणून मावशीच्या मृत्युनंतर कांहीं दिवस तरी विवाह लांबविणें भाग पडलें. लोकदृष्ट्या दिवाकरांना आपल्या घरांत राहणें अयोग्य दिसलें असतें, तरी सुद्धां दिवसाचे बहुतेक तास आपल्या सान्निध्यांत दिवाकर घालवित.

मावशीच्या मृत्यूनंतर आपल्याला घरांत एकटीलाच वावरतांना पाहून शामसुंदरनें आपल्या घरीं दिवाकराच्या निमित्तानें यावयास सुरवात केली. दिवाकरांशीं झालेला आपला वाङ्‌निश्चय वास्तविक त्याला मुळींच रुचला नव्हता. त्याच्या कारवाईमुळेंच दिवाकरांना आपल्या चुलत्याचें घर सोडावें लागलें होतें; परन्तु आपल्या विवाहाचें लांबणीवर पडलेलें ऐकतांच त्याला किती आनंद झाला ! त्याचे त्या दिवशीं काढलेले उद्गार आपण केव्हांच विसरणार नाहीं. तो म्हणाला—

“ शांतु—तुझं लग्न लांबणीवर पडल्याचं ऐकतों. बाकी खरंच ! मावशीच्या मृत्यूला एक दोन वर्षं लोटल्याखेरीज तूं लग्न करणं कांहीं योग्य दिसणार नाहीं ! आणि हें पहा, एक गोष्ट तुला सुचविली तर रागवशील कां ? ” असा प्रश्न विचारून आपल्या उत्तरासाठींहि न थांबता तो बोलूं लागला.

“ शांता ! तुम्हां स्त्रियांना आपल्या जातीविषयीं अभिमान नाहीं म्हणूनच पुरुषांकडून तुमचा अपमान होतो. तुमच्या हक्कांची पायमल्ली होते.

" कशी ? "

" आतां हें तुझंच उदाहरण घे. दिवाकर भाऊच्या जागीं जर तूं असतीस अन् तुझा कोणाशीं विवाह जमल्याबरोबर तुझ्या पतीच्या कुटुंबांतील एखाद्या प्रमुख माणसाचा मृत्यू घडून आला असता तर नवीन सून पांढऱ्या पायाची आहे असं लोक समजले नसते का ? "

" बरं मग ? "

" मग काय—तुम्ही स्त्रियांनींही उलट पुरुषांविरुद्ध तेंच बंड पुकारलं पाहिजे. दिवाकराचा नि तुझा वाङ्‌निश्चय होऊन पुरते चार महिनेही लोटले नाहींत तों मावशी वारल्या म्हणजे ह्या गोष्टीला तूं विचार करावयास नको का ?"

" म्हणजे मी दिवाकरांना पांढरे पायाचे अपेशी समजून त्यांच्याशी केलेला वाङ्‌निश्चय मोडावा असेंच तुमचें म्हणणें ना ? "

" होय, जवळ जवळ असेंच ! "

" पण शामसुंदर—सुनेचे पायगुण पाहतात याचं कारण ती दुसऱ्या कुटुंबांत जायची असते. उद्यां जर जांवईच सासरीं जाऊन राहण्याची रूढी पडली तर मुलाचा पायगुण पाहतील तुमच्या समजुतीप्रमाणं ! तें कांहीं असलं तरी असल्या संकुचित मतांना मी मुळींच किंमत देत नाहीं. तेव्हां मुळीं प्रश्नच राहत नाहीं तुमच्या सूचनेचा ! "

आपल्या ह्या उत्तरानें शामसुंदरच्या चेहेऱ्यावर निराशेची छाया आपल्याला स्पष्ट दिसून आली.

—आणि एकाच महिन्यानी !

शामसुंदरचा आपल्याकडे येण्याचा क्रम सुरुच होता. हळुहळूं शामसुंदरचे कांहीं मित्रही त्याच्या बरोबर येऊं लागले. त्यांतील कांहीं कॉलेजांतील आपल्या परिचयाचे होते, पण मावशी असतांना एकालाही आपल्याशीं परिचय करून घेण्याची इच्छा झाली नाहीं. मावशी जाऊन घरांत आपण एकटी वावरूं लागतांच साऱ्यांना आपल्या मैत्रीची आवश्यकता वाटूं लागली. आपल्या उदार मताचा त्या सर्वांनीं फायदा घेतला हें उघड होतें; परंतु अविवाहित मुलीशींच मैत्री करायला हीं मुलं कां हपापलेलीं असतात ?

आयुष्यांतील त्या अमंगल सायंकाळीं आपले पुरुषमित्र दिवाकरांची वाट पाहत असेच बसले होते. शामसुंदर मात्र त्या दिवशीं मुळींच आला नव्हता.

रात्रीं आठ वाजले तरी दिवाकर आले नाहींत, आणि हा पुरुषांचा घोळका इतक्या रात्रींहि आपल्या घरांत बसलेला आपल्याला कांहीं आवडला नाहीं. परंतु त्यांना ' जा ' सांगणें शिष्टाचाराविरुद्ध होतें. एवढयांत साडे आठ वाजले व दिवाकरांचीं पावलें बाहेर वाजलीं. त्यांना पाहतांच त्यांची मित्रमंडळी सामोरीं जातील अशी आपली कल्पना होती, परंतु आपला डोळा चुकवून ते सर्वजण मागच्या वाटेनें केव्हांच पळाले. दिवाकरांना पाहिल्यावर प्रथम चुलीवर चहाचें आंधण नित्याप्रमाणें टाकावें म्हणून आपण आंत जातांच तो कंपू पळाला होता परंतु त्यांच्या हेतूचा बोध आपल्यास तेव्हां झाला नाहीं. आपल्या मागोमाग दिवाकर आंत येतील अशी अपेक्षा असल्यानें आपण काम करतांनाहि तेवढ्या वेळांत हजारदां मागें वळून पाहिलें असेल, पण व्यर्थ ! दिवाकर आंगणांतच खुर्ची टाकून बसले होते. जीव राहीना ! चहाचें आंधण तसेंच चुलीवर ठेवून आपण चोर पावलांनीं दिवाकरांच्या मागें गेलों, व त्यांच्याच विनोदाचा अवलंब केला. आपण त्यांचें डोळे गच्च झांकले.

आणि दुसऱ्याच क्षणीं—

एखादा विंचू अनपेक्षित रितीनें आपल्या अंगावर चढावा नि तो आपण जितक्या वेगानें झटकावा, त्या प्रमाणेंच आपले हात जोरानें—अगदीं निष्ठुरपणें झटकण्यांत आले. आपण थक्क झालों. हें कांहीं प्रेमाचें स्वरूप नाहीं अशी खात्री पटली.

" आंत नाहीं कां यायचं दिवाकर ? "

" नाहीं ! "

" कां ? "

" यापुढं ह्या घराची पायरी चढायची नाहीं हेंच मला सांगायचें आहे तुला.

" कां ? "

" गावांतल्या टारगट पुरुषांना तुझं दार उघडं असतं म्हणून ! शामच्या सांगण्यावर माझा विश्वास नव्हता पण आज—आतां प्रत्यक्षच पाहिलं ! "

" काय पाहिलं ? "

" कसे गोंधळ घालीत बसले होते इथं—आणि मला पाहतांच मागल्या वाटेनं पळून जाण्याचं कारण काय त्यांना ? "

" याचं उत्तर मी कसं देऊं ? आपलेच मित्र ते ! आणि शामसुंदर

त्यांच्यात असतो आणि त्यानं तुम्हाला असं सांगायचं कारण ?" ह्या सर्व गोष्टीच्या बुडाशीं शामसुंदरचा कांहीं गूढ हेतु असावा असा आपल्याला संशय आला. कदाचित् दिवाकरांच्या दृष्टीनें आपण पापी ठरावें म्हणून त्याचे हे प्रयत्न असावे ! कारण विरण मी जाणत नाही. पण आज प्रत्यक्षच जें मी पाहिलं त्याचं स्पष्टीकरण तूं काय करणार ?"

"तुमचे मित्र—तुम्हांला भेटायला इथं जमतात !—शामसुंदर तुमचाच भाऊ—त्याला बंदी करण्याचं मला कारण ? आपल्याला जर ते नको असतील त्याचं इथं येणं पसंत नसेल तर तसं त्यांना स्पष्ट सांगावं !"

"मी कोण सांगणार ? घर तुझं ! तूंच सांगितलं पाहिजेस. ते कांहीं केवळ माझ्या खातर येत नाहीं इथं—तुझ्याशीं हंसायला येतात समजलीस ! आणि त्याला तुझंहि उत्तेजन दिसतं !"

"Stop that rubbish !" पुढील शब्द ऐकणें अशक्य झाल्यामुळें आपण दिवाकरांना दुरुत्तर केलं.

"तुमच्यांत आणि एखाद्या रानटी नवऱ्याच्या [illegible]आचरणात मुळींच फरक नाहीं.

"माझी विचारम्[illegible] राहू दे ! सारा गांव कांहीं डोळे झांकून बसला नाहीं. मी कुठेंहि गेलों तरी जो तो माझ्याकडे पाहून हंसतो."

"साऱ्या गांवाच्या कुचेष्टेवर विश्वास आहे आपला ?"

"गांवावर एकवेळ विश्वास ठेवला नाहीं तरी माझ्या गैरहजिरींत मजा मारणारे जर आपल्याच तोंडीं आपल्या कृत्यांची कबूली देतात तर— !"

"काय—कोण कबूली देतं ?—आणि मी एवढी जीव तोडतोडून माझ्या प्रामाणिकपणाची ग्वाही देतें त्याचं कांहींच नाहीं ! सारा गांव नि तुमचे ते मित्र तुम्हांला खरे वाटतात ! जा, सारे पुरुष ढोंगी नि आपमतलबी असतात ! जा, दिवाकर, मला तुमच्याशीं लग्न कर्तव्य नाहीं ! लग्नाच्या आधींच आपल्या मतामतांच्या लहरीवर हेलकावे खावून राहणारी मी दुबळी स्त्री नाहीं. इतक्या महिन्यांच्या सहवासानंतरहि ज्यांच्या मनांत माझ्याबद्दल अविश्वास राहूं शकतो त्यांच्या आयुष्याची सहचारिणी होण्याचें माझ्यानें झेंपणार नाहीं ! दिवाकर शेवटीं पुरुष जातीवरच गेलांत ! तुमचें शिक्षण, तुमच्या संस्कृति तुमच्यावर कांहींच परिणाम करूं शकल्या नाहीं."

एवढें बोलतांना आपलें आंग क्रोधानें नुसतें जळत होतें—कांपत होतें. साऱ्या जगानें आपल्याला कुचरित म्हणून धिक्कारलें असतें तरी त्याची फारशी पर्वा आपण बाळगिली नसती. परंतु ज्यांच्यावर आपला पूर्ण विश्वास, ज्याच्यावर आपल्या पुढील जीविताची जबाबदारी आपण सोंपविणार तो मनुष्य आपली बाजू ऐकावयाला, आपल्या शब्दावर विश्वास ठेवायलाहि तयार नाहीं हें पाहून कोणत्या सूज्ञ स्त्रीला संताप येणार नाहीं ? आपल्यालाहि तो आला. क्रोधाच्या भरांत आपण दिवाकरांचा धिक्कार केला नि तडक आंत गेलों.

त्याच दिवशीं त्यांनीं आपल्याला भेटीदाखल तें गीतारहस्याचें पुस्तक आणलें होतेंसें दिसतें; कारण तें तसेंच आंगणांत पडून होतें. तेव्हांपासून क्रोधाची छटा कमी होतांच—

आपण आज तीस वर्षें किती मनस्तापांत काढलीं ! ह्या सर्व आठवणीनें वृद्धेचें चित्त क्षुब्ध झालें. तें पत्र तिनें पुन्हां पुन्हां वाचलें. हृदयाशीं धरलें. त्याचें कित्येकदां चुंबन घेतलें. " दिवाकर ! तुमचं हृदय किती थोर ! माझ्या वागणुकींत तुम्हांला किती मनस्ताप झाला असेल ! आपलं पत्र आज तीस वर्षांनीं माझ्या हातीं पडतें आहे - मिळालं आहे. पांच महिने आपण कोणत्या मनस्थितींत घालविले याचं दिग्दर्शन हें पत्र करतं ! देवा, याहून दुर्दैवाचा विलास कुणी ऐकला असेल-पाहिला असेल—अनुभवला असेल असं मला वाटत नाहीं ! दिवाकर तुम्ही निघून गेल्यावर क्रोधाचा पारा अंशतः उतरतांच, माझा जीव किती हुरहुरला !—सारी लज्जा सोडून धांवत आपल्याकडे यावं नि आपले चरण घट्ट धरावे असं मला वाटलं !—दिवाकर, माझ्या उत्तराची आपण किती मार्गप्रतीक्षा केली असेल ! शेवटीं माझ्याकडून उत्तर न गेल्यामुळें तुमची निराशा झाली असेल. एकदां प्रेमानं सांधलेलीं आपलीं ही हृदयं एक-मेकांचा चक्काचूर केल्यावांचून कां निखळणार आहेत ? आपल्या प्रणयलीलांची पूर्ती करण्यासाठींच पुरुषांना आपल्या नादीं लावणारी मी एक Flurt आहे अशीच तुमची समजूत झाली असणार ! दिवाकर, आज तीस वर्षांच्या दीर्घ-कालानंतरहि तुमच्या प्रेमाचें मूळ ह्या जीर्ण झालेल्या व शुष्क हृदयांत कसें जीव धरून राहिलें आहे हें जर मला तुम्हांला दाखवितां आलं असतं तर—! दैव ! किती क्रूर खेळ दैव खेळत असतं ! एखाद्याच्या आयुष्याची सरळ चाललेली गाडी एका रुळावरून दुसऱ्या रुळावर नेऊन सोडण्यांत किती कुशल ! ! "

वृद्धेच्या जरा जर्जरित नेत्रांत अश्रूंचा पूर सारखा लोटत होता. तिनें कांहीं तरी निश्चय केला. एकसारखे दोन तास बसून ती एक पत्र लिहीत होती. रात्रीं शेवटच्या गाडीनें तरी तें पत्र जावें ह्या उद्देशानें तिनें नोकराला पैशाचें आमिष दाखवून तितक्या रात्रीं त्याला तिनें पत्र घेऊन स्टेशनवर पिटाळविलें.

  

आज दोन तीन दिवस झाले. वृद्धा चिंताक्रांत होती. रात्रीं अंधार पडेपर्यंत ती सारखी दारांत बसलेली असे. आपल्या घराच्या दारांत बसून सूर्यास्ताचा रमणीय देखावा पाहण्याचा तिला मनस्वी नाद होता. अर्ध्या गांवाला हें माहीत होतें, यामुळें लोकांना वाटे ती सूर्यास्त पाहण्यासाठीं बसली असावी. पण आजचा तिचा हेतु सूर्यास्त पहाण्याचा नव्हता--सूर्यास्त होण्यास अद्याप पुष्कळ अवधि होता. कुठल्या तरी पत्राची ती वाट पाहत असावी. टपालवाला दूर दिसला कीं धांवतच ती बागेच्या फाटकापर्यंत जाई. नेहमीं पेक्षां आज तिला फारच हुरहुर वाटत होती. दिवाकराच्या तीस वर्षांपूर्वीच्या पत्राला तिनें दोन दिवसापूर्वी उत्तर लिहिलें होतें; व त्यांच्या कडून प्रत्युत्तर येण्याची ती मार्गप्रतिक्षा करीत होती. चार वाजले, तरी आपल्या नांवाचें पत्र नाहीं. तिच्यानें राहवेना. आपल्या दारावरून टपालवाल्याला तिनें शेवटीं विचारलें.

" माझ्या नांवाचं नाहीं कांहो पत्र ? "

" नाहीं आजीबाय ! "

वृद्ध शांताबाई निराश झाली.

आतां पांचाची एकच डाक राहिली होती. आज तिनें—सत्याग्रहच करावयाचें ठरविलें. बागेच्या फाटकावर हात ठेवून ती उभी राहिली. आपल्याला पत्र मिळेपर्यंत येथून हलावयाचेंच नाहीं असाच जणुं तिनें निश्चय केला होता.

सूर्य क्षितिजा खालीं खालीं जात होता. त्याचीं सोनेरीं किरणें वृद्धेच्या पांढऱ्या शुभ्र केसांना सुवर्णांकित करीत होतीं. पश्चिमेकडे सूर्याच्या मावळत्या किरणांना न जुमानतां ती आपले डोळे विस्फारित करून टपालवाल्याकडे पहात होती. पांचाला स्टेशनवर टपाल येतं, आपल्या हातीं तें यायला फार तर साडे पांच सहा होणार ! हा एकच आशातंतु तिला सुखवित होता.

चरावयास गेलेले गुरांचे कळप गावांत परत येऊं लागले होते. त्यांच्या चौफेर

धांवत येण्यानें चहुंकडे धूळ उडून मावळत्या सूर्याचीं सोनेरी किरणें धूसर दिसत होतीं, व त्या धुसर प्रकाशांत दुरुन एक टपालवाल्याची अस्पष्ट छाया गांवाकडे येतांना दिसत होती. वृद्धेच्या डोळयांत तारुण्याचें तेज चमकलें. डोळया आड हात धरून, सूर्यप्रकाशाला टाळीत ती ती आकृति पाहूं लागली. होय, तो टपालवालाच होता. पण त्याची चालण्याची गति आज किती मंद !

वृद्धेच्यानें राहवेना. ती सडकेवर टपालवाल्याला सामोरी गेली. " आजीबाई ! आलं एकदाचं तुमचं पत्र ! हें घ्या ! " तिच्या हातीं पत्र देऊन टपालवाला पुढें निघून गेला.

घरीं जातांच दिव्याच्या उजेडांत म्हातारीनें पत्र उलट सुलट करून पाहिलें. त्यावरील पत्ता टाईप केलेला होता. पत्र हलकें लागतांच तिचें हृदय चर्र झालें, दिवाकरानीं आपला धिक्कार तर नाहीं केला !

थरथरणाऱ्या हातांनीं तिनें तें पत्र फोडलें. त्यावर जाड्या अक्षरांत एका लोखंडी सामानाच्या कंपनीचें नांव व पत्ता छापलेला होता. बाकीचा मजकूर टाईप केलेला होता व मालकानें खालीं नुसती सही केली होती. पत्र इंग्लीशमध्यें होतें.

प्रिय बाईसाहेब,

माझ्या मामेभावाच्या नांवावर पाठविलेलें आपलें पत्र मिळालें. लिहिण्यास अत्यंत दुःख होतें कीं माझे मामेभाऊ दिवाकरपंत साठे कालवश होऊन पंधरा वर्षे झालीं.

आ.

प्रभाकर मुळे.

❦ ❦ ❦

त्यानंतर आपल्या दारांत बसून सूर्यास्त पाहतांना ती वृद्धा कधींच कोणाला दिसली नाहीं.

आला गेला तिच्या घराकडे पाहून म्हणे—

" म्हातारीच्या आयुष्याचा सूर्यास्त झाला कीं काय ! "

